स्मारक ग्रंथ १७ मे, १९३८ रोजीं म्हणजे त्याच्या ७३ व्या वाढदिवशीं रियासतकार सरदेसाई यास अर्पण करण्याची योजना होती. पण ती अनेक कारणासाठीं पुढें ढकलावी लागली. आज ती सफल होत आहे. तींत अनेकांचें विविध प्रकारचें सहाय्य आम्हास झालें. रा. ब. गोविंदराव सरदेसाई याचेबद्दल त्यास वाटत असलेला आदरभाव अशा प्रकारें त्यांनीं व्यक्त केला आहे असेंच आम्ही मानतों. त्या त्या सर्वांचे आभार मानणें अवश्य आहे. परंतु येथें वैयक्तिक उल्लेख कुणाचा करीत नाहीं. लेखकांनीं निबंध पाठवून हा स्मारक ग्रंथ आमचेकडून पुरा करवून घेतला व प्रकाशक याच्या सद्भावनेनें तो प्रसिद्ध झाला, याबद्दल मात्र लेखक-प्रकाशकाचे आभार मानले पाहिजेत.

ता. १ ऑक्टोबर, १९३८
प्रार्थना समाज,
मुंबई ४

भा. वि. जाधव
अध्यक्ष,
सरदेसाई स्मारक समिति

# रा. ब. गोविंद सखाराम सरदेसाई

## ग्रंथलेखन

| | | |
|---|---|---|
| इंग्लंड देशाचा विस्तार [ सेलीकृत एक्सपॅन्शन ऑफ इंग्लंडचें भाषांतर ] | | ( १८९३ ) |
| उताणा रुपया [ पिच अँड टॉस ] | बैठे खेळ | ( १८९५ ) |
| ब्रिज | | ( १८९५ ) |
| व्हां तेयं ( २१ ) | | ( १८९६ ) |
| संकेत [ व्हिस्ट ] | | ( १८९६ ) |
| चेंड्र फळी | | ( १८९६ ) |
| चक्कर नांवाचा खेळ | | ( १८९६ ) |
| टेनिस, गोल्फ इत्यादि खेळ | | ( १८९६ ) |
| मुसलमानी रियासत [ हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास ] | | ( १८९९ ) |
| शालोपयोगी भारतवर्ष | | ( १९०० ) |
| मराठी रियासत ( पूर्वार्ध–१७०७ पर्यंत ) | | ( १९०२ ) |
| शालोपयोगी भारतवर्ष ( द्वितीयावृत्ति ) | | ( १९०८ ) |
| ब्रिटिश रियासत ( पूर्वार्ध–१७०० ते १७७७ पर्यंत ) | | ( १९०८ ) |
| ग्रीस देशाचा इतिहास | | ( १९०८ ) |
| मुसलमानी रियासत ( भाग १, सुधारून वाढविलेली नवी आवृत्ति ) | | ( १९१० ) |
| शालोपयोगी महाराष्ट्राचा इतिहास | | ( १९१० ) |
| मराठी रियासत ( पूर्वार्ध–सुधारून वाढविलेली नवी आवृत्ति ) | | ( १९१५ ) |
| मराठी रियासत ( मध्यविभाग–१) १७०७–१७४० ) | | ( १९१७ ) |
| मराठी रियासत ( मध्यविभाग–२) १७४० १७५० ) | | ( १९२१ ) |
| मराठी रियासत ( मध्यविभाग–३) १७५०–६१ ) | | ( १९२२ ) |
| महाराष्ट्राच्या इतिहासाच्या सोप्या गोष्टी | | ( १९२३ ) |
| ब्रिटिश रियासत ( पूर्वार्ध–द्वितीयावृत्ति ) | | ( १९२३ ) |
| मराठी रियासत ( मध्यविभाग (१) द्वितीयावृत्ति ) | | ( १९२५ ) |
| मराठी रियासत ( मध्यविभाग (४) १७६१–१७७४ ) | | ( १९२५ ) |
| *Main Currents of Maratha History* ( Patna University Lectures ) | | ( १९२५ ) |
| सरदेसाई घराण्याचा इतिहास ( पूर्वार्ध–भाग १ व २–कोल्हापूरकर गो स. सरदेसाई यांचेसह संपादन ) | | ( १९२७ ) |

नानासाहेब पेशवे (१९२६)

शिवस्मृति ( संपादक ) (१९२७)

*Shivaji Souvenir* [ Editor ] (१९२७)

मुसलमानी रियासत भाग १ तृतीयावृत्ति (१९२७)

मुसलमानी रियासत भाग २ तृतीयावृत्ति (१९२८)

मराठी रियासत ( उत्तर विभाग, १–१७७४–१७८२ ) (१९२९)

सरदेसाई घराण्याचा इतिहास उत्तरार्ध खंड १ ला (१९२९)

इंग्लिश भाषेची गृहशिक्षा–द्वितीयावृत्ति (१९२९)

सरदेसाई घराण्याचा इतिहास ( उत्तरार्ध–खंड २ रा ) (१९२९)

पेशवे दप्तर–निवडक कागदपत्र (संपादक) भाग १ ते ४५ (१९३०–३४)

मराठी रियासत ( उत्तर विभाग २–१७८४–१७९५ ) (१९३०)

*शालोपयोगी भारतवर्ष १८ वी आवृत्ति* (१९३१)

मराठी रियासत ( उत्तर विभाग ३–१७९५–१८१८ ) (१९३२)

चित्रमय हिंदी राजवंश (१९३२)

*Main Currents of Maratha History*
( 2nd Edition Revised and Enlarged ) (१९३२)

ऐतिहासिक पत्रव्यवहार ( कृ. पा. कुळकर्णी व या. म. काळे यांचेसह संपादन ) (१९३३)

*Hand Book to the Records in the Alienation Office* (१९३३)

श्यामकान्तची पत्रें (१९३४)

बालोपयोगी महाराष्ट्राचा इतिहास
सुधारून वाढविलेली नवी आवृत्ति (१९३५)

राजे शहाजी ( मराठी रियासत ) (१९३५)

शककर्ता शिवाजी ( मराठी रियासत ) (१९३५)

उग्रप्रकृति संभाजी ( मराठी रियासत ) (१९३५)

शालोपयोगी भारतवर्ष ( २० वी आवृत्ति ) (१९३६)

अव्वल मराठशाहीचें अंतःस्वरूप (रा. ब. श्री. ग. परांजपे स्मारकनिधि व्याख्यानमालेंतील व्याख्याने नागपूर विश्वविद्यालय ) (१९३६)

स्थिरबुद्धि राजाराम ( मराठी रियासत ) (१९३६)

*Poona Affairs* (Poona Residency Correspondence)
( Malet's Embassy ) (१९३६)

| | |
|---|---|
| हिंदुस्थानचा प्राथमिक इतिहास | (१९३७) |
| ब्रिटिश रियासत उत्तरार्ध मुद्रणप्रत | (१९३८) |
| महादजी शिंदे यांचीं पत्रें | (१९३८) |
| Poona Residency Correspondence | (१९३८) |
| Palmer's Embassy<br>Close's Embassy | In Press |

# अनुक्रमणिका

पृष्ठ

मराठ्यांच्या गोव्याकडील स्वाऱ्या [ पांडुरंग स. पिसुर्लेकर ] .... १७

मराठी राज्यांतील न्यायपद्धति [ ना. गो. चापेकर ] .... .... ३९

मराठे, रजपूत व शीख [ ना. के. बेहेरे ] .... .... ... ४५

महत्पूर लढाईच्या वेळचा पत्रव्यवहार [ सरदार मा. वि. किबे ] .... ५७

'राजनीति' अमात्यांची कशी ? [ वि. भि. कोलते ] .... ... ६१

त्रिंबकजी डेंगळे [ वि. स. वाकसकर ] .... .... .... ... ८१

परकीयांचें व धर्मभ्रष्टांचें हिंदुकरण [ अ. स. अळतेकर ] .... ... ९१

मराठेशाहींतील फौजा [ नानासाहेब शिंदे ] .... ... .... ९९

मराठ्यांचे माळव्यांतील दोन प्रबळ शत्रू [ चिं. ब. लेले ] .... १०९

रामटेक येथील रामदेवराव यादवाच्या काळचा शिलालेख
[ वा. वि. मिराशी व ल. रा. कुळकर्णी ] .... ११५

मराठशाही लष्कर ( इ. स. १७९५ ) [ वि. गो. दिघे ] ... १३५

देवाजीपंत चोरघोडे यांचें एक वाङ्मय स्मारक [ स. ल. कात्रे ] १४३

राजपूत–मराठे युद्ध [ मा. वि. गुजर ] .... .... . .. १५७

नानासाहेब पेशवे यांचा द्वितीय विवाह [ य. खु. देशपांडे ] .. १७३

शिवभारतकार ( अनुपुराणकर्ता ) कवीन्द्र परमानन्द आणि
त्याचे वंशज [ कृ. ना. देशपांडे ] ... १७७

रियासतकार सरदेसाई [ श्री. रा. टिकेकर ] .. ... १८७

सूचि .... .. .... .... .... .... ... .... २०१

# स्मारक ग्रंथांतील लेखांचा सारांश

**मराठ्यांचा गोव्याकडील स्वाऱ्या**—प्रो. पांडुरंगराव पिसुर्लेंकर यांच्या लेखांत श्री छत्रपति शिवाजीपासून शाहू महाराजापर्यंतच्या सर्व छत्रपतींचे गोव्याशीं व गोवेंकर फिरंग्याशीं संबंध कसकसे आले तें विस्तारें करून सांगितलें आहे. [ पृ. १७

**मराठी राज्यांतील न्यायपद्धति**—श्री. ना. गो. चापेकर यांनीं प्रचलित ब्रिटिश न्यायपद्धतीशीं मराठ्यांच्या न्यायपद्धतीचीही तुलना केली आहे. मराठी राज्यांत 'कायदे' नव्हते, ते करण्याची जरूरी कोणाला भासली नाहीं, कामाच्या पद्धती (प्रोसीजर) चे कांहीं नियम ठरले नव्हते, वकिलांचा वर्ग निर्माण झाला नव्हता, . एकंदरींत न्याय करण्याच्या पद्धतीला शास्त्री यता प्राप्त झाली नव्हती, तरी मराठी राज्यांत लोकांवर अन्याय होत असे असें मानण्यास बिलकूल आधार नाहीं. [ पृ. ३९

**मराठे, रजपूत व शीख**—मराठे व्यवहारी, धूर्त व थोडे भित्रे होत. 'आज वांचलों, तर उद्या काम करूं' असें त्यांचें धोरण होतें. परस्वापहरणांत मराठ्यांना पाप वाटत नव्हतें, या मराठ्यांच्या गुणावगुणांशीं रजपुतांच्या गुणावगुणांची प्रा. ना. के. बेहेरे यांनीं तुलना केली आहे. रजपूत चांगले धडधाकट असत, मरूं किंवा मारूं या वृत्तीनें ते रणावर जात, समरभूमीवरून ते कधीं पळत नसत. त्यांनीं दुसऱ्याचा मुलुख कधींच लुटला नाहीं.

शीखांचें राज्य स्वतंत्रतेच्या इच्छेनें नसून धार्मिक भावनेनें प्रेरित होतें, म्हणून त्यांचें राज्य अल्पकाल टिकलें.

अशा प्रकारें मराठे, रजपूत व शीख या तीनही लोकांच्या गुणावगुणांची छाननी बेहेरे यांनीं मार्मिकपणें केली आहे. [ पृ. ४५

**महत्पूर लढाईच्या वेळचा पत्रव्यवहार**—इंग्रज व होळकर यांच्या फौजा महत्पूर येथें झुजल्या. त्या झुजींत होळकराचा पराभव झाला, त्याचीं कारणें काय हें कांहीं सामग्री पत्रांतून व्यक्त होत आहे. होळकराचे कारभारी **तात्या जोग** यांनीं लिहिलेलीं बारा पत्रें सरदार माधव विनायक किबे यांनीं संपादिलीं आहेत. सामाजिक दृष्टयाही हीं पत्रें अभ्यसनीय आहेत. [ पृ. ५७

**'राजनीति' अमात्याची कशी ?**—आज्ञापत्राचा आरंभ व शेवट, त्यांतील कांहीं भाग, वतनासंबंधींचा उल्लेख इत्यादिकांवरून राजनीतीचा लेखक रामचंद्रपंत खास नव्हे, असें प्रा. कोल्हटे यांचें म्हणणें आहे. शिवाय आज्ञापत्रांत ताराबाईची मुक्तकंठानें स्तुति आढळते. म्हणून "आज्ञापत्र" रामचंद्रपंतानें लिहिलें नव्हे. तें नीलकंठ मोरेश्वर प्रधान यांनें लिहिलें असावें असें प्रो. कोल्हटे यांस वाटतें. [ पृ. ६८

**त्रिंबकजी डेंगळे**—राव बाजीच्या अमदानींत पंढरपुरीं गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचा खून ज्या डेंगळ्यानें करविला त्या डेंगळ्याचें चरित्र श्री. वि. स. वाकसकर यांनीं थोडक्यांत सांगितलें असून पटवर्धन व प्रभाकर शाहीर यांचीही थोडीशी माहिती त्यांनीं दिली आहे. [ पृ. ८१

**परकीयांचे व धर्मभ्रष्टांचें हिंदुकरण**—परकीयाचे व धर्मभ्रष्टाचें हिंदुकरण अगदीं प्राचीन कालापासून चालत आलें आहे. "**कृण्वन्तो विश्वमार्यम्**" हा मंत्र आर्योंनीं अगदीं सार्थ करून दाखविला होता. इ. स. ११ व्या शतकात मात्र ब्राह्मण शुद्धीकरणाविरुद्ध जाऊ लागले. ती वृत्ति सुमारें ९ शतकें टिकली. हें डॉ. अळतेकर यानीं दाखविलें आहे. [ पृ. ९१

**मराठेशाहींतील फौजा**—सरंजामी पद्धतीमुळे एकदर 'दौलतीचें' नुकसान करें ओढवलें वगैरे विवेचन ज० नानासाहेब शिंदे यानीं केलें आहे "मूळ सत्ता छत्रपतींचीं, सर्वाधिकार पेशव्याचा, मनसबा फडणिसाचा व तरवार सरदाराची" अशी चार ठिकाणीं मराठी दौलतीच्या सत्ताची वाटणी झाल्यानें एकतंत्री कारभार अशक्य होऊन बसला.

कवायती कपूचा आश्रय केल्यानें मराठ्याचे हित झालें कीं नुकसान झालें, यासबधींची चर्चा त्यानीं समतोल दृष्टीनें केली आहे. [ पृ. ९७

**मराठ्यांचे माळव्यांतील दोन प्रबल शत्रू**—गिरधरबहादूर व दयाबहादूर या दोघा काका पुतण्याशीं मराठ्याच्या लढाया केव्हा केव्हा व कसकशा झाल्या तें श्री. चिं. ब. लेले यानीं उपलब्ध साधनाच्या आधारानें स्पष्ट केलें आहे. [ पृ. १०९

**रामटेक येथील रामदेवराव यादवाच्या काळचा शिलालेख**—रामटेक येथील एका शिलालेखासबधीं पुष्कळ विद्वानानीं लिहिले असलें तरी तो संपूर्ण शिलालेख अद्याप कुणीच छापला नसल्यानें प्रो. वा. वि. मिराशी व श्री. ल. रा. कुळकर्णी या उभयतानीं तो चिकित्सक दृष्टीनें संपादून छापला आहे. त्यातील निर्दिष्ट देवळाची व स्थळाची यादी वेगळी जोडल्यानें व त्या शिलालेखाचा कालनिर्णय ठरविल्यानें हा लेख अभ्यासकास अत्यंत उपयोगी होईल. लेखकद्वयाच्या मते हा शिलालेख रामदेवराव यादवाच्या वेळचा आहे. [ पृ. ११५

**मराठेशाही लष्कर**—पेशवे दरबारचा इंग्रजी वकील मॅलेट हा खर्ड्याच्या लढाईंत हजर होता. त्यानें मराठी लष्कराची एकदर व्यवस्था पाहिली आणि तिजबद्दल विस्तृत व विवेचक रिपोर्ट वरिष्ठास सादर केला त्याचा हा अनुवाद श्री वि. गो. दिघे यानीं केला आहे. "पायदळ व तोफखाना बाळगल्यामुळें मराठ्याच्या हालचाली पूर्वीच्या चपलाईनें होणें शक्य नाहीं. आपल्यासारख्या राष्ट्राशीं मराठ्याची गाठ पडली तर तोफखाना व पायदळें त्याना मारकच ठरतील" हें मॅलेटचें भाष्य होतें. [ पृ. १३५

**देवाजीपंत चोरघोडे यांचे एक वाङ्मयस्मारक**—पेशवाईतील साडेतीन शहाण्या पैकीं एक देवाजीपत चोरघोडे याच्या आश्रितानें रचलेलें 'पुरजनचरित' हें प्रथमच प्रसिद्ध करण्याचें श्रेय श्री. सदाशिव लक्ष्मण कात्रे यास दिलें पाहिजे नाटक रचनेचा काळ व नाटककाराविषयीं माहिती याची थोडक्यात चर्चा कात्रे यानीं केली आहे. [ पृ. १४१

**राजपूत-मराठे युद्ध**—१७५४–५६ मध्यें झालेल्या राजपूत–मराठे युद्धाचा सविस्तर वृत्तांत श्री. मा. वि. गुजर यानीं सगतवार जुळवून सांगितला आहे. राजपूत मराठे याचे पूर्वापार सबधही लक्षात यावे म्हणून त्यानीं थोडासा इतिहास आरंभीं दिला आहे

दोघांचा शत्रू एक–उद्दिष्टही पण एकच–मात्र त्याला नामोहरम करण्याचे मार्ग निराळे, उद्दिष्ट गाठण्याचीं साधनें अगदीं भिन्न–इतकीं कीं परस्पर विरोधी. [ पृ. १५७

**नानासाहेब पेशवे यांचा द्वितीय विवाह**—नानासाहेब पेशव्याच्या मृत्यूस द्वितीय संबंध कारणीभूत झाला असें म्हणणे आहे, त्यांत तथ्य का नसावें तें श्री. य. खु. देशपांडे यांनीं सकारण दाखविलें आहे. [ पृ. १७३

**शिवभारतकार ( अनुपुराणकर्ता ) कवीन्द्र परमानन्द आणि त्याचे वंशज**—शिवभारतकार कवीन्द्र परमानन्द हा कोण, कुठला, पुढें त्याचा वंश कसकसा झाला, त्याच्या पुत्रपौत्रांचे पराक्रम कोणते वगैरे तपशीलवार माहिती कृ. ना. देशपांडे ( कोल्हापूरकर ) यांनीं दिली आहे. [ पृ. १७७

**रियासतकार सरदेसाई**—रियासतकार सरदेसाई यांचे थोडक्यांत चरित्र सांगून त्यांच्या कार्याची ओळख श्री. रा. टिकेकर यांनीं करून दिली आहे. रियासतकारांचे बालपण कसें गेलें, त्यांनीं बडोद्यास काय कार्य केलें व तेथून सेवानिवृत्त झाल्यानंतर त्यांच्या ऐतिहासिक कार्याचा प्रपंच कसा पोफावला इत्यादि माहिती या परिचयपर लेखांत आहे [ पृ. १८७

# मराठ्यांच्या गोव्याकडील स्वाऱ्या

[ लेखक—पांडुरंग स. पिसुर्लेंकर, गोवें ]

सतराव्या शतकाच्या मध्यार्धांत पार्तुगीज अमलाखालील गोवा प्रांताच्या सीमा आजच्या इतक्या विस्तृत नव्हत्या कारण त्यात केवळ तिसवाडी, बार्देज व साष्ट ह्या महालांचा अंतर्भाव होत असे ह्यालाच पार्तुगीज लोक 'जुनी काबिजाद' असे म्हणतात

शिवाजीनें कुडाळ, भतग्राम व पेडणे ह्या दक्षिण कोंकणांतील प्रदेशांत स्वारी केल्यावर तेथील लखम सावत (कुडाळ), केशव नाइक व केशव प्रभू (पडणें), रवळू शेणवी (भतग्राम) वगैरे विजापुरकराच्या सत्तेखालील देसायांनीं शिवाजीशीं दान हान केले पण त्या नरश्रेष्ठापुढें त्यांचा निभाव लागला नाहीं, म्हणून पार्तुगीज अमलाखालील गोवा प्रदेशांत त्यास पळून जावें लागलें. हे देसाई पोर्तुगीज प्रांतांतून बाहेर पडून केव्हा केव्हा आपल्या पूर्वीच्या देशमुखीमध्यें पुडावा माजवीत असत.

अशा एका प्रसंगीं लखम सावत व त्याचा पुतण्या नारोबा सावत ह्यांनीं फिरंग्याच्या चिथवणीनें ता १० सप्टेंबर, १६६७ रोजीं वेंगुर्ल्यावर हल्ला करून पोर्तुगीजांचे अंतस्थ शत्रू जे डच, त्यांच्या काहीं व्यापाऱ्यास उपद्रव दिला त्यामुळें डच लोकांनीं शिवाजीकडे तक्रार केली आणि त्या लोकांच्या प्रेरणेनें शिवाजीनें ता २० नोव्हेंबर, १६६७ रोजीं बार्देजवर स्वारी केली तीन दिवसांत शिवाजीच्या सैन्यानें बार्देज लुटला आणि तेथील पुष्कळ 'रयत लोक खेल्याना मर्द व अवरता व कबेवचे'† धरून नेले शिवाजीनें सुमारें १६०० लोक कैद करून नेले त्यात पुष्कळशा स्त्रिया व तरुण मुलीहि होत्या वेंगुर्लें येथील डच अधिकाऱ्यानें लिहिलेल्या एका पत्रामध्यें असें म्हटलें आहे कीं, शिवाजीनें बार्देजमधील ज्या नायका धरून नेल्या त्या आपल्या शिपायास विकण्यासाठीं।§

शिवाजीच्या ह्या स्वारीची सूचना गार्व्हेकर सरकारास पाच दिवस पूर्वी हेराकडून मिळाली होती तीस अनुसरून फिरंग्यानीं शक्य तो बंदोबस्त ठेविला गोंवेंकराच्या सैन्यात रेवद्ड व नादोडे येथील राणे त्याचप्रमाणें गाव्यांत वास्तव्य करणारे कुडाळ, भतग्राम, पेडणें वगैरे महालांतील देसाई यांचे सैन्य होतें ह्या देसायांपैकीं काहीं देसायांचीं कुटुंबें बार्देजमध्यें असत तीं त्यांनीं शिवाजीच्या भीतीनें तास्वडतीच गोवा बेटांत नेऊन ठेविलीं

---

† शिवाजी व पोर्तुगीज यांमध्यें स १६६७ त झालेला तह—*Shivaji Souvenir* p 125

§ Dr Bal Krishna कृत *Shivaji the Great* Vol 1 Part II, p 575

पोर्तुगीज लोकांस न जुमानता शिवाजीचें सैन्य बार्देजमध्यें घुसून दोन तीन दिवसांत तेथील पुष्कळ गांव त्यानें लुटले. मराठ्यांनीं त्या प्रदेशांत इतका धुमाकुळ मांडला कीं, त्यामुळें विजरईस आपलें निवडक सैन्य घेऊन शिवाजीच्या प्रतिकारासाठीं बार्देजमध्यें जावें लागलें. तेथें ता. २२ नोव्हेंबर रोजीं त्याची शिवाजीच्या सैन्याशीं गांठ पडून लढाई झाली. मराठ्यांच्या सैन्यांत सहा हजार लोक असून त्यांत एक हजार घोडेस्वार होते. पण हें सैन्य निरनिराळ्या जागीं विखुरलेलें असल्यामुळें पोर्तुगीजांस तात्पुरता जय मिळाला.

विजरई कोंदि द सां विसेंत यानें ता. २९-१२-१६६७ रोजीं लिहिलेल्या एका पत्रांत म्हटलें आहे कीं, "शत्रूशीं लढाई देतांना आपणाजवळ अवघे ८४ लोक होते, असें असूनहि आपण त्यास जिंकला व पळवून लाविला. त्यामुळें त्यानें आपणाजवळ तहाची याचना केली आणि आपण आपल्या मर्जीप्रमाणें त्याजकडे तह केला.§" केवळ मूठभर पोर्तुगीज सैन्याकडून आपण शिवाजीस जिंकल्याबद्दल दुसऱ्या एका पत्रांत ह्या विजरईनें आत्मप्रौढीपर उद्गार काढले आहेत.¶

खरी गोष्ट ही कीं, शिवाजीनें बार्देजवर जी स्वारी केली तिचा उद्देश केवळ त्या प्रदेशावर छापा घालून तेथें जाऊन राहिलेल्या कुडाळकर देसायास धरून न्यावें व तेथें शक्य ती लूट मिळवावी, असा होता.† शिवाजीस बार्देजमध्यें थोडीबहुत लूट मिळाली. पण त्याचे शत्रू जे सावंत वगैरे कोंकणांतील देसाई ते बार्देजहून निघून त्यापूर्वींच गोव्यांत जाऊन राहिले होते. त्यामुळें ते त्याच्या हातीं लागले नाहींत.Տ

विजरई कोंदि द सां विसेंत व मराठे यांची लढाई झाल्यावर ता. २२ रोजीं शिवाजी डिचोली येथें गेला व तेथून त्यानें तहाच्या वाटाघाटीस सुरवात केली. शिवाजीनें पोर्तुगीजांस सांगितलें कीं, आपण जी बार्देजमध्यें स्वारी केली ती वेंगुर्लें येथील डचांच्या सांगण्यावरून.‡ गोवेंकरांनीं डचांकडे तद्विषयीं तक्रार केल्याचे कागदपत्र गोवें दप्तरांत उपलब्ध आहेत.

---

§ प्रस्तुत लेखकाचा A Incursão de Shivaji em Bardez शीर्षक *Heraldo* मध्यें ता. २९-७-१९३७ रोजीं छापलेला लेख.

¶ गोवें दप्तरांतील *Livro de Chaul* No. 1.

† उपरनिर्दिष्ट A Incursão de Shivaji हा लेख व डॉ. बाळकृष्णकृत *Shivaji the Great*, Vol. 1.

Տ शिवचरित्र कार्यालयाकडून प्रसिद्ध झालेल्या *English Records on Shivaji* 1931, पृ. ११९ मध्यें एका पत्रांत शिवाजीच्या बार्देजवरील स्वारीचें कारण निराळेंच दिलें आहे पण ह्या कारणास इतरत्र पुरावा मिळत नाहीं. (लेखकानें उपरोक्त A Incursão de Shivaji em Bardez ह्या लेखांत तद्विषयीं चर्चा केली आहे.)

‡ गोवें दप्तरांतील Livro dos Reis Visinhos 1662 1668, fl. 73. लेखकाचा Agentes Hindus da Diplomacia Portuguesa, पृ. ४५

शिवाजी व पोर्तुगीज यामध्यें ११ डिसेंबर, १६६७ रोजीं तह ठरला. त्या तहाअन्वयें मराठ्यानीं बार्देजमधील कैद करून नेलेले लोक पोर्तुगीजाकडे परत केले. पोर्तुगीजानीं लखम सावंत (कुडाळ), केशव नाईक (पेडणें), मल सेणवी (भतग्राम) वगैरे कोंकणातील देसाई गोव्यात राहत होते, याचा बंदोबस्त करण्याची शिवाजीस हमी दिली.

स. १६६७ नंतर शिवाजीचा गोव्यास फारसा उपद्रव झाला नाहीं §. तो शूर व मुत्सद्दीहि असल्यामुळें विजापुरकर व मोगल यांच्याशीं लढत असता गोवेकरांचें शत्रुत्व पत्करण्यास तो तयार नव्हता. ही गोष्ट खुद्द पोर्तुगीज विजरई आंतोनियु द मेल द कास्त्रु यास माहीत होती.† पोर्तुगीज लोकांस शिवाजीची योग्यता मात्र पूर्णपणें कळून चुकली होती. प्रत्यक्ष विजरई कोंदि द सां विसेंत यानें आपल्या एका पत्रांत म्हटलें आहे कीं, "शिवाजीची धूर्तता, शौर्य, चपळाई व शहाणपण पाहता त्याची सीझरशीं व अलेक्झांडरशीं तुलना करता येईल."§

शिवाजीच्या उलट संभाजीनें फिरंग्यांचें वैर संपादन केलें. स. १६८३ मधील जुलई महिन्यांत ता. २२-२३ च्या रात्रीं पोर्तुगीजांच्या **कोरला** (Morro de Chaul) ह्या किल्ल्यावर संभाजीनें लोक पाठवून तो किल्ला घेण्याचा प्रयत्न केला. ह्या वेळीं कोरल्याचा किल्ला मराठ्यांच्या हातांत पडायाचा. पण एन प्रसंगीं तेथील किल्लेदारास सिद्दी याकूतखान याजकडून सैन्याची कुमक आल्यामुळें सदरहु किल्ला काबीज करणें मराठ्यास शक्य झालें नाहीं.¶ संभाजी व पोर्तुगीज यांची लढाई उत्तर कोंकणांत चालू असतां गोव्याहून पोर्तुगीजांस मदत होई. यासाठीं गोवेकरांस खुद्द गामांतकांत तंबी देण्याच्या हेतूनें मराठ्यानीं **थोरलें जुवें** (santo Estevão) ता. २४.११.१६८३ रोजीं घेतलें. पण २६ तारखेस त्याम तें सोडावें लागलें. ता. ११.१२.१६८३ रोजीं गोव्यांतील साष्ट व बार्देज हे दोनहि महाल संभाजीनें काबीज केले. तत्कालीन कांहीं पोर्तुगीज लेखकांनीं ह्या लढाईचें विस्तृतपणें वर्णन केलेलें आढळतें.

---

§ कांहीं पोर्तुगीज व इंग्रजी कागदपत्रांवरून दिसतें कीं, स. १६६८ मध्यें शिवाजीनें साष्ट व बार्देज ह्या फिरंग्यांच्या प्रदेशावर स्वारी करण्याचा प्रयत्न केला होता. पण ही गोष्ट शिवाजीनें नाकबूल केली (लेखकाचा *Shivaji*, p. 27-28, Sir J. Sarkar, *Shivaji*, 1929, p. 243-244. *English Records on Shivaji*, p. 125-6)

† ता. ११.६-१६६३ चें पत्र (लेखकाचा *Shivaji*, पृ. ७)

§ *Cf.* "..as astucias, o valor, a actividade, e a prudencia militar deste homem se pode igoalar com a dos Cesares e Alexandres" (*Oriente Portugues*, nos. 7, 8 e 9, p. 309)

¶ गोवें दप्तरांतील Livro de assentos do Conselho do Estado, de 28.4.694, fls 16-17.

अशा एका लेखात मराठ्यांनी **मडगांव** येथील ख्रिस्ती कॅथॉलिक बायकांवर बलात्कार केल्याची माहिती असून त्यात असे उद्गार काढलेले आहेत कीं, अशा तऱ्हेचीं क्रूर कृत्यें हिंदुस्थानामध्यें पूर्वी केव्हांच घडलीं नसतील ‼

लढाईच्या प्रसंगीं स्त्रियांवर शत्रूच्या सैन्याकडून अत्याचार होणें विशेष नवलाची गोष्ट नव्हे. पण मराठ्यांकडून खुद्द संभाजीच्या समोर असा प्रकार का झाला याचें कारण कळत नाहीं. बंगालमध्येंहि मराठ्यांच्या एका स्वारींत अशाच तऱ्हेचीं कृत्यें घडल्याचें सर जदुनाथ सरकार लिहितात.§ मराठे शिपाई गोव्यातील कॅथॉलिक बायकांवर किती अमानुषपणें बलात्कार करीत त्याबद्दल अद्यापि इकडे आख्यायिका ऐकूं येतात ‼

फिरंगी लोक मराठ्यांच्या हद्दींत जाऊन तेथील अनेक स्त्रीपुरुषांस धरून आणीत आणि त्यांस पुष्कळ वेळा कॅथॉलिक धर्माची दीक्षा देत. पण ते त्यांस गुलाम म्हणून विकीत नसत. त्याच्या उलट स्थिति मराठ्यांमध्यें अनेकदा दृष्टीस पडे. शिवाजीच्या बार्देजवरील स्वारींत मराठ्यांनीं धरून नेलेल्या स्त्रियांस आपल्या शिपायांस पगाराबद्दल शिवाजी विकत देणार आहे, असें वेंगुर्लें येथील डचांनीं लिहून ठेविल्याचें वृत्त मागें आलेंच आहे. पण तशी गोष्ट घडल्याबद्दल आधार नाहीं. उलट शिवाजी हा शत्रूच्या नायकास अत्यंत आदरानें वागवी, ह्याबद्दल खुद्द शिवाजीचा पोर्तुगीज चरित्रकार ग्वार्द याची साक्ष आहे.§ पण संभाजीनें बार्देजमधील कॅथॉलिक धर्माच्या ज्या तरुण मुली कैद करून नेल्या त्यापैकीं ख्रिस्तीकांस गुलाम म्हणून अरबांस विकण्यांत आलें अगर मुशाहिरा बद्दल शिपायांस दिलें, ह्याविषयीं पोर्तुगीज अधिकाऱ्यांनीं संभाजी छत्रपतींकडे तक्रार केल्याची माहिती गोवें दप्तरांत मिळाली आहे

गाव्यात असा प्रकार चालला असता, मोगलाकडील सरदार सिद्दी याकूतखान यानें शाहा आलमकडे फिरंग्याच्या मदतीस गोर्वे येथें जाण्यासाठीं परवानगी मागितली § याकूत खानाची विनंति मान्य करून मोगलांचें सैन्य गाव्यात उतरलें हें वर्तमान संभाजीस कळल्यावर त्यानें फिरंग्यांशीं तह करण्याचें योजून ता ३ जानुआरी, १६८४ ह्या दिवशीं आपला वकील गोव्यास पाठविला तीन दिवसानंतर फिरंग्यातर्फे मानुयल साराइव्ह द आल्बुकर्क हा वकील मराठ्याकडे गेला आणि मान तारखेस पातुगीज व संभाजी यामध्यें तह ठरला 'जेथ शकावली'त व पार्तुगीज साधनामध्यें ह्या तहाविषयीं जी माहिती मिळते ती आम्ही इतरत्र दिलीच आहे §

बार्देज व साष्टी हे दोनहि पार्तुगीजाचे महाल मराठ्याच्या ताब्यात २६ दिवस होते अखेरच्या सहा दिवसात संभाजीनें रायतुरच्या किल्ल्यासहि वेढा घातला होता पण तह होण्याचें निश्चित झाल्यावर मराठ्याचें सैन्य गाव्यातून निघून गेलें ह्या वेळीं संभाजीचा मुक्काम फोंडें येथें होता ‡ तेथून छत्रपति घाटावर गेला संभाजीच्या ह्या गाव्यावरील स्वारीस इकडील कॅथालिक लोक 'व्हडलें राजीन' म्हणजे 'थोरली स्वारी' असें म्हणतात

शिवाजीच्या बार्देजवरील स्वारीच्या प्रसंगीं जसे कित्येक राणे दसाई फिरंग्याच्या बाजूनें मराठ्याविरुद्ध लढले, तसेंच संभाजीच्या स्वारीच्या प्रसंगींहि झाले संभाजीच्या अमलातील बादेडकर (फोंडें) देसाई दुलबा नाइक हा तर आपल्या सुमारें सत्तर लोकासह पार्तुगीज विजरई कोंदि द आल्व्होर यास लढाईच्या वेळीं येऊन मिळाला व ह्या शूर (?) कृत्याबद्दल पातुगीजानीं त्याची पाठ थापटली आहे ¶ दुलबा नाईकाप्रमाणें **रवड, नार्वोड व पींण** (बार्देज) येथील सत्तोजी राणे यानेंहि संभाजीविरुद्ध लढून फिरंग्याकडून शाबासकी मिळविली † ह्या राण्याचें घराणें मूळपासून गोवेंकर सरकारास इमानी होतें कुडाळकर देसाई, खेम सावत, फोंडेंकर दुलबा नाईक प्रभृति संभाजीच्या शत्रूस फिरंग्याच्या शिफारसीमुळें पुढें स १६८८ त मोगलाच्या सैन्यात मातबर नोकऱ्या मिळाल्या

संभाजीनें गोवेंकराशीं तह केला खरा पण तो केवळ शहाआलम आपल्या पाठीवर आला म्हणून वास्तविक पाहता कवि कलश व अकबर यानीं फिरंग्याशीं संभाजीतर्फे केलेला तह पाळण्यास मुळींच रुचला नाहीं पेशवा कवि कलशाचा अतत्य द्वेष करी व सदरहू तह कलुशाच्या प्रेरणेने

§ गोवें दप्तरातील अप्रसिद्ध माहिती

§ लखकाचा *Sambhaji*, पृ ५४–५५, व *Prince Akbar and the Portuguese* १९२८, पृ ४–५

‡ *Cf* "शाहाआलम कोंकणात चालोन आला तेव्हा त्याची (संभाजीची) स्वारी फोंड प्रांतातून माघारी जाइली." (सासष्टीवर देसाइ राणे यासी समन पत्र)

¶ लेखकाचा *Sambhaji* पृ ३५ व गोवें दप्तरातील *Livro dos reis visinhos* No 4 fl 92

† गोवें दप्तरातील *Livro das moncoes* No 63 fl 337

झाल्यामुळें तो पाळला जाऊ नये अशी पेशव्याची इच्छा असावी, असें एका तत्का पोर्तुगीज सरदारानें लिहिलें आहे ¶।

तहाच्या पूर्ततेसाठीं गव्हर्नरानें स. १६८४ च्या मार्च महिन्याच अखेरीस आ वकील रायगडावर संभाजीकडे पाठविला हा वकील म्हद आतानियु द सा जुज नामक प होता त्याबरोबर रामकृष्ण नाईक नावाचा हुशार ब्राह्मणहि गेला संभाजी तहास मान्य झाल पण मूळ तहनाम्यात उल्लेख नसलेलीं दोन नवीन कलमें फिरंग्यांनीं पाळावीं, असा आ त्यानें धरिला. तीं कलमें म्हणजे-( एक ) गावें लगतचें आजदीव बेट फिरंग्यानें सोडावे ( दुसरें ) फिरंगी सरकारानें संभाजीस एक ' पाल्खी मेटी ' यावी, व ह्या नजराण्याची किंम एक लाख हानपेक्षा ( म्हणजे ३॥ लाख रु ) कमी नसावी, अशीं होतीं

संभाजीच्या मतें हीं दोनहि कलमें जरी प्रस्तुत तहनाम्यात लिहिलेलीं नसलीं तरी त तहाच्या वेळीं पोर्तुगीज वकील मानुअल सारादव्ह द आल्बुकर्कि यानें कबूल केलीं होतीं शेवटीं, ता. ६ सप्तबर, १६८४ रोजीं पोर्तुगीजांचा पाद्री वकील व संभाजी छत्रपति यामध्ये ठरलें कीं, छत्रपतीनें वकील गोव्यास जाऊन रायगडावर परत येईतोंपर्यंत लढाई तहकूब ठेवावी ‡

संभाजीचे वकील डिसेंबर, १६८४ मध्यें गोव्यास पोंचले त दोघे इसम असून एकाचे नाव सिदाजी फर्जेद व दुसऱ्याचे रगाजी लक्मिदार ( लक्ष्मीधर ? ) असें होतें रगाजी लक्ष्मीधरास पोर्तुगीज भाषा अवगत असून त्यानें ह्या भाषेंत लिहिलेलीं पत्रें आम्हास उपलब्ध झालीं आहेत. गोव्यात आलेल्या ह्या संभाजीच्या वकिलास इकडील सरकारानें कैदेंत टाकिलें† व अशा रीतीनें संभाजी व पोर्तुगीज यामध्यें झालेल्या सदर तहास मूठमाती मिळाली

संभाजीच्या मृत्यूनंतर ( मार्च, १६८९ ) महाराष्ट्रांतील जनतेमध्यें मोगलाच्या सत्ताविरुद्ध जो नवीन जोम उत्पन्न झाला त्याचा प्रतिध्वनि गोव्यालगतच्या देसायांमध्यें देखील उमटलेला दिसतो **मणेरी, साखळी सत्तर फोंड, चंद्रवाडी** येथील देसाइ ' स्वामींचें राज्य देव ब्राह्मणाचें विश्रामस्थान 'ह्या तत्त्वानें माहित होऊन राजारामाच्या सैन्यामध्यें दाखल झाले §

राजाराम जिंजीस जात असता त्याला पकडण्यासाठीं मोगलाचीं फर्मानें जिकडे तिकडे सुटलीं होतीं गव्हर्नरासहि नवाब बहादुरखानाकडून ह्याविषयीं पत्र आलें. कुडाळकर देसाई ह्या वेळीं मोगल्यात राहात होता मोगलाचें सैन्य लवकरच कुडाळ येथें जाणार आहे त्यास मदत करण्यासाठीं खेम सावतास तयार राहाण्यासाठीं त्याच पत्रीं आज्ञा झाली होती

---

¶ Joseph de Mello e Castro चें ता १९ ६ १६८४ चें पत्र ( गोवें दप्तर )

‡ लेखकाच्या *A Portugeuse Embassy to Raigad* ह्या निबंधात ह्याविषयीं सविस्त माहिती दिली आहे

† गोवें दप्तरातील अप्रसिद्ध माहिती

§ लेखकाचा *Rajaram*, पुरवणी

बहादुरखान याच्या अभिप्रायाप्रमाणें फिरंग्यानीं रम सानताम सैन्य घेऊन मोगलाच्या मदतीस कुडाळकड जाण्यास सांगितलें पण मारनाची आई वारून अद्याप बारा दिवस झाले नव्हते त्यामुळें रेम मारनानें बाबू दमाई व झारा मारत याम आपल्या सैन्यासह पुढें पाठविलें आणि त्यानंतर कुडाळ मराठ्यांकडून सोडण्याकरिता मोगलाच्या सैन्यास तो स्वत जाऊन मिळाला §

राजारामास पकडण्यासाठीं मोगलानीं पुष्कळ खटपट केली तरी त्यानें जिंजी गाठलीच मराठ्यांचा राजा जिंजीस पोहोचण्यापूर्वी थोड दिवस हा किल्ला शिवाजीच्या एका जावयानें ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला पण त्याचा प्रयत्न निष्फळ होऊन सदर किल्ला राजारामाच्या हातीं आला ‡

राजारामाची सत्ता जिंजीकड प्रस्थापित झाल्यामुळें मोगलांचें बरेंचसें सैन्य कोंकणातून निघून गेलें त्यामुळें इकडील जनतेस मोगलाविरुद्ध लढाई करण्यास जास्त जोम आला

मोगल आणि मराठे ह्यांच्या चालू लढ्यात फिरंगी सरकारचें राजकारण दुटप्पी होतें एक बाजूस मराठ्यांच्या विरुद्ध आपण मोगलास मदत करण्यास तयार असल्याचें मोगलाच्या अधिकाऱ्यास भासवावें तर दुसऱ्या बाजूस आपणास मोगलापेक्षा मराठे जास्त प्रिय म्हणून मराठ्यास सांगत सुटावें इतकें मात्र खरें कीं, मुसलमानांकडून वेळोवेळीं होणाऱ्या कटकटीमुळें राजारामाचें राज्य आपल्या राज्याच्या शेजारीं असणें फिरंगी सरकारास हितावह वाटत असे †

राजाराम जिंजीस असता रामचंद्रपंत अमात्य व संताजी घोरपडे यानीं मोगलाविरुद्ध चालविलेल्या लढ्यात कोंकणातील कित्येक देसायानी जातीनें भाग घेतला होता संभाजीच्या कालापासून मराठ्याना गावकऱ्याचा राग होताच त्यामुळे ता १० ११ १६९४ च्या पूर्वी काहीं दिवस रावजी शामराज याची एक तुकडी बार्देशमध्यें घुसून तेथील लोकांकडून त्यानें माणसी तीन रुपये पट्टी सक्तीनें वसूल केली ¶ अशाच तऱ्हेची आणखी एक मराठ्याची स्वारी पामतत्रातील सासष्टी महालात ता ९० एप्रिल, १७१७ रोजीं झाली ह्या स्वारींत **कुंकळ्ळी, वेरड व मडगाव** हीं तीन गावें मराठ्यानीं लुटलीं S

---

§ त्रिचा, पृ २

‡ Yvonne Robert Gaebele कृत *Une Parisienne aux Indes aux XVIIIe siècle* 1933 p १० वर केलेले वर्णन

† लेखकाचा *Rajaram* पृ ५, *Arquivo das Colonias* Lisboa 1 17 Vol I p 135

¶ लेखकाचा *Rajaram* p +

S लेखकाचा *Conquistas Portuguesas de Bacaim* पृ ४

सन १७१७ पासून, सुमारें बावीस वर्षे मराठयाच्या टाल्यानीं गोव्यास उपद्रव दिला नाहीं. सन १७३९ त मराठ्यांची पुनः गोव्याकडे स्वारी झाली. ह्या मोहिमेची विस्तृत हकीकत आम्ही इतरत्र दिली आहे.§

सन १७३७ त उत्तर कोंकणामध्यें पेशव्यानीं पोर्तुगीजांशीं लढाई चालू केली गोव्यातून तिकडे रसद पोंहचत असे तीस पायबंद घालण्यासाठीं गोव्यावरहि हल्ला केला.§

" वसईपेक्ष्या गोवें जागा बरा ऐसा कितेकाचा निशा होत. तेथें फौजा गेल्याने काही येक येत नाहीं. व फिरंगी लोक येक पैसा कांहीं देणार नाहींत याबद्दल गोवेस फौजा रवाना केल्या नव्हत्या. वसईचा बहुत जोरा पाहिला गोवेची मदत वरचेवरी पोंहचती याबदल सावंताच्या मुलकात व कानडे याच्या मुल्कात फौजानीं राहून शाहा मात खानयाबद्दल अजम वेंकटराऊ वगेरे सरदार निकामी केला असें पाहून पाठविले. त्यांणी जाऊन येका येकाच जेव्हा तर्त्री पोंहचहून साष्टी बारदेशाची खडणी स्वविली असें येकान माहाराज छत्रपतीस्वामी आदीकरून अवघे सरदारलोक वगैरे यासीं अपूर्व वाटलें. वसईपेक्षा गोवें हलका ऐसें दिसोन आलें त्यामुळें सर्वास उमेद जाहली ." अशी माहिती शाहू छत्रपतींच्या दरबारातील एक सरदार रामकृष्ण चिमणाजी याच्या पत्रात आहे. पत्रावर मिती नाहीं. पण त्याचें पोर्तुगीज भाषांतर ता. २८ आक्टोबर, १७३९ रोजीं झाले होतें. ह्या पत्रातील सदर्भावरून स. १७३९ मधील पेशव्यानें केलेल्या गोव्यावरील स्वारीचें कारण स्पष्ट कळून येतें.

मराठ्याकडून गोव्यावर हल्ला होणार ह्याची जाणीव पोर्तुगीज अधिकाऱ्यास पूर्वीच होती. सत्तरीकराचा फोंडे येथील सर सबनीस नरसिंगराव ह्यानें ता. २३ जानुआरी, १७३९ रोजीं दुपारच्या सहा वाजता गोवेंकरास लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे. त्यात त्यानें म्हटलें आहे, कीं गोव्यातील साष्टीवर हल्ला करण्यास निघालेलें मराठ्याचें सैन्य खानापुरास ज्या तास पोंचलें त्या तासापासून आपण वेळोवेळ त्याची हाल्चाल फिरंगी सरकारास कळवीत आहों.¶

वस्तुस्थिति अशी होती कीं, मराठ्यांचें सैन्य गोव्यात जेव्हा घुसलें तेव्हा त्यांचा प्रतिकार करण्याइतकें सैन्य फिरंगी सरकारकडे राहिलें नव्हतें

मराठ्यांचें सैन्य ता. २३ जानुआरी रोजीं दुपारच्या तीन वाजता दिगी घाटातून उतरून कुडाळीच्या बाजूनें पानी साष्टींत शिरलें. मराठे मडगांवजवळ निर्विरोध पोंहचले आणि त्यानीं तिकडे आपला तळ दिला. मराठे तिकडे ... आर हजार स्वार सहा हजार पायदळ, आणि सुमारें दोन हजार पेंढारी इतकें सैन्य होतें. मराठ्याचे मुख्य सरदार व्यंकटराव घोरपडे ( बाजी रावाचा मेहुणा ) व दादाजीराव ... रघुनाथ हे होते.

---

§ लेखकाचे *Com... da Por ... e Ba,caim* व *Maratas em Ba,caim* ही दोन पुस्तकें. रा य न. केळकरकृत 'वसईची मोहीम' ह्या ग्रंथात स. १७३९ मध्यें पेशव्यानें गोव्यावर केलेल्या स्वारीचें वर्णन आहे.

¶ गोवें दप्तरातील अप्रसिद्ध माहिती

मराठ्याच्या सैन्यानें २६ जानुआरीस मडगांव शहर घेतलें व सांतीत आपला अमल बसविला पार्तुगीजांकडे जवळ रायतूर व मुरगाव यथील किल्ले शाहिले ता २ मार्चला फोंडे यथाल किल्ला सावदकरांकडून मराठ्यांनीं घेतला ना - मार्चला श्रीमंत बाजीरावाच्या आज्ञेवरून सावतवाडीकर भामले यांनीं बार्देजवर स्वारी केली आणि तो महाल काबीज केला त्यामुळे साष्ट व बार्देश हे दोनहि महाल रायतूर व मुरगाव येथील किल्ले वगळून मराठ्यांनीं ताब्यात घेतले

मराठ्यांनीं फोंडें घेतल्यावर त्यास गावें बेट घेण्यास फारसें अशक्य नव्हते त्यानीं थोडे दिवस जास्त जोर धरला असता तर गोव्याची राजधानी दरीला मराठ्याच्या हातात पडणें कठीण नव्हतें गावेंकराची ह्या वेळीं किती भयंकर तारांबळ उडाली होती ह्याची कल्पना तत्कालीन पातुर्गीज लेखावरून सहज येते पातुर्गीज अधिकाऱ्याची तर खात्री झाली होती कीं, आता मराठे हे गोव्यात शिरल्यावाचून राहाणार नाहींत ! त्यामुळें फिरंग्यांनीं मोठ्या त्वरेनें तेथील संपत्ति व पुष्कळ श्रीमान कुटुंबें मुरगावास पोहोचवलीं ह्या गोष्टीचा उल्लेख दादाजीरावानें चिमणाजी अप्पास लिहिलेल्या एका पत्रातहि मिळतो सदर पत्रात म्हटलेले आहे " गोमंतकीच्याहि मनसुबा आहे परंतु गावतील वितविशेष कुळी मुरगावास गेली उरली घरें मात्र राहिली आहेत चौघा सरदारानें मनें जसें होईल तसें पाहू " §

उपरोक्त उताऱ्यावरून प्रथम सरदार दादाजीराव भावे यास गावें काबीज करण्यात लुटीखेरीज दुसरें एखादें उच्च ध्येय असल्याचें दिसत नाहीं महाराष्ट्रधर्मरक्षणासाठीं ( ? ) पातुर्गीजांच्या विरुद्ध संग्राम करणाऱ्या मराठ्यास याच मतेखालीं असलेल्या गोव्यातहि महाराष्ट्र धर्माची पताका फडकावण्याची दृढ इच्छा का झाली नाहीं हें कोडें उकलण्यानें वसई मोहिमेच्या इतिहासावर देखील प्रकाश पडणार आहे पार्तुगीज लेखावरून कळून येतें कीं, सरदार दादाजीरावाचें पोर्तुगालाशीं अंतस्थ सूत्र होतें आणि त्यानें फिरंग्यांकडून पैसे घेऊन याचा 'भाईचार' जोडला होता इतकेंच नव्हे तर गावेंकर अद्यापि हतबल झाले नाहींत, हें व्यक्तरावादि कित्येक सरदारास दाखविण्यासाठीं रायतुरचा किल्ला तह होईपर्यंत फिरंग्यानीं लढवावा अशी दादाजीरावानें आपल्या शत्रूस ( ? ) सल्ला दिली आणि फिरंग्याची कुमक बिनविरोध सदरहु किल्ल्यात जावी म्हणून वाटेतील एका चौकीवरील पहारा देखील काढून टाकला ९ एका समकालीन पातुर्गीज लेखात म्हटलें आहे कीं ह्या कृत्यास दादाजीरावाच्या पक्षाचें कित्येक मानकर सरदार अनुकूल होते

खुद्द दादाजीराव व त्याचा मुलगा सरदार भास्करराव यांचीं कित्येक पत्रें उपलब्ध झालीं आहेत त्यावरूनसुद्धा दादाजीरावाच्या फितुरपणाविषयींचा आरोप सभाव्य वाटतो गोव्याचा

§ रा व सरदेसाईकृत पेशवे दप्तरांतील निवडलेले कागद भा १६, पृ ११५

लेखकाचा *Marathas em Baçaim* p 68

९ लेखकाचा *Conso Se Perle i Baçaim* पृ ९७ १०५ व १२२

विजरई मार्केज द लौरिसाल ह्यास लिहिलेल्या एका पत्रांत सरदार दादाजीराव म्हणतो:—"फि इजनेश घांटाखालीं आलेश्रत्ती मा॥ दौलत अंतोन कारनेल अलकास § वेदोर जराल द फ व दोतोर जुजे पेद्र माऊस ¶ हे दोघ फिदाल्क मुलूजमतेस आले होते त्यानीं अजर येखलाशीने मागितले बमोजिब जंजिरा (गोवा बेट) तेंच नरगुंद यावजे खातिरे आणून हद्द जागा यक समजोन मद्दतयाविनसीं जंजिरेचा बचाव करु अजमराव प्रधानजीची फौज काढून येखलासी राखून मकानेस आलों मेहेरबांस मालूम जाहलें असेल..." स. १७३१ मध्यें चिमणाजी अप्पास पाठविलेल्या एक पत्रात जो दादाजीराव लिहीत होता कीं, 'फिरंगी म्हणजे पापात्मे. त्यांचा नाश होणें हें अपूर्व नाहीं § तोच दादाजीराव सदर विजरई लौरिगाल यास लिहितो कीं, 'फिरंगी लोक येखलासांत थोर, इमानचे पुरे, क्रियेचे खरे, येक कडेचे मागमानें वचन दिल्हेलें तुमचे आगा देखील वफात न पाडता निभावणारे असें आम्ही घाटाखालीं आले ममंई बहुतांचे तोंडें आइकून दरम्यान होऊन नक्के थातेने उपराला करून इंदीचा (गोव्याचा) बचाव केला..." दादाजीरावाचा चिरंजीव सरदार भास्करराव यानें तर गोव्यांतील विठोजी शेणवी धुमे यास एका पत्रांत असे लिहिलें होतें कीं, "कैलासवासी वडिलांनीं सर्वांच्या स्नेहापेक्षां इंदीचा (म्हणजे पोर्तुगीज अंमलाखालील प्रांताचा) स्नेह विशेषात्कारें जोडिला आहे. फिरंगी लोक सजन. वचनाचे खरे. क्रियेचे पुरे. स्नेहास थोर. मर्दुमीस धुरंधर. त्याचे उपमेस पृथ्वीवर कोण आहे असे कैलासवासी वडील आम्हास पदोपदीं सांगत होते ती गोष्ट आमच्या निदर्शनास आली." सरदार भास्करराव गोवेंकराच्या चिटणीसास लिहिलेल्या एका पत्रात म्हणतो—"अजम दादाजीराव इंदीचे काजकामास येऊन इंदीची मेहरबानी संपादिली होती..." दुसऱ्या एका पत्रात भास्करराव लिहितो; "...दादाजीराऊ कैलासवासी याणी सर्वांसी आमित्रपण करून मोहिबाचा भाईचारा केला...वडिलीं आम्हास सांगितलें कीं आम्ही अजम फिरंगी याची जोड केली आहे. ते तुमच्या कार्यास येतील..." दादाजीराव व व्यंकटराव ह्या दोघां प्रमुख सरदारांच्या मतांमध्यें अंतर होतें. व्यंकटरावास वाटत होतें कीं, आपण फिरंग्यास पूर्णपणें जिंकून आपणास वाटेल तसा तह करण्यास त्यास भाग पाडूं. पण दादाजीरावास फिरंग्याशीं जास्त कटकट न करिता आपला कार्यभाग साधून घ्यायाचा होता. शिवाय बार्देज, साष्ट व फोंडें पेशव्यानें काबीज केल्यानंतर गोव्यालगतच्या प्रदेशांत पेशव्याचा हात पूर्णपणे शिरूं नये, एतदर्थ खुद्द कोल्हापुरास व सातान्यास खटपटीहि चालू झाल्या.

ना पोर्तुगालाच्या प्रांतात झाली आहे. तेव्हा आपण अनुकूल नसून त्या प्रांतातून ते कधी परत निघून जातील ह्याची आपण वाट पाहात आहोंत § ता. १३-४-१७३९.
एका पत्रात नयराम मोरत भासरु व रामचंद्र मारत भोसले सरदेसाई प्रांत कुडाळ हे गव्हर्नरास लिहितात — "इस्तादाचा व इजानराचा पुरातन स्नेह चालला त्यास बारदेस घेऊन कारण म्हणाल तर मराठ्याचा सरस्ता पाहिला आणि सरदेसाई यांची ठाणी अवघी घेतली पुन्हा बारदेस घ्यावयास मर्यादेवर ते आले. तेव्हा इजानराने ऐसें दिसोन आलें कीं बारदेस मराठ्याचें हातीं पडल्यास इस्तादासही बरें नाहीं. ऐसें समजोन बारदेस घ्यावा लागला. तेव्हा अपलेच फौजेनसीं मराठ्याचा फौज न आणिता घेऊन आजवर राखला. मराठ्याचा फौज काय निमित्य न आणिली म्हणाल तर इस्तादचा व इजानराचा कदीम दोस्ती. तेव्हा राज्य **आमचे व हे राज्य इस्तादाचे** ऐसें समजोन आपल्या फौजेनसीं घेऊन राहिले. पुढा तरी **बारदेस मराठ्यास सहसा देणार नाहीं** हा मोहराचा खातरजमा असा द्यावा. परंतु खासगत फौज ठेऊन बारदेस राखावा लागला. तेव्हा फौजेस खर्च लागला तो यानिसींचा भावार्थ पूर्वीपत्र माहितीस लिहून गेलेच आहे. तेणप्रमाणे माहितीं काय करून माहिवाचा व राजा व्यंकटराऊ याचा तह होऊन व्यंकटराव याची फौज वर घाटी जाई पावेतो **बारदेस आम्हाकडे असावा. तदनंतर तुमचे स्वाधीन करू.**" S

छत्रपति शाहूच्या दरबारातील नारायण मसा, रामकृष्ण चिमणाजी प्रभृति मुत्सद्द्यांचा आतां फिरंग्याकडे होता. रामकृष्ण चिमणाजीने गोवेकरास कळविले होते की फिरंग्यानी मराठ्याविरुद्ध जोर धरला तर तहाच्या प्रसंगीं त्यास फायदा होण्याचा संभव आहे. तो एका पत्रात म्हणतो कीं 'आपण तर्फेंहि जारावरी करून आम्हास येथें बोलावयास **खुशाली** होय ते गोष्ट केली पाहिजे'।

खुद्द शाहू छत्रपतीला देखील वाटत होतें कीं 'गोवे बंदर फार उत्तम नाही नये. बंदर नासल्यामुळे साहेबास फायदा आहे ऐसें नाहीं. फिरंगी यामध्ये असल्यामुळे फायदाच आहे आणि बंदरी **चिजवस्त मिळती** ¶

गोव्याकडील प्रांत व विशेषत: फोंड्याचा किल्ला पेशव्यानें हस्तगत केल्याचें वृत्त करवीरकर संभाजी छत्रपतीस कळल्यावर त्यास राग आला व प्रस्तुत स्वारीत मराठ्यानी काबीज केलेला प्रांत माझून देऊन त्यांनीं तेथून निघावें ह्याविषयी त्यानें हट्ट धरला। संभाजीने गोवेकरास सन १७३९ च्या अखेरीस लिहिलेल्या एका पत्रात म्हटले आहे — "वसई प्रांतास राजश्री बाजीराव याणी आज च्यार वर्षे अभमारतप्रहामा कथला करून वसई घेऊन तो मुलूक काबीज केला. गतवर्षी गांवें प्रांतास फौज रवाना करून आजार दिल्हा. इतके जाले असोन तुम्हीं काही इत्यादिगास लिहून पाठवलें नाही. या मुळे तुम्हाकडीलच नामोडी जाली आणि फोंड्याचे ठाणा बसला. हाली बाजीराव याणी फोंडे प्रांताचा जिल्हा आपले ताबीन करावी

§ गोवें दप्तरातील अप्रसिद्ध माहिती

S कित्ता

¶ लखराचा Co o Se P rle t Ba ca पृ १२१

म्हणिजे आपण बहुत प्रकारें चाकरी करून दासऊ म्हणोन कितावती पाठविल्या आहेत त्यास तुम्हाकडील मजकूर राजश्री रगो नारायण यांणी जाहीर केला जे तुम्ही या राज्यासी दुसरा विचार धरीत नाहीं. मानेन यसलासी चालानी हे उमेद बहुत धरिता त्यावरून खुशाली होऊन फोंडे प्रात तमाम त्यासगीकडे देवावा ऐसा निश्चय जाला आणि तुम्हास बाजीरायाचा आजार लागो नये याबद्दल या तर्फेच्या फौजासहित राजश्री हिंदुराव घारपडे ममलकतमदार यासी या तर्फेस रवाना केले आहेत. लौकरी यऊन पावतात. ते ठिकाण बहुतां दिवसांचे आहे ते जगवावें हाच आमचा निश्चय आहे "

उपरोक्त उद्धृत केलेल्या उताऱ्यावरून मराठ्यांच्या बाजूचे कित्येक प्रमुख मुत्सद्दी व अधिकारी लोक गोवेकर फिरंग्याशीं किती सहानुभूतिपूर्वक वागत होते हें कळून येईल प्रस्तुत लढाईच्या वेळीं व तदनंतर झालेल्या तद्विषयक वाटाघाटी सबंधाच्या प्रसंगीं गोव्यातील कित्येक हिंदु पुढारी फिरंग्याच्या बाजूने वावरताना दिसतात. निठाजी शेणवी धुमे, बहुगुण कामत वाघ, वेंकट कामत, उपी कामत, बाबुलो सेणवी सुरटणकर, सातू सेणवी डांगी, बापुराव देसाई, श्यामजी पै घाटये प्रभृति गोवेंकर हिंदु लोक फिरंग्याचें हित साधण्याच्या उद्देशानें मराठ्यांकडे राजकारणें लावीत असत. पण फिरंगी लोकांची हिंदूविषयीं वर्तणूक प्राय

गोमांतकस्थ हिंदु लोकांच्या हितार्थ काहीं भाषा व्यंकटरावाच्या कारभाऱ्याकडून चालण्यांत आली. पण पुढे तहाचें काम दादाजीरावाच्या मध्यस्थीनें चालू झाल्यामुळें ह्या मुद्द्यास महत्त्व देण्यांत आलें नाहीं.

व्यंकटरावाचा कारभारी गोविंदराव ठाकूर हा सावंतवाडीचा असल्यामुळें तो गोव्याचा माहितगार होता. त्यामुळें गोव्यांतील हिंदु लोकांस धार्मिक स्वातंत्र्य नसल्यामुळें किती त्रास पोहोंचत असे ह्याची कल्पना गोविंदपंतास होती. पण दादाजीरावास किंवा खुद्द पेशव्यास गोमंतकासारख्या दूरच्या प्रदेशांतील धार्मिक प्रश्नास विशेष लक्ष देण्याची आवश्यकता भासत नव्हती व ही गोष्ट पोर्तुगीज विजरईस पूर्णपणें ठाऊक होती. यविषयीं विजरई कोंदि द सांदोमील यानें लिहिलें आहे कीं, "गोव्यांतील हिंदु लोकांस धर्मस्वातंत्र्य असावें ह्या मुद्द्यावर मराठे भर देतील असें वाटत नाहीं. गेल्या वर्षी वेंकटरावानें इकडे केलेल्या तहनाम्यांत ह्या विषयासंबंधानें कोणतेंच कलम घातलें नाहीं. मात्र सणजी याकडून बाजीरावानें पाठवून दिलेल्या तहाच्या खर्ड्यांतहि ह्या बाबतींत एक शब्द देखील लिहिलेला नव्हता. भासत्याच्या तहाच्या वेळीं बाजीराव व चिमणाजी अप्पा यांनीं ह्या मुद्द्याची आठवण जरी काढली तरी त्यांनीच त्याकडे दुर्लक्ष्य केलें. ह्या सर्व अनुभवसिद्ध गोष्टी लक्ष्यांत आणतां मला वाटत नाहीं कीं, केवळ धर्मस्वातंत्र्याच्या मुद्द्याकरितां मराठ्यांस इतका फायदेशीर असलेल्या ह्या तहास त्यांच्याकडून विरोध होईल." §

विजरईनें लिहिल्याप्रमाणें खरोखर मराठ्यांकडून गोव्यांतील धर्मस्वातंत्र्याच्या मुद्द्यावर भर देण्यांत आला नाहीं. मग या गोष्टीस विजरईनें निर्दिष्ट केलेलें उपरोक्त कारण झालें असेल किंवा दुसरी एखादी अतर्क्य भानगड उपस्थित झाल्यामुळें पेशव्यास सदर मुद्द्याकडे कानाडोळा करणें अवश्य वाटलें असेल. इतकें मात्र खरें कीं, दादाजीरावानें चिमणाजी अप्पास लिहिलेल्या पत्रांत गोमंतकांत 'हिंदुधर्म चालवावा' असा ठराव झाल्याचें वृत्त कळविलें होतें†; पण ह्याविषयीं सदर तहनाम्यांत एक शब्द देखील आढळत नाहीं‡. पुढें इचवर्डच्या मध्यस्थीनें बाजीराव व पोर्तुगीज यांमध्यें तहाच्या वाटाघाटीस पुन: सुरुवात झाली त्या वेळीं श्रीमंतांनीं 'साष्टी बारदेशांत महाराष्ट्र धर्म ज्याचा ते करितील त्यास फिरंगी यानें चालवावें दखील गोवियांत महाराष्ट्र धर्म चालवावा' असें कलम तहाच्या खर्ड्यांत घातलें होतें.§ पण हेंहि कलम पेशव्यानें तहाच्या प्रसंगीं गाळलें!¶

ता. २ मे १७३९ रोजीं वेंकटराव व दादाजीराव ह्यांनीं गोंयकरांकडे जो तह केला, त्यांत 'फिरंगी याच्या मुलूखामधें फौजा मुक्काम जाहल्या आहेत. त्या उठोन जाण्याच्या खर्चास फिरंगी याही सध्या सात लाख रुपये मात' असा ठराव केला होता.

§ लेखकाचें *A Restauração de Bardez e Salcete* पृ. ३२.

† पे. द. भा. १६, पृ. ११५.

‡ लेखकाचें *Como se Perdeu Baçaim* पुरवणी मराठी.

§ लेखकाचें *Restauração de Bardez e Salcete* पृ. ८४.

¶ किंवा पृ. ४८–५०.

ह्या तहान्वये मराठ्यांच्या सैन्यानें साष्ट व बार्देज हे महाल फिरंग्यांच्या स्वाधीन केले फिरंग्याकडून सर्व खंडणी वेळेवर न मिळाल्यामुळें वेंकटरावानें साष्टींतील दोन गांव कुंकळ्ळी व व असोळणे–आपल्या ताब्यांत ठेविले. पण तेहि पुढें ता. २३ नव्हेंबर, १७४० ह्या दिवशीं पार्तुगीजांकडे दिले.

वेंकटरावानें केलेला उपरोक्त तह पाळण्यास भासले मात्र राजी होईना! त्यामुळें सावंताच्या ताब्यात बार्देज होता तो सोडवण्यासाठीं फिरंगी सरकारास त्याजकडे निराळा तह करावा लागला. हा तह ता. २८ फेब्रुवारी, १७४० ह्या रोजीं डिचोली येथें निळोजी शणवी धुमे व बहुगुण कामत वाघ ह्यांच्या द्वारें गोव्हेंरनरानें केला आणि त्या तहान्वये बार्देज महाल फिरंग्यांच्या हवालीं करण्यांत आला

सावंतानीं प्रस्तुत तह थोड्याच दिवसांनीं मोडला व ता. २१ फेब्रुवारी १७४१ रोजीं बार्देजवर हल्ला करून तो पुन: काबीज केला. पण पोर्तुगीजांनीं त्याजकडून एकच दिवसाच्या अवधींत तो परत मिळविला. ही गोष्ट ता. १३ जून १७४१ रोजीं घडली. सावंताशीं झालेल्या ह्या लढाईच्या प्रसंगीं मिनिटास ३२० बार काढणाऱ्या नवीन तऱ्हेच्या सोळा तोफा फिरंग्यांनीं प्रथमत: वापरल्या. त्यांच्या आवाजानें भोसल्याच्या पोटांत धडकी भरली, असें समकालीन पोर्तुगीज लेखांत वर्णन आहे.¶

पेशवा पुन: गोव्याच्या वाटेस गेला नाहीं फिरंग्यांनींहि प्रसंग पाहून त्याच्याकडे अदबीनें वागण्याचें धोरण ठेविलें

गोवेंकराकडे व्यंकटरावानें केलेल्या तहामध्यें अशी एक अट होती कीं साष्ट व बारदेश या मुलखांत गावगन्ना दिवाणाचा जो वसूल होईल त्यांपैकीं शेंकडा चाळीस टक्के वसूल बाजीरावास मिळावा ९ पण ही अट फिरंग्यांनीं पाळली नाहीं. हें निमित्त धरून पेशव्याचा सरदार गोविंदपंत ठाकूर—जो कांहीं दिवसांपूर्वी कोल्हापूरकरांच्या नोकरीस राहिला होता–यानें ता. १२ मे १७४२ रोजीं सुमारें तीन हजार घोडस्वार व तितकेंच पायदळ घेऊन साष्टींत शिरला आणि तेथें सक्तीनें खंडणी वसूल करूं लागला.§ ह्या सरदारानें साष्टी

---

¶ लेखकाचें *Restauracao de Bardez e Salcete* पृ ६६–८२ लिस्बन येथें स १७४२ मध्यें प्रसिद्ध झालेल्या पुढील [illegible] पुस्तकांत यविषयीं उपयुक्त माहिती दिली आहे (१) *Relacao verdica dos S[illegible] sos da India* व (२) *Noticia da Vitoria que fez [illegible] Marques do Lo[illegible] cal*

९ ता २ जुलै १७४१ ची पोर्तुगाल जाणल्नें लिहिलेलें पत्र (लिस्बन येथील पुराभिलेखांत असलेलें हस्तलिखित) व J F

§ लेखकाचें *Como Se Perdeu Bacaim* हें पुस्तक, पृ १२४, पुरंदरे दप्तर, भा १ ला पृ १२ पृ ९१ मध्ये "गोवें घण्याबद्दल हमजोशी बाराभाई" असा सरदारांनीं जो के पुरंदरे यांनीं लेख दिलेला आहे तो 'गोवें पोर्तुगीजास सोडण्याबद्दल हमजोशी बाराभाई" असा पाहिजे आहे

एक पधरवडा लढाई केली व पुढें सांगें येथें जाऊन तेथील किल्यास वेढा दिला. ह्या किल्यात अणाजी प्रभू नामक सवदेकराचा प्रधान होता. गोविंदपतानें हा किल्ला काबीज करून अणाजी प्रभूस कैद केलें. सागेप्रमाणे फोंडेचा किल्लाहि गोविंदपतानें आपल्या ताब्यात घेतला. गोव्यातील फिरंगी अधिकाऱ्यास सांगें व फोंडे येथील किल्ले मराठ्यांकडे गेले हें हितावह न वाटून, ता. ८ जून रोजीं त्यानीं सागेच्या किल्ल्यावर हल्ला केला व तो जिंकल्यावर दुसऱ्या दिवशीं जमिनदोस्त केला. पोर्तुगीज सैन्यामध्यें सहाशें युरोपियन, दीड हजार एतद्देशीय शिपाई, नवीन तऱ्हेच्या दोन तोफा होत्या. ह्या सर्व सैन्याचें आधिपत्य जनरल मानुयल सुवारीस वेल्यु ह्याच्याकडे होतें. पण सागेची कामगिरी ह्या जनरलच्या हाताखालील एका सरदारावर सोंपविली होती. गोविंदपताची ह्या वेळीं धुळधाण उडून त्यास घाटावर पळून जावें लागलें. उपरिनिर्दिष्ट जनरलनें ह्या लढाईचें विस्तृत वर्णन करून म्हटलें आहे कीं, सागें येथील मराठ्याच्या कैद्यापैकीं क्रियेकाचीं आपण डोळीं उडविलीं व क्रियेकाचे उजवे हात कापून ते त्यांच्या गळ्यात बांधून त्यास सोडून दिले !

सोमवार ता. ११ रोजीं पोर्तुगीजाचें सैन्य फोंडेस जाऊन त्याच दिवशीं तेथील किल्यास वेढा दिला. कोल्हापूरकर संभाजी छत्रपतीच्या एका सरदारानें हा किल्ला बळकाविला होता. त्यानें तो लगेच पोर्तुगीज जनरलच्या स्वाधीन केला. सागेच्या किल्ल्याप्रमाणे हाहि किल्ला जमिनदोस्त करण्याचें पोर्तुगीजाच्या मनात होतें पण सवदेकराच्या आग्रहामुळे त्यानीं तो किल्ला त्याच्या स्वाधीन केला.

फोंड्याच्या किल्ल्याचें महत्त्व पोर्तुगीजास फार होतें. तो किल्ला मराठ्याच्या हातीं न जाता सवदेकराकडे असणें फिरंग्यास अगत्याचें वाटत असे, कारण त्यामुळें गोव्यालगतचा प्रांत आपल्या कब्जात राहील, अशी फिरंग्याची समजूत होती.

इ. स. १७४४ मध्यें दो मिगेल दालमैद पोर्तुगाल याची गोव्याच्या विजरईच्या जागेवर नेमणूक झाली. हा फार शूर होता. इकडे आल्यावर थोड्याच महिन्यानीं ह्या विजरईनें भोसल्याशीं लढाई सुरू केली. त्यानें हलोर्ण (५ मे १७४६), व डिचोली (१८ मे १७४६) येथील किल्ले घेतले. ता. १६ नोव्हेंबर १७४६ रोजीं विजरई आपल्या आरमारानिशीं कायसुराच्या उपसागरात प्रकट झाला. तेथून ता. २३ नोव्हेंबरास त्याने तिराकोलच्या कोटावर हल्ला चढवून तो काबीज केला. ह्या प्रसंगीं फिरंग्यानीं भोसल्याचें बहुतेक सर्व आरमार पकडलें किंवा नष्ट केलें. ह्या आरमारात १५ ते २० तोफा असलेलीं दहा पाल, सतरा गलबतें, तीन बंतेल, एक मचवा, चार पारग इतके नग होते. शिवाय पुष्कळ होड्याहि होत्या.§

ता. ३ डिसेंबर १७४६ ह्या दिवशीं रेडीचा किल्ला फिरंग्यानीं हस्तगत केला. भोसल्याविरुद्ध चाललेल्या प्रस्तुत लढ्यात सवदेकरानें ससैन्य फिरंग्यास साह्य केलें.

---

§ M. M. कृत *Epanaphora Indica*, Lisboa, 1746, pag 9

सामील जाहाले आहेत. त्यास इस्तादाने आपले पदरी घेतले आहेत. परतु त्याचे राजकारणाचे दोरे चहूकडे खेळतात. गत वर्षी अजम सदाशिवपंत याची मोहीम दक्षण प्रांते जाहाली त्या त्यागायेत जमदाराचे राजकारणाचा दोरा आहे. त्यास सामंत आहा तो राजकारण दाटले जरसे पडले. सनोजी राणेकडील व झाल्या राणे याकडे राजकारण खेतले राणे मजकुराचे कारकून रुद्राजी सेणवी व दत्त सेणवी उभयेता दोघा राणेपाशी आहेत त्याची पत्रे घेऊन त्याकडील कारकुणास पाठविल्हे होते आणि मजकूर लिहिला की आपले निमतीचे गोनेत हजार माणूस आहे. नारदेसच्या मूर६ व तरीच्या पाईवाट आहेत त्या आपणाधीन आहेत. आपल बधु पाचसे लोकानिसी नारदेसी आहेत. कुल्ली मूर व तारीचे पास७ आपणाधाधीन आहेत. येम त्रितिर अजम पंतप्रधान याकडे राजकारण चालते. पंतप्रधान याकडून पैका नापट आणितात हे वर्तमान इजानेवास माफ्रत दखल जाहाले. हे कसे आहे कळत नाही. इस्तादाची तर सदा नसी राजकारणात व सेणवी मजकूर या प्रकारची करितात. तर माहिरी सातताचे निसबतीचे लोक व जमीदार व कारकून घरेदारे जजिरेआत असतील त्यास येकादर बाहीर घालावे व मुपस व जजिरेचे चौकीस लोक असतील त्यास जजिरेबाहेर ठवावे. त्याकडील लोक जजिरेत येता जाता बाजपुसीने कार्याकारण घेत जावे. पंतप्रधान यास गामागत घेऊन दरू म्हणोन करलात केली आहे असे राजकारण धंलते. इजानेवास दाखल जाहाले ते येरचाल्पन्हास व मोहिरास दखल व्हावे म्हणान लिहिले आहे. इस्तादाचे पुण्य समर्थ असता कोणती गोष्ट घडणार नाही परतु इजानेवास दखल जाहालेले इस्तादास कळावे म्हणोन लिहिले आहे. पेसजी याच प्रकारे धमस व साष्टी कल्याण राजकारण दोन च्यार वर्षे करून मोहीम केली. त्याचप्रकारे तिकडेही राजकारण चालते मागे अताजीपा पल्हा म्हणोन साष्टीमध्ये देमक होता त्याणे वाट दाखऊन कल्याचे घातेने नेले हे मोहिरास दखल आहे. तर वाडी प्रांतातील कारकून माहिरानजीक असतील तर कोणाचा इतबार न धरावा व राणेकडील दाघे कारकून आहेत त्यास कैदीत ठेवावे हे कुल्ली हकीकत मा निल्हेम जबानी सांगितले आहे. हे सांगितील ती वचने इजानबाची समजणे. इजानेवान लिहिले हे न दर्शवावे. मोहिरास व येरचाल्पन्हास व काणी जिमाळचा नकल लिहिणार असेल त्यास दखल करावे. सेथेराळ याणी पंतप्रधान यासी राजकारण लाविले आहे. मर्दनगड पंतप्रधानासी द्यावा असा मजकूर होत आहे तर बेगीकरून मर्दनगडास इस्तादाचे ठाण पक्के करावे. हे कुल्ली विस्तार पेस मा निल्हेम सांगितले आहे ज इस्तादाच्या प्रयोजनाचे असेल ते करावे. प्रयोजनाचे नगर ते माडावे जमदारास नजरा राखाव. कारकून असतील त्यास जरूर दर्मीने कैदीत ठेवावे. इजानबाचा लाजिम न होय ते करावे. इजानेवान लिहावयास न सरे परतु इस्तादाहून थोर दुसरे नवद यासरिता वल्भी थल हे लिहितात."

सरदार भास्करराव नरगुदकर यास पेशव्याच्या सैन्यात चाकरी नोकरी होती. तिथे त्याम मराठ्याच्या यात्र्या मदत पळा आणि ता त्या मोरेश्वराम गुमर्गे लिहून पाठवीत असे.

---

६ पोर्तुगीज शब्द muros चा अपभ्रंश, मूर म्हणजे किल्ल्याची भिंत

७ पोर्तुगीज शब्द pas os म्हणजे पायवाट

'ऐतिहासिक पत्रव्यवहार ' पृ. ७७ मध्यें भास्करराव दादाजी हा कोण याचा उलगडा होत नाहीं, असें रियासतकार लिहितात तो हाच ! असो.

फोंड्याचा मर्दनगड आपल्या हातीं असावा अशी पेशव्यास इच्छा होती. कारण तो किल्ला ताब्यात असल्यावर पुढें मागें फिरंग्यावर शह देण्यास त्यास सुलभ होणार होतें. हेंच मत पे. दप्तर, भा. २४, पृ. १५४, मधील एका लेखात वाचावयास मिळतें.

सन १७५६ त सवदेकरानें मर्दनगड किल्ला पेशव्याकडे गहाण ठेवला. हें वृत्त फिरंग्यास कळताच मराठ्यांच्या कबजात हा किल्ला पूर्णपणें जाण्यापूर्वी आपणच तो काबीज करावा एतदर्थ खासा पोर्तुगीज विजरई काँदि द आल्व्ह तिकडे ससैन्य गेला व त्यानें त्या किल्ल्यास वेढा घातला. पण किल्ल्यातील लोकांस ऐन वेळीं कुमक झाल्यामुळें§ फिरंग्याचा उद्देश शेवटास गेला नाहीं. फिरंगी सैन्याचा पराजय झाला व त्यास गावेस परतावें लागलें. खासा विजरई तेथें मारला गेला. तसेंच फिरंग्याचे चौदा सरदार व ८७ शिपाई ह्या लढाईत मेले. ही गोष्ट ता. २८ जून, १७५६ रोजीं घडली.§ लक्ष्यात ठेवण्याची गोष्ट ही कीं, फोंड्याच्या किल्लेदारानें फिरंगी विजरईचें शव आदरपूर्वक गोव्यास पाठवून दिलें !

फोंड्याचा किल्ला मराठ्यांकडे आल्यावर त्याची काळजीपूर्वक डागडुजी करण्यात आली. खुद्द व्यंकटराव विश्वनाथ (*ह्या किल्ल्यात स १७५७ च्या सुरवातीस येऊन दोन महिने*) ह्या कामासाठीं इकडे येऊन राहिला होता.

स. १७५६ मध्यें *फोंड्याचा किल्ला* घेण्याचा गोवेंकराचा प्रयत्न फसला खरा, पण १ जून, १७६३ रोजीं पोर्तुगीज विजरई कोंदि द येग यानें तो काबीज केला. ह्या प्रसंगीं फिरंग्यास फोंडे महालांतील सरदेसाई नरबा नाईक प्रभृति कित्येक हिंदुलोक व खुद्द त्या किल्ल्यातील बापुजीपंत मुजुमदार व शूर सरदार रघु सावंत फितूर होते.¶ पोर्तुगीज विजरईनें हा किल्ला लवकरच पाडून टाकिला.

पेशव्याकडून फिरंग्याविरुद्ध फारशी हालचाल झाली नाहीं. फिरंग्याकडून हा किल्ला परत मिळविण्याचा श्रीमंत माधवराव पेशव्याचा विचार होता सन १७७१ सालातील जानुआरीमध्यें पेशव्याचें सैन्य हैदरअलीवर *कर्नाटकात जात असतां ह्या सैन्यास फोंडे महालांतून फिरंग्यानीं* वाट द्यावी, अशी पेशव्यानें खटपट चालविली होती हेतु हा कीं, अशा निमित्तानें फोंडा महाल आपल्या कबजात घ्यावा मराठ्याच्या सैन्यात सुमारें दहा हजार लोक असून त्याचें नेतृत्व विसाजीपंत केशव लेले ह्या सरदाराकडे होतें ह्या सैन्याखेरीज मराठ्याचें एक आरमार

§ गोवें दप्तरातील अप्रसिद्ध माहिती व पारसनीसकृत 'पेशवे दप्तरातील सनदापत्रातील माहिती', पृ १९६

§ Balsemão कृत Portugueses no Oriente, III, p 213–240

¶ गोवें दप्तरातील Livro dus mon coes No 136, fl 339 व Balsemão, III, 218,

मसुरेजवळ येऊन राहिलें होतें व त्यात १७ पाल व ८५ गलबतें होतीं. मराठ्यांच्या सैन्यास सावंताचें सैन्य मिळालें असून सर्व सैन्याचा तळ डिचोली येथें पडला होता.

विसाजीपंताच्या मनात आपल्या सैन्यास फिरंग्यांनीं फोंडें महालातून जाण्यास खुषीनें वाट न दिली तर बळजबरीनें तिकडून जावें, असें होतें. त्यानें गव्हर्नरास लिहिलेल्या एका पत्रात असा त्यास स्पष्ट इशारा देऊन ठेविला होता कीं, "हैदरआलीची मसलत राहून गोवेचे रयेतीवर पडेल. पडल्यानंतर दुतर्फा नाश होईल. इकडून कबूल असे .." $

फिरंगी मुत्सद्यास मराठ्यांचा स्वभाव माहीत होता. गर्व्हेर्नरानें मोठ्या धीरानें लढाईची तयारी चालविली आणि शत्रूच्या सर्व वाटा रोखून धरल्या. वास्तविक पाहता विसाजीपंताच्या सैन्यापुढें पोर्तुगीज लोकांचा निभाव लागणे कठीण होतें. ही गोष्ट फिरंगी अधिकाऱ्यांहि ठाऊक होती. म्हणून गोर्व्हेर्नरानें विठ्ठलराव वाळवलीकर व श्रेणी यास पेशव्याकडे वकिलीस पाठवून फोंडें महालातून जर पेशव्याच्या सैन्यास आपण वाट दिली तर हैदरअलींशीं लढण्याचा आपल्यावर प्रसंग उद्भवणार ह्याची जाणीव पेशव्यास करून दिली.

श्रीमंत माधवराव पेशव्यास ह्या वेळीं फ्रेइ लियाद द मांद्रि द दऊस नामक पाद्री डॉक्टराचें औषध चालू होतें व त्यामुळें पेशव्याची त्याच्यावर फार मर्जी होती. गर्व्हेर्नरानें ह्या पाद्र्यामार्फत पेशव्याकडे वजन आणून विसाजीपंतानें फिरंग्याच्या वाटेस जाऊ नये, असें आज्ञापत्र मिळविलें ! विसाजीपंताचा हिरमोड झाला. त्यास वाटलें होतें कीं, व्यंकटराव घोरपडे इचलकरंजीकराप्रमाणें आपणास गर्व्हेर्नरास नामोहरम करण्याचें श्रेय लाभेल. पण त्याच्या आकांक्षा एका फिरंगी डॉक्टराच्या प्रयत्नामुळें निष्फळ ठरल्या !§

शिवाजीच्या उदयापासून पेशव्यांच्या अस्तापर्यंत गोवेकर फिरंगी सरकार व मराठे यामध्यें लढाईचे अनेक प्रसंग आले. पण समाजीच्या स्वारीखेरीज मराठ्यांकडून कॅथॉलिक धर्मांच्या दडपणाखालीं असलेला गोवाप्रांत घेण्याचा दृढ प्रयत्न झालेला दिसत नाहीं. ह्याचें कारण कोणतेंहि जरी असलें तरी एक गोष्ट सिद्ध आहे कीं, फिरंग्यांच्या ह्या लहानशा राष्ट्राकडे मराठ्यांनीं फारसें लक्ष्य दिलें नाहीं आणि ज्या मराठ्यांच्या स्वाऱ्या गोव्याकडे झाल्या त्यांचें उद्दिष्ट तात्पुरतेंच म्हणजे केवळ लूट मिळवावी ह्या पलीकडे दुसरें एखाद असल्याचें आढळून येत नाहीं, असें कबूल करणें म्हणावें लागतें.

उपरोक्त पोर्तुगीज विजरई मार्केज द आलार्नं ह्यानें स. १७५१ साली आपण पोर्तुगालास निघण्याच्या वेळीं लिहून ठेविलेल्या लेखात मराठ्यांविषयीं जे पुढील उद्गार काढिले आहेत ते लक्ष्यात ठेवण्यासारखे आहेत.

---

$ गोवें दप्तरांतील अप्रसिद्ध कागदपत्र

§ लेखकाचा Contribution à l'Etude de l'Histoire de la Medecine Portugaise dans l'Inde हा फ्रेंच निबंध ( पृ ६५–६६ )

"[ O Marata ] Como não faz a guerra nem por gloria, nem por defenc,a de causa justa, mas pela mera ambic,ão, e interesse de riquezas, não se inclina facilmente, sem ter algum fim particular, a descer os Gates no districto chamado Concão, em que se comprehende o de Goa, por ser pobre, e de que não pode tirar effeitos que satisfac,am a sua cubic,a, nem tão pouco gosta que se lhe disputem os passos com ferro e fogo de que nao resulte utilidade, e so perda di vidas, por esta razão se alguma vez entrou na Provincia de salcete, foi huma correria transitoria, e a unica em que se demorou no anno de 1739, foi por diversão, e por se ter empenhado na conquista da Provincia do Norte"§

भावार्थ—

"मराठे हे कीर्ति मिळविण्यासाठीं किंवा आपल्या न्याय्य हक्काच्या सरंक्षणासाठीं लढाई करीत नाहींत. तर ते केवळ संपत्तीच्या अभिलाषेनें लढतात. ते कांहीं तरी विशिष्ट फायद्याच्या हेतुशिवाय घाटावरून खालीं कोंकणात—ज्यात गोव्याचा समावेश होतो—उतरण्यास प्रवृत्त होत नाहींत. कारण कीं, हा प्रदेश गरीब आहे आणि त्याच्या लोभीपणाची तृप्ति होण्यासारखा फायदा त्यापासून त्याना मिळविण्याची आशा नसते. त्याचप्रमाणें त्याना घाटातून खालीं उतरताना ज्या पायवाटा लागतात तेथें शत्रूकडून सशस्त्र प्रतिकार होऊन आपल्या सैन्याचा जीव विनफायदा धोक्यात घालण्याची आवड नसते. मराठ्यानीं साष्टमध्यें ज्या ज्या स्वाऱ्या केल्या त्या त्या स्वाऱ्या म्हणजे केवळ तत्कालीन हुल्लडीच होत्या. स. १७३९ मध्ये मराठ्याची जी एक मोठी स्वारी [ ह्या प्रदेशात ] झाली तिचें कारण ते ह्यावेळीं उत्तर कोंकणच्या मोहिमेंत गुतले होते, हें होय."

[ या लेखातील सर्व तारखा न्यू स्टाइलच्या आहेत. ]

§ Instrucç,ão do Vice-rei Marquez de Alorna, 3a ed. 1903, p. 52-53

# मराठी राज्यांतील न्यायपद्धति

[ लेखक—नारायण गोविंद चापेकर, B. A., LL. B , बदलापूर ]

राजाचीं जीं कांहीं आवश्यक अशीं थोडी बहुत कर्तव्यें मानलीं जातात त्यापैकीं आपल्या प्रजेला न्याय देणें हें एक कर्तव्य होय. मनुष्य हा स्वार्थपरायण आहे, त्यामुळें त्याच्या हातून अन्याय घडल्याशिवाय राहाणार नाहीं, या अनुभवसिद्ध गोष्टीवर हें राजाचें कर्तव्य ठरलें गेलें. राज्यें जेव्हा लहान असत तेव्हा हें कर्तव्य स्वत. राजाकडूनच बजावलें जाई. परतु वाढत्या राष्ट्रात राजाला आपल्या वतीनें हें कार्य करण्यास अधिकारी नेमणें भाग पडतें. या अधिकाऱ्याना न्यायाधीश म्हणतात. न्यायाधीश हा शब्द अत्यंत अप्रयोजक दिसतो. न्याय काय आहे हें सागणारा न्यायाचा अधिकारी अगर स्वामी नसून दास असतो. न्यायशास्त्री हें नाव कदाचित् समर्पक होईल. असो. न्यायाधीश हा शब्द मराठीशाहींतच रूढ झालेला होता यात मात्र सशय नाहीं. व्यवहार हा प्राचीनतर शब्द मागें पडला आणि न्याय शब्द पुढें सरसावला.

न्यायपद्धतीचे मुख्य तीन घटक असतात. प्रथम न्याय अगर कायदा, नतर न्याय करणारा इसम आणि तिसरा न्यायदान करण्याची तऱ्हा. आता या प्रत्येकाचा विचार केला म्हणजे मराठेशाहींत न्याय पद्धतीचें स्वरूप कशा प्रकारचें होतें. याची आपणास थोडी बहुत कल्पना करता येईल.

प्रथमत. न्याय म्हणजे काय याचा आपण विचार करू. योग्य, उचित, अनुरूप, बरोबर तें न्याय्य असें आपण साधारणपणें समजतों. तथापि अमुक गोष्ट योग्य, उचित अथवा अनुरूप आहे हें तरी कोणी व कसें ठरवावयाचे ? एकाद्या माणसास जें योग्य वाटतें ते दुसऱ्यास अयोग्य दिसतें. तेव्हा योग्यायोग्य निश्चित करण्याचें प्रमाण कोणतें हा प्रश्न उद्भवतो. न्याय करणाऱ्या इसमास जें योग्य वाटेल तें योग्य अगर न्याय्य असेंच अखेरीस म्हणावें लागतें. परतु अशा स्थितींत न्यायदानाची अत्यत अनिश्चितता लोकाना जाचक झाल्याशिवाय राहाणार नाहीं. प्रजेनें अन्यायानें वागता कामा नये असें म्हटलें म्हणजे तिनें न्यायानें वागलें पाहिजे असें ओघानेंच प्राप्त होतें. तथापि प्रत्येक माणसाची विवेकशक्ति सारखी नसल्यामुळे न्यायानें वागण्याची प्रत्येकाची कल्पनाहि निराळीच असणार हें उघड आहे. आपल्या बुद्धीप्रमाणे एखादा मनुष्य एकादी गोष्ट न्याय्य आहे असें समजून वागला आणि दुसऱ्यास ती अन्यायाची वाटत असली तर पहिल्याचा हा दोष किंवा गुन्हा मानता येईल काय ? ही आपत्ती टाळण्या-

साठीं अर्वाचीन काळीं सर्व राष्ट्रांत अयोग्य वर्तन कोणतें तें स्पष्ट शब्दांत नमूद केलेलें असतें यासच आपण कायदा म्हणतों असे कायदे मराठी राज्यांत नव्हते व कायदे करण्याची जरूरीहि त्या वेळीं कोणास भासली नाहीं. लोकांनीं काय करावें व काय करूं नये अशाबद्दल मराठी राज्यकर्त्यांनीं वेळोवेळीं हुकूम काढलेले होते असें अद्यापि संशोधनकर्त्यांस आढळून आलें नाहीं प्राचीन हिंदु राज्यांत अशा प्रकारचे कायदे होते हें कौटिल्याच्या अर्थशास्त्रावरून स्पष्ट दिसते त्याचप्रमाणें स्मृतिग्रंथांतहि व्यवहाराचें म्हणजे कायद्याचें एक प्रकरण असतेंच स्मृतिग्रंथाहून कौटिलीय अर्थशास्त्र अधिक व्यापक आहे. निरनिराळ्या अपकृत्याबद्दल या दोन्ही प्रकारच्या ग्रंथांत दंड अथवा शिक्षा सांगितलेली आहे. परंतु आधुनिक दृष्टीनें पाहिलें असता गुन्ह्याच्या व्याख्या अपुऱ्या दिसतात असें कबूल करणें भाग आहे त्यांतहि कौटिल्यापेक्षा स्मृतींत हा दोष अधिक प्रमाणांत आढळतो तें कसेंहि असलें तरी त्या कोणत्याहि ग्रंथाचा उपयोग मराठी राज्यांत करीत होते असें मानण्यास पुरेसा आधार नाहीं मनुष्याच्या मिळकतीचा वारसा ठरविणें हें कायद्याच्या कक्षेंत पडतें, तवढ्यापुरताच स्मृतींचा उपयोग करण्यांत येई अशाबद्दल प्रमाणें मिळतात कारण अशा कामीं स्मृति पाहिल्याशिवाय गत्यंतरच नसते परंतु या व्यतिरिक्त इतर बाबतींत स्मृतींचा अमल असल्याचें आढळत नाहीं कौटिलीय अर्थशास्त्र तर ऐकूनहि कोणाला त्या वेळीं माहीत नसावें. अशा परिस्थितींत दहा माणसें ठरवितील तो न्याय असें होणें क्रमप्राप्त होतें.

कायद्याच्या अभावीं न्यायाधिशाचें अथवा न्यायासनाचें अस्तित्व असणें संभवत नाहीं कायदा काय आहे हें जाणून प्रजेला कायद्याप्रमाणें वागावयाला लावणें हें वस्तुत न्यायाधिशाचें काम नुसता राजाचा शब्द म्हणजे कायदा नव्हे कायदा हा निश्चित असावा लागतो आणि कायदा काय आहे हें लोकांस आधीं समजलें असावें लागतें राजा तोंडीं हुकूम काय करणार याची आगाऊ कल्पना प्रजेला असणें शक्य नाहीं, म्हणूनच राजाचा हुकूम म्हणजे कायदा असें कोणी समजत नाहीं कायदे कोणीहि केलेले असोत,—ते राजानें केले काय अथवा प्रजेनें केले काय एकच म्हणजे ते एकाकडून झाले असोत अगर अनेकांकडून झालेले असोत, त्यांच्या कायदेशीरपणाला त्यामुळें बाधा येत नाहीं सारांश, मराठी राज्यांत कायदे नव्हते ही गोष्ट निश्चित असताहि न्यायाधीश नमण्यात येत असत हें जरा चमत्कारिक दिसतें आमच्या मतें हे अधिकारी, ज्यांना न्यायाधीश ही संज्ञा शिवाजीच्या वेळींच देण्यांत आली होती, ते खरेखुरे न्यायाधीश नसून न्यायाधिशीखालील काम करणारे कारकून असावेत याच्या पलीकडे या अधिकाऱ्यांचें महत्त्व नव्हतें विशेषत पेशवाईंत तरी हा प्रकार निरपवाद असावा असें मानण्याची प्रवृत्ति होते याचें एक लक्षण असें सांगता येईल कीं, न्यायाधिशाच्या ठिकाणीं अमुक एक गुण असले पाहिजेत असा काहीं निर्बंध असल्याचें दिसून येत नाहीं वेदविद्या, तर्कशास्त्र, षड्दर्शनें, वेदान्त या विषयांत ज्याप्रमाणें परीक्षा घेण्यांत येत असे त्याप्रमाणें न्यायाधिशाची परीक्षा पेशवाईंत घेतली जात असे असें ऐकिवांत अगर वाचण्यांत नाहीं कोणीहि इसम न्यायाधीश होण्यास पात्र मानला जाई. पेशवाईंत अत्यंत प्रसिद्धीस आलेले रामशास्त्री याचा गुरु कोण होता, त्यानें अध्ययन कोणत्या विषयांत व किती वर्षे झालें, याची आपणास फारशी

माहिती नाहीं. तथापि ते वेदशास्त्रसंपन्न होते असें धरून चालण्यास प्रत्यवाय नाही. रामशास्त्र्याची ख्याति त्याच्या विद्वत्तेपेक्षा त्याच्या निःस्पृहपणाबद्दलच अधिक झालेली दिसते. आता रामशास्त्री विद्वान् होते असें मानलें तरी न्यायाधीश म्हणून त्याचा उपयोग शास्त्राच्याच कामीं केला जात असे असें नाहीं. वतनाचे दावेहि त्याच्याकडे निकालाकरिता जात. वारसाचा प्रश्न उद्भवल्यास कदाचित् त्याच्या शास्त्राध्ययनाचा उपयोग व्हावयाचा. असो. कायदे नाहींत तेथें वादविषयासंबंधानें निकाल पूर्वापार वहिवाटीच्या आधारावरच झाला पाहिजे हें उघड आहे. तेथें रामशास्त्र्याच्या विद्वत्तेचा काय उपयोग ? वहिवाट काय आहे ती लोक सांगणार. म्हणूनच मराठी राज्यांत प्रत्येक दिवाणी स्वरूपाचें काम पंचाकडे सोंपविण्यांत येई. मारामाऱ्या, शिवीगाळ वगैरेसारख्या गुन्ह्यांची चौकशी पाटील, मामलेदार, कोतवाल इत्यादि अधिकाऱ्याकडून केली जाई. त्यांना शास्त्राचा गंधहि नसे, व त्यास त्याची उणीवहि कधीं भासली नाहीं. लोक समजुतीनें जें बरोबर तें न्याय्य, लोकदृष्ट्या जे गर्हणीय ते अन्याय्य हीच न्यायान्याय ठरविण्याची कसोटी.

मराठी राज्यांत वतनाचे दावेच फार असत. न्यायान्यायामधील सूक्ष्म भेद त्या वेळीं लोकांच्या लक्षांत आला होता असें दिसत नाहीं. कांहीं अन्याय्य वर्तन वैयक्तिक स्वरूपाचें असतें तर दुसरें सामाजिक स्वरूपाचें असतें. ऋणकोनें सावकाराचें कर्ज न देणें हें पहिल्या प्रकारचें उदाहरण आहे, आणि चोर दुसऱ्याच्या घरांत शिरून चोरी करतो हें दुसऱ्या प्रकारचें उदाहरण होय. चोर एकाच माणसाकड चोरी करतो, तो सर्व समाजाला एकाच वेळीं लुबाडतो असें नाहीं. परंतु तो ज्या माणसाकड चोरी करतो त्या विशिष्ट व्यक्तीवर त्याचा डोळा नसतो. चोरी करण्यास जें घर त्याला सोईचें आढळतें तेथें शिरून तो आपला कार्यभाग करून घेतो या दृष्टीनें चोरी करणारा इसम हा समाजकंटक समजला जातो याच्या उलट देवघेवीच्या व्यवहाराची व्याप्ति फक्त विशिष्ट व्यक्तींपुरतीच असते. हा भेद लक्षांत न आल्यामुळे, चोरी, खून यासारखे गुन्हे हे वैयक्तिक स्वरूपाचेच आहेत, असें समजून त्यास शिक्षाहि तशाच स्वरूपाची देण्यांत येई.

शेवटचा प्रकार म्हणजे इंग्रजी भाषेंत ज्याला "प्रोसीजर" म्हणतात तो होय त्याबद्दल मराठी राज्यांत कांहीं नियम असल्याचें दिसत नाहीं. कामाच्या पद्धतीचें शास्त्र बनलें नव्हतें. मुख्य दोष म्हणजे वकिलांचा वर्ग निर्माण झाला नव्हता याचें कारण उघडच आहे कायद्याचा अर्थ करण्याच्या कामीं न्यायाधिशाला साह्य करणें हें या वर्गाचें मुख्य काम. पण जेथे कायदाच अस्तित्वांत नाहीं तथें वकील जन्मास कसा यावा ? धर्मशास्त्र अगर अर्थशास्त्र जारी असतें तर वकीलवर्ग अस्तित्वांत आला असता व एकंदर न्यायपद्धतीचें शास्त्र बनलें असतें. न्यायशास्त्र बनण्यास न्यायाधिशापेक्षाहि वकिलाचा उपयोग अधिक होतो मराठी राज्यांत वकीलवर्ग निर्माण झाला असता तर सर्व राज्यकारभाराचें स्वरूप पालटलें असतें. राज्यकारभाराला वळण लावण्यास वकीलच मुख्यत्वेंकरून कारणीभूत होतात. शास्त्री–वकिलांकडून धर्मशास्त्रविषयक तक्रारी न्यायाधिशाच्या समोर मांडल्या गेल्या असत्या तर हिंदुधर्माला आजची अवनत स्थिति प्राप्त झाली नसती. समाजाचा अथवा राष्ट्राचा सर्वांगीण उत्कर्ष निष्णात वकीलवर्गावर अवलंबून असतो.

कोणतेच नियम नसल्यामुळें फिर्याद प्रथम कोणाकडे द्यावयाची हेंहि ठरलेलें नव्हतें. पाटील कुळकर्ण्यांपासून तों पंतप्रधानापर्यंत कोणाकडेहि फिर्याद घेऊन जावें; आणि यात काहीं वावगें होतें असे नाहीं. कारण ज्याच्याकडे फिर्याद घेऊन जावयाचें त्यानें त्या फिर्यादीचा निकाल करावा अशी कोणाचीच अपेक्षा नव्हती. फिर्याद घेतल्यावर वादीप्रतिवादींना त्याच्याच सल्ल्यानें पंचायत नेमून दिली म्हणजे त्या अधिकाऱ्याचें काम संपलें. पंचाना मान्यता, तसेंच त्यांच्या निर्णयाप्रमाणें वागण्याविषयीं वचन या संबंधानें पक्षकाराकडून लेख लिहून घेण्यात येत असे. याचा अर्थ, वादाच्या निर्णयाची जबाबदारी पक्षकारांवर पडे, सरकारवर पडत नसे. सरकार व पक्षकार यांच्या दरम्यान या व्यवहाराला करारांचें स्वरूप दिलें जाई. सरकारातून कोणाहि एकाला मुन्सफी सांगण्यांत आली तरी तो मुन्सफ गांवांतील अनेक जातींच्या लोकांना, विशेषतः बलुतेदाराना व वतनदाराना बोलावून त्यांच्या सल्ल्यानें निर्णय देई. कधीं कधीं तर न्याय देण्याचा राजाचा सर्वमान्य हक्क नाकारून जातींच्या भांडणाचा निकाल जातीनेंच केला पाहिजे असा हक्क पुढें करण्यात येई आणि सरकार तो मान्यहि करी.§

कोणत्याहि हक्कासंबंधाने फिर्याद चालत असे. ज्यांत पैशाचा संबंध नाहीं अशा मानपानाच्या फिर्यादींचीसुद्धां चौकशी करण्यात येई. खोटीं भुतें घातलीं, या तक्रारी विचारात घेतल्या जात. सारांश अमुक गोष्ट फिर्यादीचा विषय होत नसे असे नाहीं. मानपान ही एक महत्त्वाची सामाजिक बाब असल्यामुळें स्वराज्यात तिच्याकडे दुर्लक्ष करून चालत नसे. यांत काहीं वाईट आहे असें नाहीं.

एकदा निर्णय झालेली गोष्ट कोणत्या ना कोणत्या सबबीवर पुन्हा उकरून काढता येई. याला अगदींच अपवाद नाहीं असें नाहीं. खुनाच्या खटल्याचा एकदा निकाल लागल्यावर पुन्हा चौकशी कां केली असा एक प्रश्न थोरल्या माधवरावसाहेबांनीं आपल्या अधिकाऱ्यास विचारल्याचें इतिहासांत नमूद आहे. काहींच सबब नसली तर मात्र पुनः चौकशी होत नसे.‡

निर्णित विषयाची बाधा ज्याप्रमाणें कोणत्याहि दाव्यास होत नसे त्याप्रमाणें अमुक दावा अमुक मुदतींत आणला पाहिजे असा निर्बंध नव्हता. स्मृतिकारांनींसुद्धा वीस वर्षांच्या स्वतंत्र उपभोगानें आणि विरुद्ध कबजानें मालकी हक्क निर्माण होतो असा सिद्धांत प्रस्थापित केला असूनहि† मराठी राज्यात कितीहि वर्षांनतर फिर्याद केली तरी तिला मुदतीची हरकत नसे. उपरिनिर्दिष्ट स्मृतिकारांचें तत्त्व एखाद्या दाव्यास लावल्याचें अद्यापि आढळण्यात आलेलें नाहीं. या एकाच गोष्टीवरून दाव्याचा निकाल करण्याच्या कामीं स्मृतींचें अध्ययन अथवा उपयोग न्यायाधिशाकडून केला जात असे असें वाटत नाहीं.

सामान्यतः एकतर्फी निकाल न करण्याकडेच प्रवृत्ति असे. न्यायाला करारांचें स्वरूप आल्यानें एकतर्फी निकालाचा संभवच नव्हता. वादीनें फिर्याद केली आहे, ही गोष्ट प्रति-

---

§ वाड २-३७.

‡ भट– भा. इ. सं. मंडळ द्वितीय संमेलन वृत्त, पृ. १५१.

† पश्यतोऽब्रुवतो भूमेर्हानिर्विंशतिवार्षिकी–याज्ञवल्क्य, असाधारणमातृका प्रकरण, श्लोक २४.

वादीला कळविण्याची जबाबदारी सरकारावर, मसालाचिठीप्रमाणें हजर होण्याची अगर न होण्याची जबाबदारी प्रतिवादीवर अशी समजूत नव्हती. सरकारी न्यायपीठें नसलीं म्हणजे असें होणें अगदीं स्वाभाविक आहे. गावातील सामान्य लोकाकडून पंच म्हणून तंट्याचा निकाल केला जाई अशा लोकांना एकतर्फी निकाल करण्याचें धैर्य क्वचितच असतें. त्याचप्रमाणें सरकारी बोलावणें आल्यावर हजर न होण्याचें धाडसहि लोकांमध्यें असेल असें वाटत नाहीं.

एकदरीत न्याय करण्याच्या पद्धतीला शास्त्रीयता प्राप्त झाली नसली तरी मराठी राज्यात लोकावर अन्याय होत असे असें मानण्यास बिल्कूल आधार नाहीं. उभय पक्षकाराच्या समतीनें पंचायती करणारे इसम नेमण्यात येत असत. आपल्या गावच्या लोकाकडून पक्षपात होण्याचा संभव आहे असा संशय आल्यास पक्षकार आपला दावा चालण्यास अन्य ठिकाण मागून घेई. यालाच "स्थल नेमून देणें" म्हणत. आपणच सुचविलेल्या लोकांनीं निर्णय दिला, म्हणजे तो मुकाट्यानें मान्य करणें भाग पडे एकाद्या दाव्यात चालीरीतीचा प्रश्न उद्भवत असला तर पक्षकाराच्या जातींतील लोकांच्या साह्यानें तंट्याचा निकाल करण्यात येई§ वतनाचा प्रश्न असल्यास गावातील सर्व वतनदार, बलुतेदार यांच्या सल्ल्यानें किंवा मदतीनें त्या प्रश्नाचा निकाल लागत असे नुसत्या शेतीवर निर्वाह करणाऱ्या लोकात किंवा समाजात भानगडीचे प्रश्न फारसे उद्भवत नाहींत. सामान्य माणसाच्या बुद्धीला पेलतील असेच साधे प्रश्न कोणत्याहि दाव्यात उत्पन्न होणार हे उघड आहे. ज्या राष्ट्रात उद्योगधंदे मोठ्या प्रमाणावर चालतात तेथें उद्भवणाऱ्या प्रश्नाचा निकाल करण्यास सूक्ष्म बुद्धीची आवश्यकता भासते. त्यामुळें सामान्य माणसाच्या पंचायतीकडून जरी तंटे तोडले जात असत तरी त्यामुळें अन्याय होण्याचा संभव नव्हता. शिवाय गावातील सर्व प्रमुख लोकांसमक्ष पक्षकाराचें म्हणणें व साक्षीपुरावा ऐकिला जाई त्यामुळेंहि अन्याय होण्याची भीति राहात नसे व हरलेल्या माणसाला तक्रार करण्यास जागा उरत नसे.

सरकारी दप्तरात निकालपत्रें जतन करून ठेवण्याची वहिवाट होती. तसेंच या निकालाची नोंद बारनिशींतहि केली जाई त्यामुळें त्याच विषयासंबधानें पुन्हा तटा झाल्यास पाठीमागील दाखला पाहाण्याची सोय झाली होती. न्यायाधिशानें पूर्वीच्या निकालाचे कागद मागून घेतल्याची उदाहरणें सापडतात†. एका शिवेच्या कज्ज्यात ७५ वर्षापूर्वीचे कागदपत्र मागितले होते. † पक्षकार पुरावा हजर करतील तवढाच घ्यावयाचा असा निर्बंध नव्हता. न्यायाधिकारी आपण होऊन अधिक पुरावा घेत असत पुष्कळ दाव्याचा निकाल क्रिया घालून म्हणजे शपथेवर होत असे अमल्या गोष्टींवर लोकांचा विश्वास असल्यानें झालेला निकाल खुषीनें मान्य केला जाई.

सर्वांत मोठी सोय म्हणजे हल्लींप्रमाणें न्याय मागण्यास पैशाची अडचण आड येत नसे ब्रिटिश अमदानींत न्याय मागणाऱ्या माणसाला पैशाची तजवीज प्रथम करावी लागते आणि त्याकरिता त्याच्यावर कित्येक प्रसंगीं घरदार विकण्याची पाळी येते गरीब, दरिद्री

§ पेशवाईच्या सावलींत, पृ १०३

† वतन पत्रें, निवाडा पत्रें, पृ ५८, ६१

लोकाना तर त्याच्यावर कोणीहि जुलूम केला तरी त्याची दाद लावून घेणें हल्लींच्या न्याय पद्धतींत अशक्य झालें आहे. मराठी राज्यात फिर्याद घेऊन जाताना पैसे खर्च करावे लागत नसत. जिंकलेल्या माणसाकडून नजर व हरलेल्या माणसाकडून हरकी अगर दंड सरकारात भरावा लागे ही गोष्ट खरी परंतु हा कर दाव्याचा निकाल झाल्यावर द्यावा लागे, अगोदर नाहीं, ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. आणि शिवाय ही शेरणी जीवन माफक असावी असा कटाक्ष असल्यामुळें लोकाना हा कर जाचक होत नसावा. काहीं थोड्या ठिकाणीं निवाडा करून घेण्यासाठीं पेशव्यास आधीं नजर दिल्याचीं उदाहरणें नमूद आहेत. त्याचप्रमाणे एका खुनाच्या खटल्यात सरकारची गुन्हेगारीची रक्कम आधीं ठरली असल्याचें दिसतें. परंतु हा सर्वसाधारण नियम नव्हता हें खास.

प्रचलित न्यायपद्धति निर्जीव यंत्राप्रमाणें भासते हा एक तिच्यात मोठा दोष आहे परंतु पूर्वी सहृदयता, सहानुभूति, माणुसकी इत्यादि गुण, संशोधकानीं आजपर्यंत जीं निवाडपत्रें संग्रहित केलीं आहेत त्यावरून प्रतीत होतात. उदाहरणार्थ–तुरुंगातील कैदी आजारी पडल्यास त्यास जामीन घेऊन मुक्त करण्यात येत असे. तसेंच त्याचा जवळचा नातेवाईक मृत झाल्यास त्यास क्रियाकर्मांतर करण्यासाठीं काहीं काल मोकळें केलें जाई. कैद्याच्या समाजातील दर्जाप्रमाणें त्यास आहार मिळण्याची व्यवस्था करीत असत. तुरुंगात कैद्याच्या औषधोपचाराची तरतूद होई यात आश्चर्य नाहीं. कारण दावा चालू असताना साक्षीदार आजारी पडला तर त्यालाहि औषध देण्याकरिता सरकारातून पैसे खर्च पडत †. साक्षीदारावर रखवाली ठेवण्यासाठीं सरकारातून शिपाई ठेवण्यात येई. अशा रीतीनें पंचाना सरकारकडून मदत मिळे पण या व्यतिरिक्त पंचाचें काम सर्व प्रकारें निरपेक्ष असे यात संशय नाहीं. आपल्या नजरेपैकीं अथवा हरकींतून सरकारनें काहीं भाग पंचाना दिला असें उदाहरण अद्यापि बाहेर आलें नाहीं

हल्लीं फिर्यादीला स्टँप लावून ती दाखल करावी लागते तसा प्रकार पूर्वी नव्हता हें पूर्वी सांगितलेंच आहे. मात्र समन्साची प्रोसेस फी हल्लीं पक्षकाराना कोर्टात भरावी लागते त्याप्रमाणें पूर्वी पक्षकाराकडून पैसे घेऊन जासुदाबरोबर मसाल्याच्या चिठ्ठ्या (समन्सें) पाठविण्यात येत. परंतु पक्षकारानें पैसे न भरल्यास दाव्याचें काम अडून राहात नसे सरकारातून पैसा आदा करून जासूद पाठविला जाई. †

या सर्व गोष्टींवरून न्याय मागण्याच्या मार्गांत अवास्तव अडथळे ठेवलेले नव्हते हें दिसून येईल.

सारांश, शास्त्राध्ययनाकडे दुर्लक्ष केलें तर सद्यकालीन समाजापेक्षाहि इंग्रजपूर्व समाज अधिक सुखी होता असें आम्हास वाटतें त्याचें कारण असें कीं तत्कालीन न्यायपद्धति तत्कालीन समाजाला अनुरूप होती अर्थशास्त्र व स्मृतिग्रंथ यांत पारंगत असलेल्या न्यायाधिशाकडून त्या शास्त्राचा उपयोगच नव्हे तर विकास व्हावयास पाहिजे होता, तो तसा झाला नाहीं ही तक्रार करण्यास जागा राहिली यात मात्र संशय नाहीं.

---

† वनवरें, निवाडापत्रें, पृ. ५८, ६१

# मराठे, रजपूत व शीख

[ लेखक—नारायण केशव वेहेरे, M A B Sc L T नागपूर ]

हिंदुस्थानचा इतिहास लिहितांना मराठ्यांच्या पराक्रमाकडे व त्यांच्या स्वराज्याकडे दुर्लक्ष करण्याचा आग्रह व हिंदी इतिहासकाराचा पूर्वी प्रघात होता मराठ्यांनीं मोगलांना 'खो' देऊन स्वतंत्र मराठी राज्य स्थापन केलें, एवढेंच नव्हे तर मोगल साम्राज्याशीं निकराचा लढा लढून तें साम्राज्य खिळखिळें केलें आणि त्या मोडकळीस आलेल्या मोगल साम्राज्यांतून मराठी साम्राज्याची इमारत उभारली, ही गोष्ट इतिहासकार मुद्दाम दृष्टिआड करीत असत इंग्रजांना मनांतून मराठ्यांचा द्वेष वाटत असे कारण हिंदुस्थानांत सार्वभौम सत्ता स्थापतांना त्यांच्या आड मराठेच आले मराठ्यांशीं अनेक लहानमोठ्या लढाया मारूनच इंग्रजांना या देशांत आपलें आसन स्थिर करतां आलें हिंदुस्थान मराठ्यांपासून इंग्रजांनीं जिंकून घेतला मनुष्यस्वभाव असा आहे कीं, पूर्वीच्या मालकाची खरीखोटी निंदा केल्यावांचून नव्या मालकाला आपली प्रतिष्ठा स्थापन झाली असा विश्वास वाटत नाहीं कोणताहि अधिकारी एखाद्या ठिकाणीं बदलून गेला, म्हणजे पूर्वीच्या अधिकाऱ्याची थोडीबहुत निंदा करतोच करतो तो इतरांना वाखाणील, परंतु ज्याच्या जागीं तो येतो त्याचीं कुसळें शोधून त्यांना मुसळाचें स्वरूप दिल्याशिवाय तो राहात नाहीं हा व्यक्तीचा नियम जमातींनाहि लागू पडतो तेव्हां इंग्रजांनीं मराठ्यांपासून हिंदुस्थानचें राज्य जिंकून घेतल्यामुळें मराठ्यांना तुच्छ लेखण्याची त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति बनली मराठे म्हणजे चोर, भुरटे, लुटारू! इतिहासांत त्यांना मग कसें स्थान मिळणार? निःपक्षपाती म्हणविणाऱ्या इंग्रज इतिहासकारांनाहि ही धुंदी चढली टॉडनें रजपुतांच्या वीर्यकथा गौरवानें रंगवून सांगितल्या सवेलने विजयनगरच्या वैभवशाली हिंदु राज्याचा इतिहास भडक कुंचलीनें उघड उघड अतिशयोक्तिपूर्ण वाटण्याइतका रेखाटण केला मोगलांच्या स्तुतिपर तर अनेक इंग्रजी ग्रंथ निर्माण झाले रणजितसिंहावर सुमनांजली वाहण्यांत आली फार काय, पण हैदरअली व त्याचा क्रूर पुत्र टिपू यांनाहि इंग्रजांकडून प्रसंगोपात्त प्रशस्तिपत्रें मिळालीं परंतु मराठ्यांच्या शिवाजीच्या कपाळीं लागलेला लुटारूपणाचा टिळा मात्र वज्रलेप झाल्यासारखा दिसूं लागला मग ब्राह्मण पेशव्यांनीं त्यांनीं आपल्या त्यागी पराक्रमाच्या जोरावर मराठी स्वराज्याचें साम्राज्यांत रूपांतर केलें असलें तरी, पर्वा कोणता इंग्रज इतिहासकार करील? आणि आज शिवाजीविषयीं इंग्रजांना प्रेमाचा पान्हा फुटलेला दिसत असला, तरी पेशव्यांच्या कपाळींची निंदा व विपर्यस्त टेहाळणी अजूनहि टळली नाहीं कारण इंग्रजांना हिंदुस्थानचें राज्य बळकावतांना शिवाजीशीं थोडेंच लढावें

लागलें ! चित्पावन ब्राह्मण पेशवे व त्याचा तसलाच ब्राह्मण मुत्सद्दी नाना फडणीस यांनी इंग्रजांची बरेच दिवस डाळ शिजू दिली नाही. तेव्हा ब्राह्मणाचा इंग्रजांना राग का न यावा ? आणि हिंदी इतिहासकार तर इंग्रज इतिहासकाराच्या ओंजळ्यानेच दूध पीत असत. महमद घोरीनें इ. स. ११९२ साली पृथ्वीराजाचा पराभव केला, तेव्हापासून जी पठाणी रियासत सुरू झाली, ती इब्राहिमखान लोदीचा इ. स. १५२६ मध्यें बाबरानें पानपत येथें पराभव करीपर्यंत चालू राही. आणि १५२६ साली पानपतास चालू झालेल्या मोंगल रियासतीचा शेवट १८५७ सालच्या युद्धानंतर शेवटच्या बहादुरशाहाची दिल्लीहून ब्रह्मदेशांत उचलबांगडी झाल्यानंतरच झाली. १८५८ नंतर तर इंग्रजांची उघडी नागडी रियासत चालू झाली व आजच्या घडीलाहि ती तशीच चालू आहे. तेव्हा हिंदुस्थानच्या गेल्या सहाशें सातशें वर्षांच्या इतिहासांत मराठ्यांना स्थान देण्याइतका कालखंडच इंग्रज व हिंदी इतिहासकाराच्या दृष्टीनें उपलब्ध नव्हता. मोंगल रियासतीचा सविस्तर इतिहास लिहितांना केवळ नाइलाज म्हणून, चोर व लुटारू ठरलेल्या मराठ्यांचा प्रसंगोपात्त आनुषंगिक उल्लेख अधूनमधून इतिहासकार करीत असत.

परंतु मालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकरांपासून महाराष्ट्रांत नव्या युगाचा प्रारंभ झाला. काव्येतिहाससंग्रह हें मासिक चिपळूणकरांनींच सुरू केलें. आपल्या प्राचीन तेजस्वी इतिहासाची व ओजस्वी वाङ्मयाची लोकांना ओळख पटावी व तेणेंकरून त्याचा स्वाभिमान वाढावा आणि स्वत्वाची सर्वस्वी होळी करणाऱ्या परसत्तेची भ्रामक झापड त्यांच्या डोळ्यांवरून नाहीशी व्हावी, स्वराज्याची लहान सुराज्यानें भागणें शक्य नाहीं असें त्यांना वाटू लागावें आणि परकीय सत्तेचें उच्चाटण करण्याच्या प्रयत्नास त्यांनीं लागावें, असाच थोर व पवित्र हेतु शास्त्रीबुवांच्या व त्यांच्या सहकाऱ्यांच्या मनांत होता. शास्त्रीबुवांनीं जी जी देशहिताचीं कामें आरंभिलीं त्यांची त्यांची एकसारखी गौरवास्पद वाढच होत गेली व त्यांनीं रुजू घातलेल्या बियांचे प्रचंड वृक्ष होऊन त्यांना फळे फुटूं लागलीं. चिपळूणकरांनीं आरंभलेलें ऐतिहासिक संशोधनाचें कार्य साने, राजवाडे, पारसनीस, खरे व सरदेसाई यांनीं नेटानें पुढें चालविलें. या पांच महर्षींच्या कार्यांनें अनेकांना इतिहाससंशोधनाची, अभ्यासाची व लेखनाची स्फूर्ति झाली आणि मराठ्यांच्या पराक्रमाचा व कर्तबगारीचा साग्रसंगीत व साधार इतिहास निर्माण झाला. या कार्याला अनेक लहानमोठ्यांचे हातभार लागत आहेत, परंतु हिंदुस्थानच्या इतिहासांत मराठी रियासतीचें स्वतंत्र दालन खोलण्याची आणि इतर इंग्रज व हिंदी इतिहासकारांकडून त्या दालनाला मान्यता मिळविण्याची अमोलिक कामगिरी या पांच महर्षींनींच मुख्यत्वेंकरून पार पाडली. त्यातल्या त्यांत श्री. गो. स. सरदेसाई यांची कामगिरी महाराष्ट्राच्या इतिहासमंदिरावरील सुवर्णकलशाप्रमाणें भरीव व शोभिवंत झाली आहे. त्यांच्या इतिहाससंशोधना मुळें, त्यांच्या दीर्घ व्यासंगामुळें, त्यांच्या महासागराप्रमाणें विस्तीर्ण पसरलेल्या लेखनामुळें, त्यांच्या चिकाटीमुळें व त्यांच्या गोड्या स्वभावामुळें हिंदुस्थानच्या इतिहासांत मराठी रियासतीचा स्वतंत्र व नामवंत सुभा स्थापन झाला व सर्वांनीं त्याच्या सिंहाचा छावा म्हणून मान्यता दिली. ब्राह्मण पेशव्याचे व त्याच पराक्रमी ब्राह्मण सेनापति पटवर्धन, फडके, रास्ते, गोखले यांचे आक्रमक व धडाडीचें राजकारण सर्वांना विदित झालें व ब्राह्मण पेशव्यांचें महत्त्व तात्पुरतें सुटलें.

मराठी राज्याच्या स्थापनेचा इतिहास अद्भुत आहे. एखाद्या मृत राष्ट्राच्या रक्षेतून पुराणप्रसिद्ध फिनीक्स पक्ष्याप्रमाणें दुसऱ्या नव्या राष्ट्राचा जन्म झाल्याचीं उदाहरणें जगाच्या इतिहासांतून अनेक काढून दाखवितां येतील. परंतु एका अत्यंत बलिष्ठ साम्राज्याच्या छातीवर पाय देऊन नव्या चिमुकल्या राष्ट्रानें जन्मास येऊन दंड थोपटून युद्धास तयार व्हावें आणि एका म्यानांत दोन तलवारी नांदत असल्याचा आश्चर्यकारक देखावा जगास दाखवावा आणि पितामह भीष्म आपल्या तारुण्यरूपी शक्तीच्या घमेंडींत गर्क असताना एखाद्या शिखंडीनें त्याचा सहजगत्या गर्व हरण करावा व त्याला अश्रु ढाळावयास लावून मग अर्जुनानें त्याच्यानें भिरवावें असलीं चमत्कारी अद्भुत कथानकें जगाच्या इतिहासांत फारच थोडीं सांपडतील. मोगल साम्राज्याची सत्ता औरंगजेबाच्या मृत्यूनंतर ढासळूं लागली. परंतु शहाजहान व औरंगजेब या दोन सम्राटाच्या कारकीर्दींत मोगल साम्राज्याचें वैभव कळसास पोंहोचलें होतें. जगप्रसिद्ध कोहिनूर हिरा मस्तकीं धारण करून व मयूर सिंहासनावर आरोहण करून ताजमहालाची भव्य व दिव्य शोभा अवलोकन करत करत समाधानानें स्वत:च स्वत:ला धन्यवाद देणाऱ्या शहाजहान बादशहाशीं लढण्यास दक्षिणेंतील चिमुकल्या अहमदनगरच्या निजामशाहीचा तुटपुंजा मराठा पाटील-सरदार शहाजी-दंड थोपटून तयार झाला. त्यामुळेच शिवभारत रचणाऱ्या परमानंद कवीला दक्षिणेंतील शहाजी व उत्तरेकडील शहाजहान यांची तुलना करण्याचा मोह आवरला नाहीं. हा चुरशीचा सामना पुढच्या पिढ्यांनीं अधिक नेटानें व निकरानें चालविला. कडव्या इस्लामधर्मी औरंगजेबाचा नक्षा शिवाजी राजांनीं उतरवला व स्वत:स 'गोब्राह्मणप्रतिपालक आणि हिंदवी स्वराज्याचे संस्थापक' असें हिंदुस्थानांतून म्हणवून घेतलें. भूषणासारख्या उत्तर हिंदुस्थानांतील हिंदी कवीला देखील त्यामुळें शिवाजी राजे जन्माला आले नसते तर हिंदूंची शेंडी गमावली असती व सर्वांचा सुंता झाला असता असें अभिमानपूर्वक लिहावें लागलें. शिवाजी महाराजांनीं स्वत:स वैदिक धर्मानुसार राज्याभिषेक करवून घेतला व औरंगजेब बादशहास मनगटें चावावयास लावलें. पुढें तर मराठ्यांचीं पाळेंमुळें खणण्याचा निश्चय करून औरंगजेबानें दिल्ली सोडून दक्षिणेंत औरंगाबादेस पंचवीस वर्षें तळ दिला व मोगलशाहीचा सर्व पराक्रम, द्रव्य व वैभव इरेस घातलें. तरी मराठे नामशेष झाले नाहींत. माणुसकीला निलाजरेपणाचा काळाकुट्ट कलंक लागेल अशा रीतीनें राजे संभाजीचा औरंगजेबानें वध केला. तसे माडसानें कैदेंत असहाय्य सांपडलेल्या या महाराष्ट्राच्या नरसिंहाचे डोळे तर फोडले, त्याची जीभ बाहेर ओढून खाटकाप्रमाणें सुरीनें तर कापली आणि वाघाचें भरीत करताना तें भाजून त्याची साल सोलतात त्याप्रमाणें संभाजी राजाच्या अंगाचें कातडें सोलून काढलें. एवढ्या भयंकर हालअपेष्टा झाल्या व सार्वजनिक विटंबना झाली, तरी त्या धर्मवीरानें हिंदुधर्माचा त्याग करून इस्लामी धर्माचा स्वीकार केला नाहीं. संभाजी राजाच्या मृत्यूनंतर त्याची साध्वी राणी येसूबाई व युवराज बालशिवाजी मोगलांच्या बंदींत पडले तरी मराठे नामोहरम झाले नाहींत. त्यांनीं तसाच नेटानें तो स्वातंत्र्यसंग्राम चालू ठेवला. अखेर बादशहा औरंगजेब थकला व मेला, पण मराठे थकले नाहींत. बादशहाला मरताना देखील पुन्हा दिल्ली दिसली नाहीं. पंचवीस वर्षापूर्वी त्यानें उत्तर हिंदुस्थानांतून मराठ्यांना ठेचून मारण्याकरितां दक्षिणेकडे प्रयाण केलें, तें शवरूपानेंच

ठरलें व दक्षिणेंतच त्याची अखेरीस कबर बांधावी लागली. आणि औरंगजेबाच्या मृत्यूनंतर बारा वर्षांच्या आंतच मराठी राज्याचे पंतप्रधान पेशवे बाळाजी विश्वनाथ भट यांनी दिल्लीवर सय्यदांच्या साह्यासाठीं चढाई करून स्वराज्याच्या व चौथाई–सरदेशमुखी करवसुलीच्या सनदा सातान्यास आणल्या. त्यानंतर बाजीराव पेशव्यानें मराठ्यांचा दरारा मोगल बादशाहीस पटण्यासारखे अनेक युद्धप्रसंग निर्माण केले, मोहिमा केल्या, निजाम व अहमदशहा बंगष अशा पराक्रमी मोगल सुभेदारांचा धुव्वा उडविला व नर्मदेच्या उत्तरेकडील प्रांत जिंकून मराठी राजकारण उत्तराभिमुख केलें. नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दीच्या अखेरीस पानपतचा जबरदस्त धक्का बसला तरी देखील मराठी स्वराज्याचे साम्राज्यात रूपांतर झालें आणि पेशव्याचे उत्तरेकडील वकील अटक ओलांडून रूमशामवर स्वारी करण्याच्या गोष्टी बोलूं व पत्रांतून लिहूं लागले. पानपतच्या पराजयाचा पुरा मोबदला माधवराव पेशव्यानें घेतला व आडदांड रोहिल्यांना 'दे माय धरणी ठाय' करून भरडून काढलें. पानपतच्या युद्धानंतर बरोबर दहा वर्षांनीं दिल्लीवर मराठी अंमल जमला व मोगल बादशाहा शिंद्यांच्या हातातील नामधारी बाहुलें बनला. पानपतच्या युद्धानंतर दोनच वर्षांनीं निजामाची राक्षसभुवनच्या लढाईंत पेशव्यांनीं दाणादाण उडविली, हैदर व टिपू यांच्यावर स्वाऱ्या करून त्यांना पराभूत केलें आणि मराठेशाहीचें वैभव अधिकच वाढवून पानपतच्या अपयशाचा डाग धुवून काढला. परंतु मराठेशाहीचा हा वीररसात्मक इतिहास अवघा दीडशें वर्षांचा आहे. शहाजी व शिवाजी या पिता–पुत्राची जरी सारखी पंचवीस वर्षे धडपड चालू होती तरी इ. स. १६४४ सालीं शिवाजी महाराजांनीं कोंडाणा उर्फ सिंहगड किल्ला मुसलमानाकडून जिंकून घेतला, तेव्हापासूनच मराठी राज्याची घटस्थापना झाली असें मानता येईल. १६५५ सालीं प्रतापगडच्या युद्धांत विजापूरचा प्रसिद्ध सरदार अफजलखान पराभूत होऊन मारला गेला. तेव्हापासून या नव्या सत्तेचा दरारा मुसलमानांना जाणवूं लागला. १६७४ सालीं शिवाजी महाराजांनीं विधिपूर्वक राज्यारोहण केलें. १७१९ सालीं दिल्लीवर बाळाजी विश्वनाथानें केलेल्या स्वारीमुळें मराठी स्वराज्याचें मराठी पादशाहींत रूपांतर झालें व पेशव्याची सत्ता त्यानंतर एकसारखी वाढीस लागली. मराठ्यांनीं मारलेली अखेरची मोठी लढाई १७९५ सालीं खर्डी येथें झाली. महादजी शिंदे, अहिल्याबाई होळकर, हरिपंत तात्या फडके, नाना फडणवीस, तुकोजी होळकर, परशुरामपंत पटवर्धन वगैरे मराठी राज्यांतील कर्ते पुरुष एकामागून एक मृत्युमुखीं पडले, आपापसांत कलह सुरू झाले, मत्सर भडकला व स्वार्थ नागडा झाला आणि कुलकलंक कलिपुरुष राघोबा दादा याचा पुत्र बाजीराव बुडवा, याच्या हातीं पंतप्रधानकीचीं वस्त्रें पडलीं आणि मराठी सत्ता तत्वतः वसईच्या तहानें १८०२ सालच्या अखेरीस आणि वस्तुतः १८१८ सालीं धुळीस मिळाली. त्यानंतर मराठ्यांनीं थोडीबहुत टुरटुर करून पाहिली परंतु संघटनेच्या अभावीं ती फोल ठरली व इंग्रज या देशाचे स्वामी बनले. १८५७ सालीं नानासाहेब पेशवे यांनीं तात्या टोपे व राणी लक्ष्मीबाई यांच्या साह्यानें स्वराज्यप्राप्तीसाठीं अखेरचा झगडा करून पाहिला व मृत्यु आणि पराभव समोर आ वासून उभा असतां पिंजऱ्याच्या लोखंडी गजांशीं त्या सिंहानें डोक्यानें टक्कर देऊन अखेरची धडपड करून

पाहिली. ती पसन्ती जसली तरी त्या नरशार्दूलानें पित्याच्या नादानपणाबद्दल प्रायश्चित्त घेऊन भट कुलावर आलेला कलंक पुसून टाकला हें खास !

मराठशाहीचा हा स्फूर्तिदायक इतिहासखंड कालमानाच्या दृष्टीनें लहान असला तरी पराक्रमाच्या दृष्टीनें अतिशय मोठा आहे श्रीरंगपट्टणपासून तों लाहोर–अटकपर्यंत आणि द्वारकेपासून तों कटकपर्यंत मराठी भालप्या अलस्या कालखंडात तळपत होत मराठशाहीचें वैभव पूर्ण पराक्रमी नाटक हिंदुस्थानच्या विस्तीर्ण रंगभूमीवर विलसत होतें दान कोटीपेक्षा कमी वसती असलेल्या महाराष्ट्रातील मराठ्याना हा पराक्रम कसा करता आला ? मराठे काळसावळे, ठुस्के, हाडकुळ, त्यांचा देश दगडी व रूक्ष, त्यांची भूमि निर्जल व अल्पप्रसू त्यांचे भीमथडी घोड देखील इतके ठेंगणे कीं त्याना घोड न म्हणता बैटें म्हणत असत ! उलट उत्तरेकडील मुसलमान उंचपुरे, थोडे गौरवर्णी व भरभक्कम बांध्याचे, त्यांचा देश सपाट मैदानी, दाट वस्तीचा व त्यांची भूमि जलपूर्ण व सुपीक, त्यांचे घोडेहि डौलदार ! दक्षिणेंतील दारिद्र्याला उत्तरेकडील वैभव सतत नाक मुरडून हसत होतें मग मराठ्यांनीं मुसलमानाना पाणी कसें पाजलें व मोगल बादशाहीचीं हाडें कशीं खिळखिळीं केलीं ?

प्राचीन काळीं राष्ट्राराष्ट्रांतील संबंध आजच्यासारखे घनिष्ट नसल तरी त्याच्याकडे दुर्लक्ष करण्यासारखे सूक्ष्म खास नव्हते हिंदुस्थानच्या मोगल राजवटीचा इतिहास लिहिताना युरोपातील राजकारणाचे धागेदोरे हातीं ठेवणें भाग पडतें स्पेन, पोर्तुगाल, हॉलंड, फ्रान्स व जर्मनी यांच्या आपापसांत राज्यविस्तारासाठीं व व्यापारी चढाओढीपाठीं ज्या झटापटी त्या काळीं मारल्या चालू होत्या, त्यांचे परिणाम हिंदुस्थानच्या इतिहासावर घडल्याशिवाय कसे राहतील ? कर्नाटकच्या नबाबातील यादवी व म्हैसुराकडील राजकारण म्हणजे युरोपातील इंग्लंड व फ्रान्स यांच्या शतसांवत्सरिक युद्धाचे तत्कालीन पडसादच होत क्लाइव्ह व डुप्ले ही इंग्लंड–फ्रान्सचीं युरोपियन प्यादीं हिंदुस्थानच्या पटावर बागडत होतीं, इतकेंच काय तें परंतु इंग्रज व हिंदी इतिहासकारांनीं मोगल रियासतींतून ब्रिटिश रियासतींत प्रवेश करताना मधल्या मराठी रियासतीच्या महत्त्वाच्या कालखंडाकडे दुर्लक्ष करण्याचा जो पायंडा पाडला, त्याचा प्रतिध्वनि म्हणून कीं काय, मराठशाहीचा इतिहास लिहिणारांचें व संशोधकांचें युरोपातील तत्कालीन राजकीय घडामोडींकडे दुर्लक्ष तर झालेंच, परंतु हिंदुस्थानच्या भिन्न भिन्न प्रांतांत नांदणाऱ्या तत्कालीन चिमुकल्या राष्ट्रांच्या इतिहासाकडेहि त्यांनीं फारशी नजर टाकली नाहीं आज हिंदुस्थान गुलामगिरीच्या समान भूमिकेमुळे एक राष्ट्र बनलें असेल प्राचीन काळीं तें निश्चित एक राष्ट्र होतें कारण हिंदुधर्म व संस्कृत भाषा यांच्या बंधनानीं समान भूमिका प्राचीन काळीं या भरतखंडांत निर्माण झाली होती परंतु मधल्या एक हजार वर्षांच्या कालखंडात या विस्तीर्ण देशांत निरनिराळ्या जमाती निरनिराळ्या प्रांतांत संघटित व प्रबळ होऊन त्यांचे हितसंबंध एक बनल्यामुळे चिमुकलीं राष्ट्रें त्यांच्यातून निर्माण झालीं महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें मराठे नांदत होते, त्याप्रमाणें राजस्थानांत रजपूत नांदत असत ह्या दोन्ही हिंदुधर्मी जमाती असल्या, तरी त्याना भिन्न भिन्न राष्ट्रांचें स्वरूप प्राप्त झालें होतें महाराष्ट्र व राजस्थान हीं

दोन स्वतंत्र राष्ट्रे निर्माण झाली. बेल्जियम, हॉलंड, डेन्मार्क, इटली वगैरे युरोपातील स्वतंत्र राष्ट्रांच्या दृष्टीनें राजस्थान, महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र, बंग ई. हिंदुस्थानांतर्गत राष्ट्रें विस्तारानें किंवा लोकसंख्येच्या दृष्टीनें कमी दर्जाचीं ठरणार नाहींत. आज इंग्रजांच्या साम्राज्यामुळें एकराष्ट्रीयत्वाची भावना हिंदुस्थानातील सर्व विभागांत प्रज्वलित झाली असली, तरी भाषावार प्रांतरचनेचें अंतिम तत्त्व कॉंग्रेसला देखील मान्य झालें आहे. याचा अर्थ असा कीं, हे केवळ प्रांत नसून समान भूमिकेमुळें संघटित झालेलीं हीं स्वतंत्र राष्ट्रें आहेत, ही गोष्ट सर्वांना पटली आहे. हिंदुस्थानची भावी राज्यघटना देखील राष्ट्रसंघटनेच्या स्वरूपाचीच राहील. हिंदुस्थानला पूर्ण स्वातंत्र्य मिळाल्यानंतर देखील प्रत्येक प्रांतिक राष्ट्राला अंतर्गत कारभारापुरतें स्वातंत्र्य राहील व मध्यवर्ति सरकार संघटित स्वरूपाचें राहील. धर्म हें राष्ट्रीयत्वाचें गमक नसून भाषा हें प्रमुख बंधन आहे. युरोपातील सर्वच राष्ट्रें भिन्न पंथी परंतु ख्रिस्ती धर्मानुयायी आहेत, परंतु भाषाभेदानुसारच राष्ट्रभेद तेथें निर्माण झाले आहेत. इंग्रजी राजवटींत प्रांताप्रांतांतील भेद बरेचसे वितळले असले तरी समूळ नष्ट झाले नाहींत. परन्तु तीनशें चारशें वर्षांपूर्वी हे भेदाचे डोंगर फारच प्रचंड होते. त्यामुळें महाराष्ट्रांतील स्वराज्य स्थापनेचा इतिहास लिहितांना मराठे व मुसलमान यांच्यातील लढ्याचें केवळ तपशीलवार वर्णन करून सत्यबोध होणार नाहीं. केवळ मराठ्यांच्या पराक्रमाच्या जोरावर महाराष्ट्रांत स्वराज्यस्थापना झाली नाहीं व मुसलमानी सत्तेला शह बसला नाहीं. मोगल सत्तेविरुद्ध राजस्थानांतील रजपुतांनीं अनेक शतकें जी झुंज घेतली तिचें अप्रत्यक्ष साह्य मराठ्यांना मिळालें. मेवाडचा सिंह राणा प्रताप व त्याचे पराक्रमी पूर्वज आणि पुत्रपौत्र यांनीं मोगल बादशाहीच्या पायात सुरुंग भरण्याचे अनेक प्रयत्न केले. बुंदेलखंडचा राजा छत्रसाल हा बुंदेल्यांना एकत्र करून त्याचें स्वतंत्र राष्ट्र करूं पाहात होता. हिंदुस्थानच्या उत्तरेस मुसलमानी धर्माच्या चढाईनें गांजलेल्या लोकांत शीख धर्माचा प्रसार होऊन त्यांचें धार्मिक एकीकरण झालें व मोगल साम्राज्याच्या उत्तर सरहद्दीवर स्वतंत्र शीख राष्ट्राचा जन्म कालांतरानें झाला असला, तरी त्या जन्माचीं पूर्व चिन्हें शिवाजी महाराजांच्या जन्माच्या अगोदर दृग्गोचर होऊं लागलीं होती.

हे सर्व भिन्न भिन्न राष्ट्रांतील राजकारणाचे प्रवाह एकत्र जुळविल्याशिवाय महाराष्ट्रांतील स्वराज्य गंगेचें यथातथ्य स्वरूप कळणारच नाहीं. शास्त्रीय संशोधनाला सूक्ष्मदर्शी यंत्रानें केलेलें निरीक्षण अत्यंत उपयोगी पडत असलें तरी ऐतिहासिक संशोधनाला असलें एकांगी व सूक्ष्मदर्शी निरीक्षण मुळींच चालणार नाहीं. दूरदर्शी दुर्बिणींतूनच इतिहाससंशोधनाचे वेध घेतले पाहिजेत. जेवढी दूरदृष्टि असेल व भूमिका व्यापक असेल, तेवढें इतिहाससंशोधन अचूक व मार्गदर्शी ठरेल. मराठे काटक असले तरी बलवान खास नव्हते. रजपूत व शीख मराठ्यांपेक्षा खात्रीनें अधिक सशक्त होते. मराठ्यांचें शौर्य तर बहुतांशीं त्यांच्या पायांत साठवलेलें असे. त्यांचे हात दुबळे व छाती निकस असे. टोळधाड याची लामगार्येंं मराठे दिवसा लपतछपत राहात, संधि सापडताच शत्रूवर अचानक हल्ला करीत व तेथून थोडी कापाकापी व अधिकारा लूटमार करून पुनः जसे आले तसे आकस्मिक पळून जात व लुप्त होत असत. रजपुतांप्रमाणें त्यांनीं कधींच जोहार केला नाहीं व केशरी पोषाख करून 'मरूं किंवा मारूं' अशा दृढनिश्चयानें ते कधींच

रणभूमीवर उभे ठाकले नाहींत. पण रजपूत खरे शूरवीर होते. भीति हा शब्द त्यांच्या कोशात सापडत नव्हता. 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्' ही गीतेची सर्वश्रेष्ठ शिकवण रजपूत क्षत्रियांच्या रक्ताच्या प्रत्येक थेंबात गाजली होती. रजपुताना भाग-गांजा-चरस-अफूच्या व्यसनानें पछाडलें होतें. त्यांच्या राजस्थानात त्या वस्तू मुबलक होत असत. त्यामुळे कुसुंब्याचा घोट घेतल्याशिवाय रजपुताचे पाऊल पुढें पडतच नसे. उलट मराठे फार साधेसुधे असत. त्यांना सुपारीचें खांड व तमाखू याशिवाय दुसरें कोणतेंच व्यसन नसे. त्यामुळें रजपूत नशेंत चूर असत व बेडर वृत्तीनें युद्ध करीत. प्राणाची पर्वा त्यांना वाटत नसे. मराठे मात्र व्यवहारी, धूर्त व थोडे भित्रे होते. जरासें संकट दिसलें कीं त्यांनीं आपल्या पायांना गति देऊन रणांगणांतून पळ काढलाच म्हणून समजावें. आज जीव वाचविला तर उद्यां पराक्रम करता येईल, असें त्यांचें व्यवहारी तत्त्वज्ञान असे. रजपुतांना व्यवहारी यशापेक्षा कीर्तीची अधिक चाड असे. त्यामुळे रणांगणाला पाठ दाखवून राज्य करण्यापेक्षा युद्धांत मरणें त्यांना अधिक रुचत असे. दोघांचीहि आपापल्या वतनावर विलक्षण आसक्ति असे. त्यामुळें रजपुतांनीं आपलीं राज्यें शेवटपर्यंत राखलीं, मात्र परक्यांच्या मुलखाचें अपहरण मात्र त्यांनीं कधीं केलें नाहीं. ते शंकराचे पूजक होते व सांबाप्रमाणेंच त्यांचा स्वभाव भोळा परंतु प्रामाणिक असे. असत्याची त्यांना पराकाष्ठेची चीड असे. रामचंद्राप्रमाणें ते एकवचनी असत. त्यांची प्रतिज्ञा ते मेले तरी मोडत नसत. शरणागताचें रक्षण प्राण देऊनहि ते करीत असत. मराठ्यांना हें धार्मिक तत्त्वज्ञान मानवत नव्हतें. ध्येयसाधनेसाठीं फसवणूक करण्यात त्यांना पाप वाटत नसे. परदारा व परद्रव्य याचा रजपुतांना मुळींच लोभ नसे. त्यामुळे त्यांनीं लुटमार कधीं केली नाहीं. त्यांच्या स्वराज्यांचें साम्राज्यांतहि त्यामुळें कधीं रूपांतर झालें नाहीं. त्यांचीं राज्यें तेवढीं शतकानुशतकें टिकलीं! अनेक राजकीय वावटळी आल्या व गेल्या. अनेक राजकीय क्रांत्या झाल्या तरी रजपुतांचे आसन ढळलें नाहीं. त्यांनीं आपलें ब्रीद मात्र सोडलें नाहीं. त्यामुळें त्यांच्या शत्रूंच्या मनांत त्यांच्याविषयीं आदरबुद्धि कायम राहिली. मुसलमान व रजपूत यांच्यात सातआठशे वर्षें कलहाग्नि धुमसत होता. परंतु दोघांत कायमचा वैरभाव उत्पन्न झाला नाहीं. राजकीय क्षेत्रांत व धार्मिक दृष्टीनें रजपूत मुसलमानांचे शत्रू असले, तरी एकमेकांच्या गुणाबद्दल एरवीं दोघेहि आदरभाव बाळगून असत.

उलटपक्षीं, मराठ्यांची तऱ्हा विलक्षण. परस्वापहरणाचें त्यांना पाप वाटत नसे. त्यामुळे लुटमार ही त्यांच्या अंगवळणी पडलेली बाब होती. मराठी स्वराज्यांचें यामुळें साम्राज्यांत सहज रूपांतर होऊ शकलें. त्यांचें राज्य वाढलें व नष्टहि झालें. त्यांनी सत्ता वृद्धिंगत झाली व लय पावली. मराठ्यांचा मात्र ज्यांच्या ज्यांच्याशीं संबंध येई त्यांच्या त्यांच्याशीं कट्टें हाडवैर उत्पन्न होई. पुढें पुढें मराठ्यांच्या हावरेपणानें रजपुताना परधर्मी मुसल्मानापेक्षा हिंदुधर्मी मराठ्यांचीच अधिक चीड येऊ लागली. मुसलमानच काय, परंतु परकी व अनोळखी ब्रिटिश इंग्रजांवर देखील विश्वास टाकण्यास रजपूत तयार झाले, इतका त्यांना मराठ्यांचा संताप आला होता व अविश्वास वाटत होता. प्रेताच्या टाळूवरील लोणीदेखील मराठे चाटून खातील, इतका त्यांच्या हावरेपणाचा डांगोरा उत्तरेंत पिटला गेला. भोसल्यांनीं बंगाल्यांत विजय मिळविला खरा, परंतु

हीच हावरपणाची अपकीर्ति पदरीं पाडून घेतली. परदारापहरणाच्या बाबतींत मान मराठे रजपुताइतकाच नक्कीच ठरले. दोघानांहि आपापल्या कुलाचा अभिमान व वंशशुद्धि कायम ठेवण्याची तळमळ लागलेली असे. त्यामुळें इतरांच्या स्त्रीवर्गाविषयीं दोघांच्या मनात पूज्यबुद्धि असे. रजपूत काय किंवा मराठे काय, मुसलमान किंवा ख्रिस्ती सुंदरी युद्धात हातीं लागली तरी कोणीच तिचा अभिलाष धरला नाहीं. शिवाजी महाराजानीं कल्याणच्या मुसलमान सुभेदाराच्या सुनेची आदरपूर्वक केलेली बोळवण व चिमाजी अप्पानीं वसईच्या वेढ्यात सापडलेल्या फिरंगी सुंदरींची साडीचोळी देऊन केलेली सन्मानपूर्वक पाठवणी, हीं दोन सुप्रसिद्ध ऐतिहासिक उदाहरणें मराठ्यांच्या नीतीवर उत्तम प्रकाश पाडतात.

शक्ति व पराक्रम या दोन्ही बाबतींत रजपूत व शीख समसमान ठरतील. रजपूतांप्रमाणेंच किंबहुना थोडे अधिकच शीख धिप्पाड आहेत. शीख व रजपूत दोघेहि खरे शूर, मर्द, वीर आहेत. मराठ्यांचा पळपुटेपणा दोघानांहि तिरस्करणीय वाटतो. शीख लोकांचा धर्म मराठे व रजपूत यांच्या प्राचीन हिंदु धर्मापेक्षा नवीन व तारुण्यानें मुसमुसलेला आहे. त्यामुळें शिखांचा धर्माभिमान मराठे व रजपूत या दोघांपेक्षांहि अधिक कडवा व तीव्र आहे. कोणत्याहि नव्या धर्मपंथाचे अनुयायी असेच कडवे असतात. कारण अनुयायांचा धर्माभिमान तीव्र नसला, तर जुन्या व रूढधर्मांच्या प्रचलित राज्यांत नव्या पंथानें आसन स्थिर होणें अशक्यप्राय असतें. शीख लोकांना हिंदु व मुसलमान या दोन्ही धर्मांचें वावडें असलें, तरी मुसलमानाइतकें कट्टे शत्रुत्व त्यांना हिंदु लोकांविषयीं वाटत नाहीं. कारण बहुसंख्याक मुसलमानी वस्ती असलेल्या प्रांतात मुसलमानी सत्तेखालीं शीख धर्मानुयायांना वावरावें व जिवंत जगावें लागत असल्यामुळें, मुसलमानांच्या कडव्या इस्लामी चढाईला जशास तसें या न्यायानें ठोशास ठोसा देऊनच त्यांना पायबंद घालावा लागे. शीख धर्माचे आद्य संस्थापक गुरु नानक यांचा नामदेवादि हिंदु संतांशीं निकटचा स्नेहसंबंध जडला असल्यामुळें व हिंदुधर्मी संतांशीं

अयशस्वी ठरला. परंतु १८१८ सालीं भट घराण्यानें पेशवाई गमावली, त्या गोष्टींची आन १८५७ सालीं नानासाहेब पेशव्याना लागून त्यानीं इंग्रजाविरुद्ध त्या उठावणींत पुढाकार घेतला. परंतु १८४९ सालीं आपले स्वातंत्र्य गमावून बसलेले शूर मर्द शीख १८५७ सालीं वर्षाप्रमाणे थंड राहिले. केवळ आठच वर्षांत त्याना आपल्या गमावलेल्या स्वराज्याचा व स्वातंत्र्याचा विसर पडला आणि कंपनी सरकारचे राजनिष्ठ बहादर शीख शिपाई म्हणवून घेण्यात त्याना धन्यता वाटू लागली. शिखाचे स्वातंत्र्यप्रेम इतके तकलुपी निघालें ! युद्धाच्या भट्टींत टाकताच त्यावरील मुलामा उडून गेला व आतलें पितळ उघडें पडलें.

साधेपणाच्या बाबतींत मात्र मराठ्याची बरोबरी कोणीच करू शकत नाहीं. मराठ्यापेक्षा रजपूत अकडबाज आणि रजपूतापेक्षाहि शीख अधिक मिजासखोर ठरतील. मुसल्मानी सहवासानें नबाबी राहाणीची सवय त्याना लागली. मुसलमानाच्या साहचर्यानें त्याच्या नीतिमत्तेलाहि ग्रहण लागले. परद्रव्य त्याना लोष्ठवत वाटणार नाहीं. एवढेंच नव्हे, तर परदारा त्याना मातेप्रमाणेंहि पूज्य भासणार नाहीं. दुसऱ्याच्या बायका आपल्या घरात घालणें व त्याना बाटविणें, या मुसल्मानी रिवाजाचें शिखानींहि अद्यात अनुकरण केलें. त्यामुळें आपल्या गोत्रातील स्त्रियाना हिंदु शेजाऱ्याची भीति नाहीं, अशी ज्याप्रमाणे मुसल्मानाना निर्धास्तपणें ग्वाही देता येते, तशी शीख शेजाऱ्याबद्दल देता येत नाहीं. कारण उत्तरेस त्या दोघानाहि जवळ जवळ तसें हें धोरण नाइलाजानें पतकरावे लागलें. शीख–मुसल्मान दोघाचेहि या बाबतींत सारखे डावपेच चालू असतात. या धोरणामुळेंच शीख समाज पंजाबात इतका लहान असताहि आपला वचक राखून आहे. पंजाबातील लोकसंख्येच्या मानानें मुसल्मानाचा पहिला, हिंदूचा दुसरा व शिखाचा तिसरा नंबर लागतो. याशिवाय पंजाबातील हिंदु-मुसल्मानाना परप्रांतीय हिंदु-मुसलमानाचें प्रसंगीं साह्य, निदान त्याचा नैतिक पाठिंबा तरी मिळविता येतो. परन्तु शिखाना ताहि आधार नाहीं त्याची सारी वस्ती पंजाबातच आहे. अशा परिस्थितींत देखील त्यानीं आपले राजकीय महत्त्व कायम ठेवलें, एवढेंच नव्हे तर तें अनेक पटीनें वाढविलें. होमरूल लीगची चळवळ करण्यापेक्षा शीख गुरुद्वाराची सुधारणा करणें त्याना अधिक पसंत पडलें व त्यानीं या अधार्मिक युगात व कायदेबाज इंग्रजी राजवटींत कायदे व हायकोर्टानें निवाडे धाब्यावर बसवून आपली धार्मिक बंधनें अधिक दृढ व पवित्र करून घेतलीं व आपलें संघटण यशस्वी केलें. गुरुद्वारातून व्यसनी, सत्ताधिकारी व विद्वान् विद्या अधिकाऱ्यांनीं हातीं धारण करणाऱ्या महंताना गचाडी मारून त्यानीं गुरुद्वारें हीं धर्माचीं पवित्र मंदिरें बनविलीं व शीख धर्मांत नवचैतन्य आणलें. धर्मादायाचा आय योग्य मार्गानें वळवून शिक्षणाचा आपल्या जमातींत प्रसार केला व अनाथालयें स्थापन केलीं. परंतु रजपुतापेक्षा मराठे अधिक लोभी व स्वार्थी असले तरी शीख या बाबतींत मराठ्यानाहि लाजविणार. मराठ्याचा देश दरिद्री. त्यामुळें त्याचें सर्व आयुष्य पोटासाठीं खर्ची पडतें. कलाविलास ही रिकामपणाची कामगिरी करावयास त्याना अर्थात फुरसतच सापडत नाहीं. कारण प्रत्येक गोष्टींची रुपय आणे पैंत किंमत करण्याची सवय त्याना लागलेली असते आणि कलाविलास व सौंदर्य याचा तर बाजारभाव ठरविणें अशक्यच ! मराठ्यापेक्षा रजपूत अधिक कलावंत आणि शीख तर

मुसलमानासारखे या बाबतींत दर्दी ! परंतु शीख धर्माच्या शिकवणीमुळे त्याच्या मूळच्या विलासी वृत्तीला पायबंद बसला आहे. कारण शीख धर्माची परंपरा लढाऊ न चढाऊ असली तरी माध्या फकिरी राण्याची आहे.

राष्ट्राराष्ट्रांतील गुणावगुणधर्म बरेचसे भौगोलिक परिस्थितीवर अवलंबून असतात. महाराष्ट्राच्या डोंगराळ भागांत राहणारा इसम अंगानें नाटक व स्वभावानें तेढा असतो. परंतु बंगालच्या सुपीक मैदानांत राहणारा इसम विलासी व नबाबी वृत्तीचा बनू लागतो. पहिला कष्टाळू तर दुसरा आळशी होतो. कारण कष्ट केल्याशिवाय पहिल्याचें पोटच भरू शकत नाहीं आणि दुसऱ्याला खाटल्यावर पडल्या पडल्या पत्नी उठविते व बायका मिळविता येतात. एकाच राष्ट्रांतील निरनिराळ्या भागांत राहणाऱ्या लोकांच्या स्वभावधर्मांत इतका ठळक फरक पडतात, तर भिन्न भिन्न राष्ट्रांतील लोकांच्या स्वभावधर्मांत किती मोठे भेदाभेद पडत असतील ? कारण भिन्न राष्ट्रांत भौगोलिक परिस्थितीबरोबरच परंपरा व संस्कृति यांचाहि लोकांच्या राहणीवर व दृष्टीवर भिन्न भिन्न परिणाम घडून येतो. त्यामुळें प्रत्येक राष्ट्राचें ध्येय भिन्न राहातें व आचारमार्गाहि निराळा पडतो. प्रत्येकाचें तत्त्वज्ञानहि निराळें असतें. अशा भिन्न प्रकृतीच्या राष्ट्रांचा एकमेकांशीं संबंध आला, म्हणजे संग्राम उडालाच म्हणून समजावें. त्या संग्रामाचा शेवट कोणाच्याहि जयापजयांत झाला, तरी दोन्ही राष्ट्रांची विचार व आचार परंपरा त्या झगड्यानंतर पार बदलून जाते. कारण, भिन्न भिन्न संस्कृतींचा व तत्त्वज्ञानाचा मिलाफ होतो व जीवनाचें ध्येय बदलतें. रामनें ग्रीस देश जिंकला खरा, परंतु ग्रीक संस्कृति रामच्या छातीवर नाचू लागली. गॉथ लोकांनीं रामन साम्राज्य बुडविलें परंतु रामच्या खिस्तीधर्माचा स्वीकार केला. त्यामुळें राष्ट्राराष्ट्रांच्या स्वभावविशेषांची तर्कशुद्ध चर्चा केल्याशिवाय इतिहासाचें सम्यक् ज्ञान होणें शक्य नाहीं.

मराठेशाहीचा इतिहास लिहितांना रजपूत व शीख लोकांनीं मोगल साम्राज्याविरुद्ध केलेले उठाव विसरून चालणार नाहीं. मराठ्यांना महाराष्ट्रांत मोगलांविरुद्ध लढून स्वराज्य स्थापन करतां आलें, परंतु या यशाला केवळ मराठ्यांचा पराक्रम कारणीभूत झाला नाहीं. कारण, मराठ्यांप्रमाणें रजपूत खात्रीनें अधिक शूर वीर पुरुष आहेत. शीख लोकांनीं उत्तरेकडे धामधूम करून मोगल साम्राज्याला शह दिला, म्हणून मराठ्यांना स्वराज्यस्थापनेला अनुकूल संधि मिळाली. उलट पक्षीं मराठ्यांनीं दक्षिणेंत जोर केला म्हणून औरंगजेबाला दिल्ली सोडून औरंगाबादेस कायमचा तळ देऊन बसावें लागलें. त्यामुळें शीख लोकांचा सासुरवास व छळणूक कमी झाली व त्यांच्या संघटनेला संधि सांपडली. शीख धर्मावरील इस्लामी आक्रमणाचें संकट टळलें व तो धर्म अधिक तेजस्वी झाला. मराठी उठावणी यशस्वी झाली नसती तर शिखांचें स्वतंत्र राष्ट्र निर्माणच झालें नसतें. उलट पक्षीं, शीख व रजपूत यांचें भय मोगल साम्राज्याला नसतें, तर मराठ्यांना चिरडून टाकणें औरंगजेबाला सोपें गेलें असतें. मराठ्यांच्या पराक्रमाचीं सदासर्वदा अवास्तव स्तुतिस्तोत्रें गाणारांनीं हे पुढचे संबंध व हिंदुस्थानांतील भिन्न भिन्न राष्ट्रांतील तत्कालीन ऐतिहासिक घटना विचारांत घेतल्या पाहिजेत. त्या शिवाय यशाचा निश्चित हिस्सा

मराठ्याच्या पराक्रमाच्या पदरांत पडेल हें ठरविता येणें दुरापास्त आहे. मराठ्याच्या राष्ट्रीय गुणावगुणाची चर्चा तर्कनिष्ठुर पद्धतीनें इतिहासकाराला केली पाहिजे. सत्य कटु असलें तरी तें कबूल केलेंच पाहिजे. दुर्गुणाचें कथन हें स्वाभाविक अप्रिय असतें. परंतु इतिहासकाराला लोकरंजनाचा '**सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् न ब्रूयात सत्यमप्रियम्**' हा दंडक पाळता येत नाहीं. '**अप्रियमपि सत्यं सदैव ब्रूयात्**' हेंच सूत्र त्याला आपल्या डोळ्यासमोर धरणें भाग आहे. अशा निष्पक्षपाती दृष्टीनें त्यानें आपल्या राष्ट्राची इतराशी तुलना केली पाहिजे व कोणाच्याहि रागलोभाची पर्वा न करता जे सत्य आढळून येईल त्याचा निर्भय चित्तानें आविष्कार केला पाहिजे. इतिहासकार हा भूतकाळात रममाण होत असला तरी गतकाळात आढळलेल्या त्या सत्याच्या बळावर वर्तमानकाळींहि लोकांना मार्गदर्शक होऊं शकतो. कारण भूतकाळच्या अचूक ज्ञानामुळें मार्गातील खाचखळग्याची त्याला माहिती झालेली असते. भूतकाळच्या अनुभवाचा फायदा घेऊन राष्ट्राला वर्तमान काळीं भविष्यकाळचा ध्येयसिद्धीचा बिनचूक मार्ग दाखविणें, हीच खऱ्या इतिहासकाराची भूमिका होय.

# महत्पूर लढाईच्या वेळचा पत्रव्यवहार

[ लेखक—सरदार माधव विनायक किबे, M A, इंदूर ]

एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पंचविशीत विठ्ठल महादेव किबे उर्फ तात्या जोग यांचें नांव हिंदुस्थानच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे. यांनी मुख्य कार र्कीर्द होळकर राज्याचे मुख्य कारभारी या नात्यानें इ. स. १८१८ ते १८२६ पर्यंत झाली श्रीमंत महाराज यशवंतराव होळकर यांच्या सैन्यांत, प्रथम खजिनदार म्हणून व पुढें लढवय्येहि म्हणून यांनी महत्त्वाचें काम केलें, पण श्रीमंत महाराज यशवंतराव वारल्यावर त्यांच्यावरील जबाबदारी वाढली व महत्पूरच्या लढाईत होळकर सरकारच्या फौजेचा नायनाट झाल्यावर त्या राज्यांत स्थिरस्थावरता करणें सर्वस्वी यांच्यावर पडलें. शिवाय मध्यहिंदुस्थानांतील इतर संस्थानिक, विशेषत. महाराष्ट्रीय, व जहागीरदार वगैरे यांचें इंग्रजांशीं व आपसांतील संबंध व्यवस्थित करून देशांत शांतता नांदविण्याच्या कामांत यांचा फार मोठा भाग होता होळकरांच्या अभिवृद्धीसाठीं यांनीं जें केलें त्याची इंग्रज व होळकर राजपुरुष यांनीं मुक्तकंठानें स्तुति केली आहे. इतकेंच नव्हे, तर तत्कालीन कागदपत्रावरून तें स्पष्ट होत आहे.

महत्पुरांत इंग्रज व होळकर सरकारची फौज यांतील झालेलें युद्ध उत्तर मराठेशाहीच्या इतिहासांत दीर्घ परिणामी ठरलें त्या लढाईत झालल्या होळकर फौजेच्या विध्वंसामुळे उत्तर हिंदुस्थानांत पेशव्यास पाय ठेवण्यास जागा राहिली नाहीं बाजीराव असीरगड पावेतों आला होता त्यास तथेंच राज्यत्याग करावा लागला

या पराभवाचें वैशिष्ट्य हें आहे कीं ता होण्यास जी कारणें झालीं तीं सर्वच मराठेशाहींत दृष्टीस पडत होतीं. फौजेचा बरचढपणा, पैशाची अव्यवस्थेमुळे तूट, परकीयांचे फौजेंत वर्चस्व, यादवी, हींच तीं होत. हीं सर्व, सोबत बारा पत्रें जोडलीं आहेत त्यात इतिहासज्ञास, वर्णित झालेलीं आढळतील त्यांतील सहा पत्रें खुद्द विठ्ठल महादेव यांनीं आपल्या वडील कन्यस लिहिलीं आहत. यांतहि एक रहस्य आहे बाकीचीं पत्रें, एक पत्र सोडून, विठ्ठल महादेव यांच्या पत्नी रखमाबाई यास इतरांनीं लिहिलीं आहेत त्या वेळचा जो अन्य पत्रव्यवहार उपलब्ध आहे त्यावरून त्या गृहकृत्यात व राजकारणात आपल्या पतीच्या हयातींतहि फार मोठा भाग घेत होत्या असें समजतें. पण विकल्पतानें त्यांच्या नावानें पत्रें न लिहिता, आपल्या लहान वयाच्या कन्येचें नाव पुढें करून हीं लिहिलीं आहेत. यात त्या काळची मर्यादा विशद होते

विठ्ठल महादेव ता. ९ मार्च १७७९ रोजीं जन्मास आले व ता. ४ एप्रिल १८२६ रोजीं अल्पवयींच वारले, या थोड्या अवकाशात त्यांनीं मिळविलेला नावलौकिक व केलेली कामें पहाता आश्चर्य वाटतें. त्यांची जन्मकुंडली खालीं दिल्याप्रमाणें आहे.

**चैत्रमासे कृष्णपक्षे तिथौ ८ सोम्यवासरे घटी ४४।१८**
**जेष्ठी नक्षत्रे घ. २५–२७ सह मृत्य व्यतिपात योगे घ**
**२५–४० इष्ट घटी ४३–४४**




–५–

**पो छ २० मोहरम** श्री

चिरंजीव सौभाग्यवती गंगाबाई यासी,

विठ्ठल महादेव अनेक आशिर्वाद उपरी येथील क्षेम ता। कार्तिक वा। ५ शुक्रवार प्रातःकाल मु। श्रीकायावर्णेश्वर नजीक डग दोन कोस येथे सैन्यासह असो. विशेष. तुम्हाकडून दोन पत्र एक वा। १ व द्वितीयचें ऐसी पाठविली ती पाहून संतोष जाला. येथिल धरणे याचा बैदा ऐकून तुम्हा उदास जाला म्हणून पत्री विस्तारे पूर्वक लिहिले आहे. त्यास येविसीचें पत्र काल डाकेंत दिल्ही ती पावलीच असतील. तीन दिवस धरण निकडीने जाले आम्ही जाऊन देवढीवर बंदो बस्त करून राहिल्यानंतर चौथे रोजी दोन प्रहरी वाडात जाऊन नबाब वगैरे मंडळीहि होते तेथे जाब होऊन सरकारासी बोलणी जाली. निंतर मनात संशय होते ते दूर होऊन सफाई जाली. सिल्दार यासी कारणांचे मुळे देणे केले हे याने त्यास त्याचाहि आज उद्या एखादा तह ठरेल. चिंता नाही. आपल्यासी नबाबाचे वचन पक्के आहे. तेथे दुसरी कोणाची वक्र व्हावयाची नाहीं. तुम्हीं कांहीं चिंता न करावी. कालचे मु। रेजिमेंट पलटण वगैरे रोशनराव व रोशनखा वगैरे यासी सरकारची बोलावणी गेली. त्याजवरून पलटण आले. येऊन भेटी जाल्या. आम्हीं त्यांचे भेटीसमई तेथ

केली. मौ. मगाराईम शाल देणे ती मेणगती यारी म्हणून लिहिले, त्यास तुमचे विचारे येईल ती यावी. कईवर हवेलीकडे जिनस येनो त्यास हमिल्यामिमी दिकत करितात म्हणून सिंदे माईयाकडून तार्कीदपत्र आणवनु ती पाठविली आहेत. यारी म्हणजे आडथळा होणार नाही. सरकार स्वारी ही मदतपुराकडे लौकरच येईल. जागोजीदामाने नि मा कापड आणिले त्याचा महसूल जोरावरदादाचे§ विनमाने घेतील. त्याजकरिता पत्र पाठविले आहे. तेथें कुल महसूल माघारी घेणे. आवूहून कापड आले त शेटजीचे विनमाने यईल. ते आपले घरी आणान ठेवावे, सारीम ठेवावे म्हणोन लिहिले हाते, त्याम तेथे, ठेऊ नये, हा आशीर्वाद. ''

–२–

श्री

चिरजीव सौभाग्यवती गंगुबाई यासी,

प्रति विठल महादव आमीर्वाद उपरी येथील कुशल ता। कार्तिक वा। २ भामवासर परियेत यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाव. विशेष इकडील मार रोज गु।। पत्र पाठविले ते पाऊन वृत कललेच असेल. रवीवारी पठाण व सेडग घर्णे आपले डेऱ्या साईंकाल परियेत बसले. ननर राजश्री नबाब आम्हाकडे आले. घटका रात्रीस देव्हईवर गेलो. ता तथेंच राहिला. सध्याकाल परियत स्नान जाले नाही. ननर स्नान भोजन जाले. नबाव आम्हाजवळच आहेत. शिलेदाराचे रु. देणे, त्याची तोड जोड आज उद्या पडेल. तुम्ही बाजार आवईवर घाबरू नये. स्वस्त असावे तोडीचे बोलणही लागले आहे. आम्हा विषयी काळजी न करावी. तुम्ही सावध आपले ठिकाणी असावे. राज गु।। पत्र पाठविले त्या प्रो महीदपूर सावेर व खासगी गोविंदराव विठल यास ताकीद निक्षून करून ऐवज सावकाराकडे नगदी भरणा करवावा. येथे आज उद्या बालण्या यईल. तेव्हा ऐवजाचे काम पडेल. याजकरिता एवज भरण्याची ताकीद करावी. उजनच्या आवयावर न जावे. येथे तोडीचे बोलणे लागले आम्हा विमी काळजी किमपी न करावी. नबाव व सरकार याचेच तोड जोडीत आणि पठाण सिल्दारावाही जाव बोलण्यात आले, त्या शिवाये नाही. कळावे. बहुत काय लि।। हे आमीर्वाद.

–३–

पो। छ १६ मोहरम श्री

चिरजीव सौभती गंगाबाई

प्रति विठल महादेव आमीर्वाद उपरी. येथील कुशल ता। कार्तिक वा। १ यथास्थित असे. विशेष इकडील मार. दोन चार पत्री लिहिला आहे त्यावरून सर्व समजलेच असल. हाली छावणींतून पलटण सेद वगैरे बरावर आणिले त्याचा करार स्वारीत गेल्यावर तुमचा तनखा देऊ. येथे आल्यावर पचवीस दिवस जाले, त्याची काहीच तोड न लगे. तेव्हा त्यांणी रोज गु।। सर्व

§ शोरावर पत उदयपूरचा–नर विरेमत बापनाचा पूर्वज

मंडळी जमा होऊन आपले डेन्यास धरणे दिल्हे. अस्समानी नबाबऽ यांणी बोलून चालून मंडळीसह आम्ही देवडीवर गेलो. दोन प्रहर रात्र परियत सदाम व रामजी यास समजावणे तितके समजाविले. परंतु त्याचा एकच जाब की रू. या घेऊ. हीच आडी धरून समजाविणे न ऐकता रात्रौ देवडीवरच बसविले. आम्हाजवळ जराही आहेत. तुम्ही कोणे विसी काळजी न करिता स्वस्थ असावे. ईश्वर देही सगळ पार पाडील धरणेवाले यास ऐवज दिल्हा पाहिजे, सा तुम्ही खासगी मानेर महतपूर येथे ताकीद निक्षुण लिहून पाठवून ऐवज दुकानी भरणा करवावा. सावरवाल्यास व खासगीवाल्यास समक्ष बोलाऊन ताकीद निकडीची करावी खासगीवाल्यानी तर यदा शपत वाहिली आहे की तोजीचा ऐवज दुकानी भरण्या विसी त्यास त्याजला चागले फजीत करून प्रसग हाच आहे असे समजाऊन ऐवज दुकानी सत्वर भरणा करावा. तुम्ही आम्हा विसी एकरूप काळजी न करावी. आज बोलणे चालणे होऊन जाब जिकडील तिकडे उरकोन धरणे उठऊ. काळजी करू नये. तुम्हाकडील वर्तमान वरचेवर लिहून डाकेत देत जावे, बहुत काय लिहिणे हे आशिर्वाद.

-४-

पा॥ छ १९ मोहरम श्री

चिरंजीव सौभाग्यवती गंगाबाई या प्रति,

विठल महादेव आसीर्वाद उपरी येथील कुशल ता कार्तिक वा ४ गुरुवार यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे. विशेष. येथील मारांची पत्रे तुम्हाकडे पाठविली आहेत ती पावलीच असतील. त्यावर परस्पर वर्तमान तुमचे ऐकण्यात आल्यावर तुमचे मनात इकडील बहुत काळजी लागली असेल. त्यास येथे विशेष शाहीदा काही नाही. सिलेदार यास खर्चास खानयाचा जाब उगण्याची तोड व्हावी त्यास आवकाश लागली. यामुळे त्यात येथील कोणी व रामदीन सीरून त्याणी बहीदा करविला. दोन दिवस सिलेदार याचे धरण निकड राहिले. काल समक्ष सरकारची गाठ पडोन बोलणी जाली त्यात सरकारानी निखालस आगत्यवाद प्रमाणात कमती ठेविली नाही व या काळी नबाब कपूरखा याणी सरकारासी आपले तरफेचे बोलणे प्राजळ करण्यात कमती न केली तेव्हा सरकारचे प्रमाण जाली. यावर जे मधे लबाड्या करीत होते त्यास सिक्षा व रामदीन याजवर रागे भरले. या योगे करून यावर कोणी लबाडी करू नये असे जाले. सिलेदार याचेही समजाविषयीचा तोडजोड लागला आहे. सत्वरच सारे गुते उरकण्यात येतील. तुम्ही कोणे विषी एकरूप चिंता न करावी. तिकडील महालच्या तोज्या बाधान सत्वर ऐवज वसूल होऊन दुकानी भरणा करवावा या कामास ताकीद सिस्त करावी येथे सिलेदार यास चावभास ऐवज पाहिजे. त्या करिता महाला निहायच्या ऐवजास विलंब लागू नये हे सत्वर करावे. तुम्ही बहुत प्रबंध राहून वरचेवर तुमचे कुशल वृत्त लिहीत जावे. आम्हा कडील चिंता एकरूप न करावी. "येथील येथे आवाया मनस्वी दीन मजकूर याणी उठविल्या

ऽ हा टोकच्या अमीरखानाचा जावई गफूरखान व पुढे तहात्तयें आवन्याचा नबाब

तेव्हा तेथेही उठवील याजकरिता लिो आहे ह्या दोघाना धरण्याची तोड पडून उठले. बहुत काय लिो हे आशीर्वाद. " ¶

—५—

रवाना मि॥ मार्गशीर्ष शु॥ १३ श्री
छ ११ सफर रवीवार

चिरंजीव सौभती गंगाबाई यांसी,

प्रति विठल महादेव आसीर्वाद उपरी येथील कुशल तागाईत मार्गशीर्ष शु॥ १२ यथास्थित असो. विशेष, इकडील गल्बल्याचे वर्तमान तुम्ही तेथे ऐकोन बहुत चिंतातुर हावाल्दील होऊन मुक्यास पाठविले, तो येथे मागील चार पाच घटका दिवस चढता पावला. वर्तमान मागीलें कळले. तुम्ही स्वस्थ राहावे. राजकारण आहे, तेव्हा धरणे बखेडे लागलेच आहे. त्याचा काही निषीनिषेध नाही. देवडीवरून कपूराल्यानी कपृत आणिले. चिंता नाही. कपृत आपले सिवाय कोणी नाही. सारे आपले मगनेतील, दुसरी गाष्ट नाही. आपण सरचाकरी एकनिष्ठपणे केली आहे. तरी श्री हरी सर्व सकट दूर करून आनद करील. तुम्ही बाजार आवयावर न जाता येथील लेख पाहून स्वस्थ चित्ते असावे. धरण्यातून मोकळे जाल्याचे वर्तमानही एक दो रोजात ल्वकरच पाठविता. बहुत काय लिो हे आसीर्वाद.

-६-

पाो छ २७ सफर श्री

राजश्री बाबुरावजी गोसावी यांसी,

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ना नबाब केसरअली§ सलाम विनती उपर येथील कुशल ता। छ २६ सफर मुा तराण जाणोन वर्तमान यथास्थित असे विशेष. आलीकडे राजश्री तात्यासाहेबाच व लस्करचे वर्तमान काही समजले नाही. तुम्ही बातमी ठेविलीच असलेल्यास साकल्य लिहून कळवावे आणि आम्हास जशी सल्ला देऊन स्याहाल त्या अन्वये करण्यात येईल. इकडून ही हलकारे लस्करात जातात. परंतु खचीत वर्तमान भेटचे येत नाही. यास्तव आपण मविस्तर लिहून कळवावे. दुसरे खासगी गाव पो मार चे आहेत त्याजवर जप्ती राजश्री रामदीन यांणी केली आहे. शाळीचा तो वसूल घेतल्याच आहे त्याणे. परंतु आपण तात्यासाहेबास लिहून पाठवावे आणि गाव खासगीचे आहेत, त्याचा बदोबस्त करण्याचे आम्हास लिहिणे याव. म्हणजे गावचा बदोबस्त करू. आपले भरवसावर आम्ही आहो. त्याप्र बातमी व गावचा बदोबस्त करण्या विर्सीचे पत्र याचे वरकड लिहून कळवावे असे नाही. हमेशा पत्री सतोषवीत असावे. कळावे बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनती.

¶ अवतरण चिन्हात मानलेली अक्षरे घाईत लिहिलेली दिसतात

§ हा जावऱ्याच्या नबाबाचा नातेवाईक दिसतो

—७—

रवाना छ १९ मोहरम श्री

वडिलांचे सेवेसी आपत्य गणोबाने दोनी कर जोडून सिर सां नमस्कार. विनती विज्ञापना येथील क्षेम ता कार्तीक वा ४ गुरुवार प्रातःकाल पावेतो वडिलांचे अशीर्वादे करून वर्तमान यथेस्थित असे. विशेष. पेशजी येथील धरण्याचे पत्र लिहिले होते ते पावलेच असेल त्यास आपण धरणे जाहले म्हणून चिंताग्रस्त असाल, त्यास कोणे विशी एकरूप फाळजी न करावी. काल दो प्रहरा पासून वडात जाऊन सरकारासी समक्ष बोलणी होऊन सफाई जाली. एक आपण सी नबाबाचे वच...पके आहे. तर कांही भय नाही. येथील वर्तमान तिकडे राव साहेबाकडे गेले त्याणीही मुतद पत्रे लिा आणि समक्ष जाब साल होऊन सफाई होऊन सिल्लेदार यासी चार घा देणे याची तोड काढावी. याची ती आज निश्चेल आपण कोणे गोष्टी विशी चिंता न करिता स्वस्थ असावे. लस्करास्ता कुच होऊन दोन च्यार रोजात महतपुरानजी येणार आहे. परवा मगळवारी आहुरा नजीक मुा होता. तेथून कुच जाले आजही मुा डगे नजीक होणार. पुढे महतपुरात पुरावर मुा जाल्यावर तेथून नजीक पडेल. वडीली तिकडील खासगी वगैरे माहाली ताकीद करून ऐवज वसूल घ्यावा, ये विसी रा मेगातीदाम याजलाही आलादा पत्र लिो आहे. त्यास निक्षून ताकीद असावी. आपली निष्ठा एक सरकार लक्षात तेव्हा कोन्हाच्याने काही घडत नाही हे "लक्ष्मीत ईश्वर सर्व नीट्च करील काळजी तिलःप्राय करू नये ता.च्या प्रकार बहुत लयही बहुत होत...लका घडल ते खरे स्वारी दक्षणेस जाण्याचे विचारात आहे. तेव्हा तिकडे येईल्न भेटही होईल बहुत काय लिो लोभकीजे हे विज्ञापना."¶

हेच पत्री चितो नारायण याचे आसीर्वाद. सदरी लिहिले आहे त्याजवरून कळेल. ईश्वर सर्व कडून जिकडील तिकडे निराकर्ण होईल. आपण कोणे गोष्टी विसी काळजी न करावी. दोचार रोजात लष्करे महतपुराकडे येणार आहेत. कळावे लोभ असावा हे विनती.

—८—

श्री

चक्रचूड मंडित सौ रखमाबाई याग,

प्रति लक्ष्मण सदाशिव नमस्कार. विनती येथील कुशल ता मार्गशीर्ष शुा १५ यथा स्थित असे. विशेष. आलीकडे आपल्याकडील वर्तमान लागत नाही. त्यास सविस्तर कळवावे. लस्कराची बातमी परस्पर ऐकिलीच असेल. हली ताअन्चा मुकाम महतपुरावर आहे. आपली फौजेचा मुकाम कोठे आहे हे आजपर्यंत बातमी नाही. माणसे बातमीस पाा आहेत पत्री बातमी आल्यानंतर कळऊ. राजश्री तात्यासाहेब खुशाल आहेत म्हणोन कळले. ईश्वरकृपेने जे उत्तम

¶ अवतरणातील अक्षरावर शिरोरेषा नाही.

तेच घडल इत पर शत्रूचे शस्त्र काही चालणार नाही आपल्या कडील ही माणसे बातमीस गस्तीस असतील पर्की बातमी आली म्हणजे इकडे सत्वर कळवावी आपण काण गोष्टी विसी काळजी करू नये श्रीजी सर्व विघ्ने दूर करील इकड वर्तमान आल्यावर लिहून पाठवीन बहुत काय लिहिणे लाभ करावा हे विनती

–९–

## रवाना छ ४ जमादिलावल श्री

सौभाग्यवती वज्रचूडे मंडित रखमाबाई यासी,

लक्ष्मण सदासीव नमस्कार विनंती येथील कुशल ता फाल्गुण शुा ९ गुरुवार मुा महतपूर यथास्थित आसे विशेष राजश्री तात्यासाहेब काल बुधवारी गंगराडेस आले आज येथ मुकाम येणार राने डारान वर्तमान आले आपल्यास कळवे एक दोन रोजात क्षत्री येतील बहुत काय लिहिणे लाभ करावा हे विनंती

–१०–

श्री

वडिलाचे सेवेसी आपत्याचा कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ताा कार्तिक वाा १० यथास्थित आसे, विशेष पत्र पाठविले ते पावले मजकूर समजला इकडील काळजी बिलकुल न करावी घरसदाचे व सडेंग मंडळ याच आहे त्यास स्वारीचा कूच होऊन आज मुकाम महतपूर नजीक आला आहे येथ दोन चार मुकाम होऊन धरण्याचा तोडजोड निघोन किसाजी–कडील तिकडे एक दफ होईल काळजी न करावी पत्र वरचेवर पाठवीत जावे ताम्रा कडे दाट निकडीस आहे § ते घेऊन पुण्याकडील वर्तमान श्रीपत सरधानीहून निघोन पुरदऱ्याहून सिंहगडास गुजरायचे ल्यास गेले मागे शत्रूची लगत आहे घडल त्या वर चेवर पत्र पाठवून वर्तमान कळवीत आहे सेवेसी श्रुत होय ही विज्ञापना ’ ‡

राजश्री बाबूरावजी साहेब नमस्कार विनंती ‘ लि॥ परिमान लाभ कीजे ही विनंती ‡

–११–

## पो छ ४ जमादिवल श्री

साहेबाचे सेवेसी सा नमस्कार विनंती येथील कुशल ता फाल्गुन शुा ॰ गुरुवार पावेतो साहेबाचे कृपेकरून यथास्थित आसे विशेष येजमान साहेब गंगराडेस आले आताच बातमी इसमाच डाकेत आली आज सायकाल परियेंत महतपुरास येतील त्याचा येण्याची बातमी म्हणोन दोन तीन मुकाम येथे करून राहिला भट जाल्यावर जसी आज्ञा करितील त्या आन्वय करू राजश्री बापाजी पागा घेऊन पुढे सामोरे आणावयास एक दो घटकेत जातील सेवेसी श्रुत होय ही विज्ञापना

§ हा भाग फाटला आहे

‡ अवतरण चि हांर्त ल लिखाणावर शिरोरेखा नाही

राजश्री बाबूरावजी व माधवरावजी व गणेशा स्वामीस सा. नमस्कार लिा परिसोन लोभ करावा ही विनंती.

-१२-

मि॥ वा॥ ७ बुधवार

श्री

चिरंजीव सौवती गंगाबाई यासी

प्रति विठल महादेव आशीर्वाद उपरी येथील कुशल मार्गशीर्ष वा॥ १३ शुक्रवार परियेंत. मु॥ नजीक सीतामहू येथें यथास्थित जाणोन स्वकीय लिहिणे. विशेष इकडील लढाईचे वर्तमान तुम्हास कळलेच असेल. नतर पौर्णिमेस महाराजानी वस्त्रे उभयतास दिली. इकडील काळजी एकरूप न करावी. सर्व आरिष्टे श्री गजाननाचे कृपेनें निवारण जाली. सर्व वर्तमान येथून राजश्री बापाजी वैद्य राज मु॥ रवाना केले ते साकल्य सांगतील. कळावे बहुत काय लिहिणे हे आशिर्वाद.

# ' राजनीति ' अमात्यांची कशी ?

( लेखक–वि. भि. कोलते, M A LL B, अमरावती )

शिवकालीन महाराष्ट्रात, आपल्या अगच्या कर्तबगारीने व बुद्धिकौशल्याने जी अनेक घराणी उदयास आली त्यापैकीच पत अमात्याचे घराणे हे एक होय या घराण्याचा मूळ पुरुष निळो सोनदेव हा असला तरी त्याचा पुत्र रामचंद्र नीळकंठ यानेच आपल्या कुलाची प्रतिष्ठा महाराष्ट्राच्या इतिहासात सुप्रतिष्ठित केली

उभयता पितापुत्रानी आपापल्या काळी अपूर्व शौर्य व मुत्सद्देगिरी गाजवून आपल्या स्वामींची, अर्थात् छत्रपतींची मर्जी सुप्रसन्न करून घतली होती पण त्यात रामचंद्रपताचच यश अधिक उज्ज्वल आहे. संभाजीच्या वधानतर म्लेच्छाधिपतीच्या मर्मप्रहारानी विकलांग व छिन्न विछिन्न झालेल्या मराठशाहीच्या मंदिराला आपल्या मुत्सद्देगिरीने टुणी मावरून धरले असल तर ते रामचंद्रपन्त अमात्यानच त्या विपन्न परिस्थितीत मराठ सरदारात जूट त्यानेच धडवून आणली, महाराष्ट्रात चैतन्य त्यानच आतले, यवनानी पादाक्रांत कल्ले स्वराज्य परत मिळवून मराठ्याची कीर्ति व छत्रपतीचे तख्त त्यानेच कायम राखले यामुळेच रामचंद्रपत अमात्याच नाव मराठ्याच्या इतिहासात अजरामर झाले आहे यात शका नाही या थार पुरुषाच्या कामगिरीचे समालोचन दुसऱ्या शिवछत्रपतीने एका सनदत पुढीलप्रमाणे कले आहे

"त्यानतर त्यामागे थारले कैलासवासी स्वामीने तुमच बहुता प्रकारे चालविले थोरले कैलासवासी स्वामीस कैलास जाहलिया उपरी राजश्री संभाजीराज काका यानी तुम्हास सुरनिसीचा हुद्दा सांगोन कुडाळप्रातेन नरगुद तुगभद्रापर्यंत दश तुमच स्वाधीन करून रवाना कले ते समई तुम्ही सममाहास करून कितेक देशदुर्गादी संपादन कल. तदनंतर अवरंगजेब दक्षिणवरी चालोन आला विजापूर भागानगर या पादशाही हस्तगत करून राजश्री संभाजीराजे काका यावरी सेना पाठविली ते समई तमाम हस्तगत जाले त्याउपरी तीर्थस्वरूप राजश्री कैलास वासी स्वामी सिंहासनारूढ जाले असता अवरंगजेब पादशहा याण सवारी करून सपूर्ण राज्य आक्रमायाचा उद्योग कला आणि आक्रमीन चालिला ते समई राज्यभार तुम्हावरी टाकून कैलासवासी स्वामी स्वार होऊन कर्नाटकप्रात चजीस गले मागे तुम्ही मनासभार मेळऊन ताम्राच्या फौजा मारून चालविल्या कितेक देशदुर्गे ताम्रानात झाली होती ती पुढा हस्तगत

लेखकाच्या इच्छनुसार ही शुद्धलेखन पद्धति मुद्दाम उपयोजिली आहे

करून गेले राज्य सपादून बरचेवरी सतायनातो चजीम पाठवीत गलेस त्यावरून कैलासवासी राजश्री स्वामी तुम्हावरी सतापी होऊन मजमूचा हुद्दा पहिले तुमच बाप निला सोनदेउ यास होता तो तुम्हास सांगोन तुम्हावरी कृपा दिवस दिवस विशेष करी तुम्हीही निस्सगपूर्वक वर्तोन स्वामीचे राज्य ताम्राक्रांत हात ते सपूर्ण यथापूर्व हस्तगत केल चपीम कैलासवासी स्वामी असता तिकडे ताम्राची रज होऊन चजीस परिभ पडिला ते ममई तुम्ही या मातीहून कर्नाटकात सेनासभार पाठवून कैलासवासी स्वामीचे सकट निरसन कले त्याउपरी "या उताऱ्यावरून खुद्द दुसऱ्या शिवछत्रपतीला रामचद्रपताची कामगिरी किती बहुमोलाची वाटत होती याची स्पष्ट कल्पना येईल

प्रस्तुत रामचद्रपत अमात्याच्या नावावर 'मराठशाहीतील राजनीति' अथवा 'आज्ञापत्र' या नावाचा एक राज्यशास्त्रावरील प्रबंध माडतो हा प्रबंध आकाराने अगदी लहान असला तरी गुणानी तो फार मोठा आहे मराठी भाषेतील प्राचीन ऐतिहासिक वाङ्मयात असा दुसरा सरागसुदर ग्रंथ क्वचितच आढळेल प्रतिपाद्य विषयाचे सूक्ष्म व मार्मिक विवचन आणि त्या विवचनाला वाङ्मयाचा शृगारसाज चढविणारी अभिजात व डौलदार अशी प्रौढ भाषापद्धति याच माठ मनाहर मिश्रण या प्रबधात पहावयास सापडते आणि म्हणूनच प्रस्तुत प्रबंध हा इतिहासज्ञ व वाङ्मयाभ्यासक या दोघाच्याही कौतुकाचा व आदराचा विषय झालेला आहे राजकारणाच्या क्षेत्रात नामाकित झालेल्या रामचद्रपताच्या नावावर तो माडत असल्यामुळे तर कित्येकाना हा ग्रंथ म्हणजे अमात्याच्या यशामदिरावरील वाङ्मयरूप कळस असल्यासारखाच वाटतो पण हा प्रबंध खरोखरच रामचद्रपतान लिहिलेला आहे काय ?

अशी शका त्याच्या सूक्ष्म वाचनानतर मनात डोकावल्यासरीज रहात नाही आणि ही शका आज मलाच प्रथम यत आहे असं नाही प्रसिद्ध इतिहाससशोधक कै का ना साने यानी या आज्ञापत्राच्या 'कर्त्याविषयी शका प्रदर्शित केली होती' असे श्रीयुत शकरराव दव (धुळे) हे आपल्या सज्जन पत्रात लिहितात 'विविधज्ञानविस्तार पुस्तकमालेतून' हा प्रबंध प्रसिद्ध करण्यात आला (सप्टेंबर १९९६) तव्हा मात्र त्याना अशी शका नव्हती अस दिसते त्या पुस्तकाच्या प्रस्तावनत कै साने यानी हा प्रबंध रामचद्रपताचाच असल्याचे गृहीत धरलेले आहे (प्रस्ता पृ १०) हे स्पष्ट दिसते प्रस्तुत पुस्तकाच्या प्रसिद्धीपूर्वी किंवा नतर त्याना वरील शका आली असल्यास आपल्या कारणासहित त्यानी तिच कुठ विवेचन केल्ल मला आढळत नाही

प्रा श्री ना बनहट्टी यानी पाच सहा महिन्यापूर्वी नागपूर यथील 'मध्यप्रांत सशोधन मडळात' याच विषयावर निबध वाचला त्याचा तो निबध अजून प्रसिद्ध झालेला नाही तथापि 'माझ्या लेखातील ग्रंथ आज्ञापत्रातील पहिली दोन प्रकरणच केवळ नव्हेत तर सबंध आज्ञापत्र रामचद्रपत अमात्य याना लिहिल असण शक्य नाही, अशा स्वरूपाचा आहे' अस त्यानी मला लिहिल आहे

नि. मि. कोल्ते

# राजनीतीचे हस्तलिखित

नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या 'पंत अमात्य बावडा दप्तर भाग १ ला' या ग्रंथामुळे माझ्या यावर याच प्रकाश पडेल असे मला वाटले होते तथापि त्याचा विशेष फायदा झाला नाही त्यात रामचंद्रपंत अमात्यांच्या नावावर मोडणारी 'राजनीति' अथवा 'आज्ञापत्र' छापलेले आहे. "यांतील सन १६६० ते १७१५ इसवी या काळातील–रामचंद्रपंत अमात्यांनी शिव शाहीतील राजनीतिसंबंधी लिहिलेले व 'आज्ञापत्र' म्हणून प्रख्यात असलेले कागद धरून सर्वापत्र कागद या पहिल्या भागात समाविष्ट केले आहेत" असा खुलासा संपादक श्री० सरनीमानी पुस्तकाच्या प्रस्तावनेत केलेला आढळतो बावडा जहागिरीच्या दप्तरी दाखल असलेल्या कागदपत्रात 'आज्ञापत्राचा' कागद मुळीच नाही बावडा दप्तरात छापल्याप्रमाणे खरोखरच आज्ञापत्राचे हस्तलिखित मूळ दप्तरात आहे किंवा नाही याची खात्री करून घेण्या साठी 'बावडा दप्तराची पहाणी व निवड करून कालानुक्रम लावण्याचे काम' ज्यांनी अत्यंत 'श्रमाने व मुद्दाम गगनबावड्यास' जाऊन केले त्या रा. ब. रियासतकार गो. स. सरदेसाई यांच्याकडे मुद्दाम चौकशी केली

'बावडे दप्तरात राजनीतीचे हस्तलिखित नाही विविधज्ञानविस्तारात हे प्रकरण पूर्वी छापले, त्यावरूनच पंत अमात्यांना त्याची माहिती तो ग्रंथ रामचंद्रपंतांनी लिहिला असा यत्किंचित् पुरावा दप्तरात आढळत नाही याच हेतूने दप्तराच्या संरक्षकांनी व आम्ही निखळ शोधले रामचंद्रपंत ज्या पोथ्या वगैरे नेमाने वाचीत त्याही सर्व शोधल्या, पण बिल्कूल पत्ता लागला नाही सरनीमानी दर्शील रि. शा. वि. च्या लेखावरूनच तो लेख आपल्या ग्रंथात छापला ' असे ते लिहितात

विविधज्ञानविस्तारात ज्या हस्तलिखितावरून प्रस्तुत प्रकरण छापले होते ते हस्त लिखित सुद्धा सापडत नाही असे कळते त्याची 'एकमेवाद्वितीयम्' अशी प्रत धुळे येथील श्रीसमर्थवाग्देवता–मंदिरात आहे असे समजते तथापि, त्याच्या संग्रही असलेले हस्तलिखितसुद्धा 'अस्सल' नाही, तर 'नक्कल' आहे त्याच्या शेवटी 'शालिवान शके १७६५ शोभ कृन्नाम संवत्सर कार्तिक शुद्ध १० इंदुवासर संपूर्णम् ही नीति हुजूर लिहिली असे' असा समाप्ति–लेख आहे त्यावरून ही नक्कल शक १७६५ तील म्हणजे इ. स. १८४३ तील आहे कोणत्या लेखकाने ती नक्कली याचा उल्लेख तीत नाही श्री शंकरराव देव यांच्या अदाजाप्रमाणे 'ती बडोद्याची असावी व हुजुर म्हणजे बहुधा गायकवाड' असावे असे वाटते या हस्तलिखिताचा आरंभ व शेवट विविध ज्ञान विस्तार मासिकातून प्रसिद्ध झालेल्या 'राजनीती'तील मजकुराशी बरोबर जुळतो क्वचित् अक्षर लेखनात फरक आहे पण मजकुरात नाही त्यामुळे या हस्तलिखिताचा नवीन माहिती मिळविण्याच्या बाबतीत काही उपयोग होत नाही राजनीतीच्या 'लेखका'च्या प्रश्नावरही त्यामुळे नवीन प्रकाश मुळीच पडत नाही असो

प्रस्तुत ' राजनीति ' ही रामचंद्रपंत अमात्याची आहे असे समजले जाते; पण तसे का समजावे हेच कळत नाही. रामचंद्रपताने ती स्वतः लिहिली असावी, असे दाखविणारे एकही वाक्य या राजनीतीत नाही. उलट तिचा आरंभ व शेवट जर नीट रीतीने लक्षात घेतला तर ती रामचंद्रपंताने लिहिली नसून दुसऱ्याच कुणी तरी लिहिली असावी हे स्पष्ट दिसते. राजनीतीचा आरंभ आणि शेवट असा.

आरंभ—" स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४२ मन्मथनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध चतुर्थी गुरुवासेर क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपती स्वामी यांणी समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित अमात्य हुकुमत पन्हा यांसी आज्ञा केली ऐसीजे:- स्वामी राज्यासनारूढ जाहले असता " वगैरे.

शेवट—" याप्रमाणे हुजुरात, गड, किल्ले आदिकरून परम सावधतेने वर्तत मातुश्री साहेबांचे सेवेशी कोणेही अर्थे अंतर न पडे, तुम्ही केले सेवेचा मुजरा होय आणि या दिगंतरित यशास तुम्ही पात्र होऊन स्वामींनी जो तुम्हावर संपूर्ण अखत्यार दिला आहे आणि स्वामींची अनुग्रह दया तुम्हावरी आहे, ती दिनप्रतिदिनी अभिवृद्धीस पावे ती गोष्ट करणे. तो योजिला संपूर्ण उद्योग सिद्धीस पावून सत्वरच स्वामींचे आगमन त्या प्रांती होत आहे. तदोत्तरी तुमच्या विचारे आणखीही कित्येक नाजूक धंद्याचे नियम, जे परपरेने राज्याभिवृद्धीस उपयुक्त आणि इहलोक परलोक साधन, ज्यास सपूर्ण कीर्ति, ते सर्वही यथान्याये करून दिले जातील. "

## आत्मस्तुतिपर उल्लेख

या आरंभावरून व शेवटावरून एक गोष्ट स्पष्ट दिसते, की शंभुछत्रपतींने रामचंद्रपंत अमात्य यास उद्देशून हे आज्ञापत्र लिहिलेले आहे. आरंभी तर रामचंद्रपंतास उद्देशून मजकूर लिहिलेला असल्याचे अगदी स्पष्टच दिसते; पण शेवटीही त्यासच 'तुम्ही' असे वारवार संबोधल्याचेही दिसून येईल. यावरून, हा आरंभीचा भाग व शेवटचा भाग, हे दोन्ही भाग एकाच लेखकाने लिहिले असावे. असे मानण्यासही हरकत दिसत नाही. आता मौजेची गोष्ट अशी, की या दोन्ही भागात रामचंद्रपंत अमात्याची भरपूर स्तुति केलेली आढळते. अगदी पहिल्याच वाक्यात 'समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि' अशी विशेषणे त्यास लावली आहेत. ती रामचंद्रपंताने स्वतःची स्वतःस लावली असे म्हणणे केव्हाही योग्य होणार नाही. रामचंद्रपंताने हा भाग लिहिला असता तर त्याने आत्मस्तुतिपर अशा या शब्दांचा आपल्यासाठीच उपयोग केला नसता. बरे, पदवी ही विशेषणेच रामचंद्रपंताच्या स्तुतिपर आहेत असे नाही तर, दुसऱ्या प्रकरणाच्या शेवटी ' तुम्ही कृतकर्मे सेवक, तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामी कर्नाटकप्रांती गेले तेव्हा हा राज्यभार विधला असता तुम्ही यथोचित राज्याभिवृद्धि केली. तुम्हास राजकार्य, नीति, मर्यादा अवगतच आहेत. '

हे रामचंद्रपंताच्या कर्तबगारीचे भरपूर वर्णन आले आहे. हे वर्णनसुद्धा अर्थातच, रामचंद्रपंतानेच लिहिले असणे संभवनीय वाटत नाही. दुसरे असे की रामचंद्रपंताच्या नाम-

गिरीची ही स्तुति उघड उघड दुसऱ्या कोणी तरी, म्हणजे स्वामी शंभु छत्रपतींनी केल्या असल्याच स्पष्ट दिसत तेव्हा हा भाग रामचंद्रपंताचा हस्त चा असण शक्य वाटत नाही त्याचप्रमाणे शेवटचा भाग दर्शील रामचंद्रपंताला उद्देशूनच असल्यामुळे ताही त्यान लिहिला असणे शक्य दिसत नाही सारांश या कारणामुळे 'राजनीती'चा लेखक रामचंद्रपंत अमात्य नसून दुसराच कोणी तरी असावा असं म्हणण्यास हरकत नाही.

यावर पुढील युक्तिवाद करता येणे शक्य आहे तो असा, की 'हा आरंभीचा मजकूर रामचंद्रपंतास उद्देशून असला व त्यात त्याच्या स्तुतिपर अशी विशेषण वापरून त्याच्या स्वामिकार्याचे वर्णन केल असले तरीसुद्धा तवढ्यावरून ही राजनीति अमात्याची नसावी अस म्हणता येणार नाही स्वामींच्या आज्ञेनुसार प्रयत्नशील करीत असताना पूर्वीच लेखक आपल्या स्वामीचा ती आज्ञाच प्रथमारंभी उद्धृत करीत असतात व मग 'एशियास'–असं म्हणून ग्रंथ लेखनाला आरंभ करतात या पद्धतीप्रमाणे, राजनीतीच्या आरंभी असलेला मजकूर हा पंतास स्वामींच्या 'आज्ञापत्रा'वरून जसाचा तसा उद्धृत केला असल त्यावरून पार झाले तर असे म्हणता येईल की राजनीतीची पहिली दोन प्रकरणे तरी रामचंद्रपंताची नसावी' पण हा युक्तिवाद फारसा टिकू शकत नाही कारण असं, की केवळ आरंभीचाच नव्हे तर शेवटचाही भाग रामचंद्रपंतास उद्देशून लिहिलेला असल्याचे जर स्वच्छ दिसत आहे तर तो त्यानं स्वत च लिहिला असावा असं मानणं कसे शक्य आहे? आता आरंभाचा भाग म्हणजे शंभुछत्रपतींनी रामचंद्रपंतास प्रस्तुत राजनीति लिहिण्यास केलेली आज्ञा असावी' या म्हणण्याचा विचार थोडा बारकाईने करणे अवश्य आहे त्यावरून काय निष्पन्न होते ते पाहू या

## 'आज्ञापत्र' कशासाठी ?

श्री शंभुछत्रपतींनी रामचंद्रपंताला 'आज्ञा' केली आहे यात शंका नाही पण, ही आज्ञा कोणती? कशाबद्दल? रामचंद्रपंताला छत्रपतींने काय करावयाला सांगितले? या प्रश्नांच्या उत्तरांना शोध केल्यास बऱ्याच गंभीर स्वरूपाचे प्रकार पुढे येतील असं वाटते विविधज्ञान विस्तार–मधून छापलेल्या आज्ञापत्राच्या दुसऱ्या प्रकरणाच्या शेवटी असलेल्या मजकुरात शंभुछत्रपतींच्या आज्ञेच स्वरूप नीट पहावयास सापडत तो सर्व मजकूर वाचका समोर अक्षरशः मांडला मग त्यावरून आपणास काय अनुमाने काढता येतात ते नतर पाहू! तो मजकूर असा—

'स्वामी सुमुहूर्ते तख्तारूढ जहाले श्रीकृपे अल्पकाळेच मुख्य शत्रूंचा पराभव करून दिल्ली, आग्रा, लाहोर, ढाका, बंगाल, ठठ्ठा, जल्कपादि करून संपूर्ण तलबंध दरादुर्ग हस्तवश्य करून वाराणसीस जाऊन स्वामी श्रीविश्वेश्वर स्थापना करितात, तावत्कालपर्यंत दक्षिणप्रांत सरक्षणार्थ श्रीमत्सकलतीर्थैकतीर्थ श्रीमन्माताश्रीसाहेब दक्षिणप्रांतास राहिले आहेत त्या संनिध श्रियासह चिरंजीव जीवितादधिक प्रियतम राजश्री राजकुमार यास ठेवले आहेत उभयतांचे सेवेशी तुम्हास नेमिले आहेत एसीयासी स्वामी कायावाचामनसा मातोश्रीसाहेबांचे चरणाविरहित अन्य

दैवत जाणत नाहीत. हे राज्य व हा कीर्तिलाभ व पुढे जे होणे यथाप्राप्ति हा सकलही त्याचे चरणाचा प्रसाद. त्याची आज्ञा परिपाळण करून त्याचे चित्त प्रसन्न करून घ्यावे यापरते स्वामीस इतर इष्ट साधन नाही. ही स्वामीची अनुपम निष्ठा तुम्हास कळलीच असली पाहिजे. तदनुरूप तुम्ही हा सपूर्ण अर्थ बरा चित्तात आणून त्याचे आज्ञेप्रमाणे वर्तोन श्री मातोश्रीसाहेब स्वामीवर दिन प्रतिदिनी संतोष पावत ते करावे. तुम्ही कृतकर्म सेवक. तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामी कर्नाटक प्रांती गेले तेव्हा हा राज्यभार दिधला असता तुम्ही यथोचित राज्याभिवृद्धि केली तुम्हास राजकार्य, नीति, मर्यादा अवगतच आहेत. तथापि चिरंजीव राजश्री राजकुमार राजकार्यी सुशिक्षित व्हावे व वरकड देशोदेशी देशाधिकारी व पारपत्यगार यानी नीतीने राज्यसरक्षण करावे यास्तव स्वामींनी यथाशास्त्र 'राजनीति' या आज्ञापत्रावरून केली आहे ती सकल चित्तात आणून चिरंजीव राजकुमार तदनुसार अधीत होत असे करावे. तसेच सकल लोक त्याप्रमाणे यथाधिकार वर्तोन राज्य सरक्षण करावे."

हा उतारा थोडा लांब झाला खरा, पण विवेचन सुलभ व्हावे म्हणून तो येथे उद्धृत करणे आवश्यक होते. छत्रपतींने रामचद्रपताला सांगितलेल्या कामगिरीचे स्पष्ट स्वरूप दिसून येते. या उताऱ्याचे पृथक्करण करून पाहिले असता रामचद्रपताकडे पुढील कामे छत्रपतीने दिल्याचे आढळते—

१. स्वामींच्या अनुपस्थितीत दक्षिणप्रांताच्या सरक्षणासाठी राहिलेल्या श्रीमातोश्रीसाहेबांची व राजकुमाराची सेवा करणे.

२. मातोश्रीसाहेब स्वामीवर दिनप्रतिदिनी संतोष पावत ते करणे.

३. स्वामींनी यथाशास्त्र राजनीति या आज्ञापत्रावरून केली आहे. ती सकल चित्तात आणून तदनुसार चिरंजीव राजकुमार अधीत होत असे करणे. आणि

४. राज्यसरक्षण करणे.

यापैकी तिसरा मुद्दा अत्यंत महत्त्वाचा आहे. त्यात स्पष्ट सांगितले आहे की स्वामींनी यथाशास्त्र राजनीति तयार केली आहे. त्याप्रमाणे राजकुमारास शिक्षण द्यावे

अर्थात् स्वामींने (किंवा त्यांच्यासाठी दुसऱ्या कुणी तरी) लिहिलेल्या राजनीतीप्रमाणे राजकुमाराला शिक्षण देण्याचीच म[illegible] नी कामगिरी रामचद्रपताना या आज्ञापत्राच्या द्वारे सांगितलेली आहे. 'राजनीति' तयार करण्याबद्दल किंवा लिहिण्याबद्दल त्याला हुकूम केलेला नाही. तेव्हा रामचद्रपतानं 'राजनीति' लिहिण्यापूर्वी आपल्याला तसे करण्याबद्दल मिळालेल्या आज्ञापत्रातील मजकूर आधी [illegible] घातला आहे, असे म्हणण्यास जागाच शिल्लक राहत नाही यावरून मला असे वा[illegible], 'राजनीती'चा लेखक रामचद्रपत असणे शक्य दिसत नाही राजनीतीच्या खऱ्या [illegible] आरंभ तिसऱ्या प्रकरणापासून होतो. तेव्हा आरंभीची दोन प्रकरण रामचद्रपताची [illegible], पण पुढील प्रकरण तरी त्याची असावीत असे म्हणण्याला वरील विवेचनावरून जा[illegible] नाही. कारण त्यात सरळ स्पष्ट शब्दात रामचद्रपताला सांगितले आहे

की, ' तुम्ही स्वतः राजनीति जाणणार आहात तरी दखील राजकुमाराच्या शिक्षणासाठी म्हणून व राज्यसंरक्षणासाठी स्वामी तुम्हाला ही ' राजनीति ' तयार करून देत आहेत. त्याप्रमाणें तुम्ही त्याला ( राजकुमारास ) शिक्षण द्या ' यावरून दिसूनच येते की राजनीतीचा मूळ भाग दखील इतर कुणी तरी लिहिलेला असावा, रामचंद्रपंताने नव्हे.

याला उपलब्ध असे दोनतीन पुरावे आणखी देता येतील. मागे उद्धृत केलेला राजनीतीचा शेवटचा भाग जर लक्षात घेतला तर असे दिसून येते की तेथ मुद्दा—म्हणजे मूळ ग्रंथाच्या शेवटात मुद्दा ही हुकुमाची भाषा वापरलेली आहे. आणि तो हुकूम आरंभीप्रमाणेच आहे म्हणून मातोश्रीसाहेबांची सेवा, राज्यसंरक्षण वगैरे हा भाग रामचंद्रपंतालाच उद्देशून लिहिलेला आहे, हे ' तुम्ही केले सरचा मुजरा होय आणि स्वामींनी तुम्हावर जो संपूर्ण अखत्यार दिला आहे ' या वाक्यावरून स्पष्ट दिसून येते. अर्थात हा भाग रामचंद्रपंताने स्वत च लिहिला असणे शक्य नाही. म्हणून पहिल्या दोन प्रकरणांचेच नाही तर मूळ राजनीतीचेही कर्तृत्व पंताचे असणे शक्य दिसत नाही

दुसरे असे की, या शेवटच्याच भागातील ' या प्रमाणे हुजुरात गडकिल्ले आदिकरून परम सावधतेने वर्तत ती गोष्ट करणे ' या वाक्यातील ' या प्रमाणे ' हा शब्द असे सुचविता की या लिहून दिलेल्या ' राजनीती'प्रमाणे हुजुरात, गड इत्यादिकांचे संरक्षण करण्याची आज्ञा रामचंद्रपंताला सांगितली आहे तेव्हा ही राजनीति रामचंद्रपंताने काही लिहिली नाही ती दुसऱ्याच कोणी तरी लिहिलेली असावी, हे उघड उघड दिसून येते

## वतनासंबंधी उल्लेख

राजनीतीचे हे प्रकरण रामचंद्रपंताचे नसावे असे दाखविणारा अंतर्गत पुरावाही पुढे मांडता येणे शक्य आहे. राजनीतीच्या शेवटल्या प्रकरणात वतनाविषयी लेखकाने सगळेच विचार केलेले आहे त्यात तो स्पष्ट लिहितो की काहीही झाले तरी राजाने ' इत्यादि दाट वर वितात आणून नूतन वृत्ति कोणास करून न द्यावी ' यासाठी त्याने युक्तिवादही मोठा सुंदर केलेला आहे तो म्हणतो ' जो राजा होतो तो राजाचा शान असेल त्याने भूमीवर उदार व्हावे राजास भूषण असे भूमीकरिता म्हणावे, तो भूमीच गेल्यावर राज्य कशाचे करणार ? पति कोणाचा होणार ? ' म्हणून ' जो राजा राज्य करणार, राज्य वाढविणार, नीतिवंत म्हणवून कीर्ति संपादणार त्याणे सर्वांथी माह न पावता यवादरप्रमाण भूमि तीही इनाम देऊ नये ' ( पृ २४ २५ ) इतके निक्षून लिहिणारा हा लेखक रामचंद्रपंत असेल असे वाटत नाही बारड दप्तरात ( भाग १ ला ) प्रसिद्ध झालेला पत्रव्यवहार पाहिला म्हणजे रामचंद्रपंत अमात्य हा वतनाचा फार लोभी होता असे म्हणावे लागते छत्रपतीजवळ तो नेहमी आपल्या साठी व आपल्या वंशजासाठी नवीन नवीन वतन मागत असे असे दिसून येते राजारामाच्या कारकीर्दीत पंताने उत्कृष्ट कामगिरी बजाविली यात संशय नाही पण त्याबद्दल त्याने छत्रपती कडून किती तरी इनामवतने मिळविलेली होती[1] बावडे दप्तरातील अनुक्रमांक १२ वा लेख याचा

चागला निदर्शक आहे. तरे, ही वतने राजारामाने आपणहून दिली होती असेही नाही रामचंद्र पताने ती मागून घेतली. 'आपण स्वामीच्या राज्यानिमित्य समसाहास करून राज्याभिवृधी कली याकरिता स्वामीने आपला मजमूचा हुदा जीर्णोद्वार करून आपणास सांगितला. परतू हुदा म्हणजे बारगीर वस्तू आहे. यानिमित्ता स्वामीनी आपली पहिली वतने व इनामती आहेत त्याचा भोगवटा बहुत दिवस तुटला आहे ती वतने व इनामती आपणास वंशपरंपरेन दिले असे करावे व **नूतनही इनामती वतने अजरामऱ्हामत करून वंशपरंपरेस चालेत ऐसि** आज्ञा केली पाहिजे' अशी दुसऱ्या शिवछत्रपतीजवळ पताने याचना केली होती. त्याप्रमाण त्याच्या नूतन इनामाचा जीर्णोद्वार करून ती व नवीन काही वतने त्यास वंशपरंपरेने दिली गेली. ( बाधडा दसरपा १०,२२,१०४,१०५ ) नवीन वतने आणि तीही वंशपरंपरेने मुळीच करून देऊ नयेत ( आज्ञा. पा. २४ ), 'यथोदग्रमाण भूमि तीही इनाम देऊ नये' असे कळकळीने सांगणारा राजनीतीचा लेखक व आपल्यासाठी वंशपरंपरेने नवीन वतने मागणारा रामचंद्रपत हे दोन्ही एकच असणे शक्य आहे काय? मला तरी तसे वाटत नाही नवीन वतने मिळविण्याच्या बाबतीत रामचंद्रपत फार आधाशी होता असे दिसून येते. स्वतःच्याच नव्हे तर इतराच्याही वतनावर याचा नेहमी डोळा असे. रियासतकार सरदेसाई यासबंधी म्हणतात की "शंकराजी नारायण सचिव, सुंदर तुकदेव, धनाजी जाधव, संताजी घोरपडे, प्रत्यक्ष रामचंद्रपत अमात्य ही मंडळीसुद्धा दुसऱ्याची वतने हिरावून स्वार्थ साधण्यात कमी नव्हती" ( रियासत राजाराम, पा० ९६ ) यावरून रामचंद्रपताच्या लाभाविष्णर्ते स्वरूप कळून येईल अशा या गृहस्थाने वर उल्लेखिलेला राजनीतीतील वतनाविषयीच मजकूर लिहिला असणे शक्य मानणे अत्यंत हास्यास्पद होईल. या अतर्गत पुराव्यावरूनसुद्धा राजनीतीचे प्रकरण रामचंद्रपत अमात्याने लिहिले असावे असे मानता येणे शक्य दिसत नाही

दुसरे असे की राजनीतीच्या पहिल्या दोन प्रकरणात लेखकाने आपल्या 'स्वामी'च्या कर्तृत्वगारीची फार फार स्तुति केलेली आढळते. ती रामचंद्रपताची नसावी असे म्हणता येते. कारण हा स्वामी म्हणजे शंभु छत्रपति ( म्हणजे, माझ्या मते, शिवाजी दुसरा ) नावाचा छत्रपति होय राज्यकारभार ताराबाईंच्या पक्षात असे. त्याच्या ( म्हणजे स्वामीच्या ) कार्याचे वर्णन राजनीति पान १, २, ३ व ५ ते ८ इतक्या पानात आलेले आहे. आता रामचंद्रपताने हे वर्णन कल्ले नसावे असे वाटण्याचं कारण हे की त्याचे व ताराबाईचे तितकसे सूत जमत नव्हते रा. न सरदेसायानी तर स्पष्ट म्हटल आहे की दुसऱ्या शिवाजीच्या राज्यारोहणाला पंताची मान्यता नव्हती परंतु परशुराम त्रिंबक व शंकराजी नारायण याच्या आग्रहावरून 'स्वत चे मन मागत नसता केवळ दुही दिसू नये म्हणून, पताने माघार घेऊन ताराबाईस विरोध केला नाही तथापि या वेळेपासून पंताचे मन इतके निष्टुर की राज्याचा गाडा हाकण्याचा त्याचा पूर्वीचा आवेश पार मावळला अगदी जरूर पडेल तेवढ्यापुरती सही दऊन इतर बाबतीत त्यान निवृत्तीच धारण कली' ( रियासत राजाराम, पा १०० ) अशा वृत्तीचा रामचंद्रपत ताराबाईची इतकी स्तुतिस्तोत्रे गात राहील असे वाटत नाही तेव्हा अर्थातच रामचंद्रपताला याचा लेखक मानणे योग्य होणार नाही असे वाटते

सारांश—

१ प्रस्तुत राजनीति रामचंद्रपंतानें लिहिली असें दाखविणारा एकही पुरावा मूळ ग्रंथांत नसल्यामुळें

२ तसेंच यासंबंधी दप्तरांत दुसरीकडे असा कागदपत्रांत पुरावा उपलब्ध झाला नसल्यामुळें

३ इतकेंच नव्हे तर या ग्रंथाच्या आरंभी व शेवटी असलेला मजकूर रामचंद्रपंतास उद्देशून लिहिलेला असल्याचें स्वच्छ व स्पष्ट दिसत असल्यामुळें

४ कोणीही आपल्या स्वत विषयीं लिहिणार नाहीं असा मजकूर रामचंद्रपंताविषयीं त्यांत असल्यामुळें

५ वतनाविषयींचा रामचंद्रपंताचा लोभाभिलाषा व राजनीतिकाराचें धोरण ही अगदीं परस्परविरुद्ध असल्यामुळें आणि

६ ताराबाईंची मुक्तकंठानें स्तुति करणारा लेखक रामचंद्रपंत नसावा यामुळें,

' मराठशाहींतील राजनीति ' अथवा आज्ञापत्र हा ग्रंथ रामचंद्रपंत अमात्याचा नसावा असें मानणें भाग पडतें

## ग्रंथकर्तृत्व कोणाचें ?

तर मग ही राजनीति लिहिली कुणी ? या प्रश्नाचें मात्र नक्की उत्तर देतां येणें कठीण आहे संभुछत्रपतींच्या नांवानें ' राजनीति ' लिहिली गेली असली तरी तिचा लेखक मात्र तो असणें शक्य नाहीं संभुछत्रपतींनीं किंवा त्यांच्या मातुश्रींनी कोणाकडून तरी ती लिहवून घेऊन मग रामचंद्रपंताकडे पाठविली व तदनुसार राजकुमाराला शिक्षण देण्यास आज्ञा केली हे उघड दिसतें हा मूळ लेखक कोण असावा हे ठरविण्यास निश्चित असा पुरावा कांहींच सांपडत नाहीं तो रामचंद्रपंत नसावा असें जसें पुराव्यानिशीं म्हणतां येतें तसें तो अमुकच असावा असें म्हणतां येत नाहीं निदान आज तरी तें शक्य नाहीं तथापि या बाबतींत एक तर्क सुचतो छत्रपतींची आज्ञापत्रें हीं नेहमीं पंतप्रधान व पंतप्रतिनिधि यांच्या शिक्क्यानिशीं दिलीं जात असत सर्वसाधारण प्रतींची वतनपत्र किंवा सनदा यांचा मजकूर जवळजवळ ठरविकच असल्यामुळें तो सबनीस वगैरे कारकुनाकडून लिहिला जात असावा तथापि त्यांचा मायना व प्रमुखी ज्यास आज्ञापत्र, सनद किंवा वतनपत्र द्यावयाचें असेल त्या गृहस्थाचें वर्णन इत्यादि मजकूर पंतप्रधान किंवा पंतप्रतिनिधीकडूनच मागितला जात असावा यातही प्रतिनिधीचें पद हे राज्यांत महत्त्वाचें, तो दुसरा राजाच असल्यामुळें लिहिण्यासवरण्याचें काम तो करीत असेल असें मानतां येत नाहीं पण त्यांच्या हुकमानुसार पंतप्रधान अशीं कामें उरकीत असावा, असा तर्क करणें चुकीचें होणार नाहीं आणि म्हणूनच कागदपत्रावर मुख्यप्रधानाचा शिक्का आढळतो शिवाय आपणास हे ध्यानांत ठेवलें पाहिजे, कीं राजारामानें 'प्रतिनिधि'पद नवीनच निर्माण केलें होतें त्यापूर्वी असलीं कामें मुख्य प्रधानाकडून होत प्रतिनिधिपद निर्माण केल्यानंतर कागदपत्रांवर यांचाही शिक्का असावा असें ठरलें' ( स्थिरबुद्धि राजाराम,

पा. ४१-४२ ) अर्थात पूर्वीप्रमाणेच ही कामे मुख्य प्रधानाकडून होत असावी, असे मानणे योग्य होईल. तेव्हा शंभुछत्रपतीच्या वेळी असलेल्या मुख्य प्रधानाने 'राजनीति'चे हे संपूर्ण प्रकरण लिहिले असावे असा तर्क करावयास काय हरकत आहे ?

आता असा तर्क केल्यास तो इतर पुराव्यानी सबळ होऊ शकतो किंवा नाही हे पाहू या शंभू छत्रपतीच्या वेळी व तत्पूर्वीही मुख्य प्रधानाची कामगिरी नीळकंठ मोरेश्वर पिंगळे बजावीत होता, हे बावडा दप्तरात प्रसिद्ध झालेल्या अनेक पत्रावरील शिक्क्यावरून सहज दिसून येते सभाजीच्या वेळचे एकही पत्र या दप्तराच्या पहिल्या भागात आलेले नाही. तथापि त्याच्या कारकीर्दीत मुख्य प्रधानाचे पद नीळकंठ मोरेश्वराकडेच होते. ( उग्रप्रकृति संभाजी, पा. ३२ ) तेव्हापासून ते त्याच्याकडे होते. शंभू छत्रपतीच्या नावे दिलेल्या इ. स. १७१४ मधील दोन आज्ञापत्रावर (बावडा दप्तर, क्रमांक ९२–९३) मुख्य प्रधान म्हणून या नीळकंठ मोरेश्वराचेच शिक्के आहेत. सारांश, शंभू छत्रपतीच्या वेळी मुख्य प्रधानाची कामगिरी करीत असलेल्या नीळकंठ मोरेश्वरानेच ही राजनीति–वर दाखविल्याप्रमाणे लिहिली असावी, असे मानण्यास हरकत नाही. या राजनीतीच्या पहिल्या दोन प्रकरणात श्री शिवाजी महाराजापासून तो शंभु छत्रपतीपर्यंतच्या छत्रपतीची कामगिरी वर्णन केली आहे. या सर्व कारकीर्दी नीळकंठ मोरेश्वराने पाहिल्या होत्या शिवाजीच्या वेळी त्याचे वडीलच मुख्य प्रधान होते वडिलांच्या शिस्तीत तयार झालेल्या नीळकंठ मोरेश्वराचे नाव शिवाजीच्या वेळच्या मुत्सद्द्यात आढळते आणि संभाजीने तर त्यालाच प्रधान नेमले होते तेव्हा या सर्व कारकीर्दी ज्याने पाहिलेल्या होत्या अशा या गृहस्थानेच वर उल्लेखिलेले वर्णन केले असणे अधिक शक्य आहे.

शिवाय दुसरा असाही युक्तिवाद करता येईल की 'राजनीति' या ग्रंथामध्ये अनुभवाचे व आत्मप्रत्ययाचे जे तेज आढळते ते राजकारणात मुरलेल्या मुत्सद्द्याच्या लेखणीतून उतरले असले पाहिजे. शंभू छत्रपतीच्या वेळी इ स १७१८ च्या सुमारास असे पुरातन मुत्सद्दी प्रामुख्याने दोनच होते. एक रामचंद्रपंत व दुसरा नीळकंठ मोरेश्वर या दोघानीही शिव छत्रपतीपासूनच सर्व कारकीर्दी पाहिलेल्या होत्या व आपापल्या शक्तीप्रमाण राज्यकारभाराचा गाडा हाकण्यास मदत केली होती पण यापैकी रामचंद्रपंत अमात्याची ही 'राजनीति' नाही हे भी वर दाखविलेच आहे. तेव्हा राहता राहिलेला जो नीळकंठ मोरेश्वर त्याच्याकडे या ग्रंथाचे कर्तृत्व देणे योग्य वाटते, नव्हे, तो त्यानेच लिहिला असावा असे मानण्यास हरकत नाही.

याला उपोद्बलक असे आणखी एकदोन मुद्दे पुढे मांडता येणे शक्य आहे नीळकंठ मोरेश्वर हा बऱ्याच दिवसापासून मुख्य [illegible] होता हे आपण पाहिलेच आहे. 'प्रतिनिधि'–पद निर्माण होण्यापूर्वी राज्याचा खरा चालक मुख्य प्रधानच असावयाचा. या प्रधानपदाचेच अत्यंत सुरस व मनोरम वर्णन 'राजनीती'त आपणास पहावयास सापडते.

याच वर्णनाच्या वेळी राजनीतीच्या लेखकाची लेखणी जणु काय प्रतिभेने स्फुरण पावू लागली, आणि त्या भरात तिने प्रधानाचे पुढील सुंदर शब्दात वर्णन केले.

'प्रधान म्हणजे राज्यलक्षणगृहाचे स्तंभ आहेत. राज्य ते यथोचित मरक्षून नूतन निर्माण करणे याचे मुख्य कारण, प्रधान म्हणजे नृपसत्ताप्रसारक, प्रधान म्हणजे प्रजापालनधर्म सरक्षणाचे अध्यक्ष, प्रधान म्हणजे राजमदजनित अन्याय सागराची मर्यादा, प्रधान म्हणजे हस्तीचे अंकुश, किंबहुना प्रधान म्हणजे इहलोकी राज्यकृत्यसपादनामुळे नृपाची विश्रात, धर्म प्रतिपालनामुळे परलोकपथीची दीपिका' ( राजनीति १७–१८ ). हे वर्णन कसे बहारीचे उतरले आहे हे निराळे सागावयास पाहिजे काय ? या वर्णनाचा लेखक, प्रधानपदाचा ज्याने बहुत काळ उपभोग घेतला तो नीळकंठ मोरेश्वरच असावा असे मानणे केव्हाही विसगत होणार नाही.

## सुभाषिते देण्याची पद्धति

लेखनपद्धतीच्या दृष्टीनेही 'राजनीती'चे कर्तृत्व नीलकंठ मोरेश्वराकडेच जात असे साधार वाटते. छत्रपतींच्या आज्ञा बहुतेक मुख्यप्रधानाकडून लिहिल्या जात असत हे आपण मागेच पाहिले. या दृष्टीने बावडा दप्तरातील २४ व्या अनुक्रमाकाचे वृत्तिपत्र नीट लक्षात घेतले, तर त्याच्या व राजनीतीच्या लेखन पद्धतीत एक मोठेच साम्य आढळते राजारामाने रामचद्रपतास दिलेले हे एक वृत्तिपत्र आहे. त्याचा शेवटचा भाग असा

'या वतनाचा हक, लवाजिमा व इनाम पूर्वापार चालत असेल तो तुम्ही अनुभऊन देशकुलकर्णपणाची कमावीस करून सुखरूप असणे या वृत्तीस कोण्ही अन्यथा करील त्यास धर्मशास्त्राचे श्लोक.

**स्वदत्ता द्विगुणं पुण्यं परदत्तानुपालनं ॥**
**परदत्तापहारेण स्वदत्तं निष्फलं भवेत ॥**
**एकैव भगिनी लोके सर्वेषामपि भूभुजां ॥**
**न भोग्या न करग्राह्या विप्रदत्ता वसुंधरा ॥**

हे स्मरोन चालविजील तुम्ही अनुभऊन सुखी असणे जाणिजे निदेश समक्ष."

यात सस्कृत श्लोक देण्याची जी पद्धति आहे तीच 'राजनीती'तही आपणास आढळते. उदाहरणार्थ —

( १ ) कित्येक दशाद्रीपातगतून वस्तुजातीचे येणे राहिले. तसेच सैनिक कित्येक—

( श्लोक )

**मुनयोपि न गच्छन्ति यां गतिं योगिनोपि च ॥**
**स्वामिकार्यगतप्राणास्तां गतिं यान्ति सेवकाः ॥**

या दृढबुद्धीने स्वामिकार्यावर क्षत्रधर्मे शाश्वत लोकाश्रयित जाहले ( आज्ञापत्र २ ).

( २ ) 'त्यापासून पुढे आदि करून' स्वल्प स्वल्प स्वतत्र मागून घेऊन पधरा वर्षाचे वय असता त्या दिवसापासून तितकेच स्वल्पमात्र स्थलावर उद्योग केला.

(श्लोक)

आयुर्मर्माणि रक्षन्ति । आयुरन्नं प्रयच्छति ॥
गांडीविनो मतमिदं । कुतो दैन्यं कुतो भयं ॥

तसेच 'उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी' या दृढबुद्धीने शरीरास्थान पाहता', वगैरे (आज्ञा ८).

(३) '.... असे जाणून हुजरातीत दिल्दार एकंदर न ठेविता लिहिल्याप्रमाणे हुजुरात राखावी.

(श्लोक)

त्यजेत्स्वामिनमत्युग्रमत्युग्रमात्कृपणं त्यजेत् ॥
कृपणाद्विशेषज्ञंस्ततोपि कृतनाशनं ॥ १ ॥

हे गुण, मनुष्याचे दाटीचा कंटाळा व मनुष्यास बोलण्याचा अभाव हे गुण सर्वथा असू नयत.' (आज्ञा. १५)

या उदाहरणावरून राजनीतीच्या लेखकाला मधून मधून संस्कृत सुभाषित उद्धृत करण्याची आवड होती असे दिसते. आरंभी उल्लेखिलेल्या बावडा दप्तरातील २४ व्या क्रमांकाच्या वृत्तिपत्राच्या लेखकास सुद्धा अशीच आवड असल्याचे दाखविले आहे. या वृत्तिपत्राचा लेखक नीळकंठ मोरेश्वरच असावा हेही वाचकाच्या लक्षात आणून दिलेले आहे. या माझ्या वरून हा नीळकंठ मोरेश्वरच राजनीतीचा लेखक असावा, असे वाटते. बावडा दप्तरातील वरील वृत्तिपत्रावर मुख्यप्रधान म्हणून नीळकंठ मोरेश्वराचा व प्रतिनिधि प्रल्हाद नीराजीचा शिक्का आहे. यावरून कदाचित कोणी असे म्हणतील की ते वृत्तिपत्र नीळकंठ मोरेश्वराने लिहिले आहे असे न मानता, प्रल्हाद नीराजी प्रतिनिधीने लिहिले असे मानले तर मग राजनीतीचाही कर्ता तोच. अर्थात प्रल्हाद नीराजीच असावा असे मानता येणार नाही काय? या आक्षेपाला उत्तर असे, की अशी वृत्तिपत्रे प्रतिनिधीपेक्षा प्रधानाकडूनच लिहिली जाणे अधिक संभवनीय आहे असे का, याची कारणे मी वर एका ठिकाणी दिली आहेत. दुसरे असे की प्रल्हाद नीराजी हा इ. स. १६९४ मध्ये वारला. (स्थिरबुद्धि राजाराम, पाने ४२ व ७२) तेव्हा इ. स. १७१५मध्ये लिहिलेल्या राजनीतीचा तो लेखक असूच शकत नाही. उलट यावरून असे मात्र निश्चित म्हणता येईल, की आज्ञापत्रातील संस्कृत सुभाषिते उद्धृत करण्याची लेखकाची सवय व बावडा दप्तरातील २४ व्या वृत्तिपत्राच्या लेखकाची तीच पद्धत लक्षात घेतली असता व १७१५च्या पूर्वीच प्रल्हाद निराजी मृत्युवश झाला होता हेही लक्षात ठेवले असता, या वृत्तिपत्राचा व राजनीतीचा लेखक नीळकंठ मोरेश्वरच असणे अधिक शक्य वाटते.

## प्रमेय, सिद्धांत नव्हे!

सारांश, मराठेशाहीतील 'राजनीति' अथवा 'आज्ञापत्र' या ग्रंथाचे कर्तृत्व रामचंद्रपंत अमात्य बावडेकर यांच्याकडे दिले जात, ते चुकीचे असून, नीळकंठ मोरेश्वर पिंगळे,

पंतप्रधान हा त्याचा लेखक असावा असे माझे मत झाले आहे. ते अभ्यासू वाचकांसमोर मांडत आहे. इतिहासज्ञ या मताचा योग्य तो विचार करून त्याच्या सत्यासत्यतेविषयी साधार निर्णय देतील अशी अपेक्षा करावयास काही हरकत नाही. या बाबतीत आणखी एका गोष्टीचा खुलासा येथेच करणे अवश्य आहे. तो असा की मी मांडलेले हे माझे मत प्रमेय स्वरूपाचेच आहे. विवेचनाअंती त्याला सिद्धान्ताचे स्वरूप येईल किंवा कदाचित् ते सोडूनही द्यावे लागेल, त्याविषयी आग्रह किंवा अभिनिवेश कोणत्याच प्रकारचा नाही. हे लिहिण्याचे कारण एवढेच की आपणाला न रुचणारी मते प्रगट करणाराबर वैयक्तिक व गर्ह्य हेतूंचा आरोप करण्याची दुष्ट सवय आमच्या काही प्रकाण्डपंडितानाही लागलेली आढळते. तेव्हा या विवेचनाच्या बाबतीत तसे होऊ नये हीच इच्छा आहे.

वरील प्रश्नाच्या अनुषंगाने उद्भवणाऱ्या आणखी एक दोन प्रश्नांचा विचार करून हा लेख संपवितो. रामचंद्रपंत अमात्याला उद्देशून प्रस्तुत आज्ञापत्र देणारा ' श्री राजा शंभुछत्र पति ' म्हणजे कोण ? राजारामाला ताराबाईपासून झालेला शिवाजी दुसरा की राजसबाईपासून झालेला संभाजी दुसरा ? शंभुछत्रपति म्हणजे राजसबाईचा मुलगा संभाजी हाच होय असे रा. व. सरदेसाई मानतात, हे ' आज्ञापत्रा'ला असलेल्या त्यांच्या प्रस्तावनेवरून व ' रियासतीतील राजारामा'तील उल्लेखावरून दिसतेच आहे. ' संभू ' (=संभाजी) याचे संस्कृत रूप ' शंभू ' धरून चालल्यास हे ठीक जुळते यात शंका नाही. पण मला वाटते की राजनीतीच्या आरंभी उल्लेखिलेला ' शंभू ' म्हणजे बहुतेक ' शिव ' छत्रपति असावा. याचे एक कारण असे, की बावडा दप्तरातील क्रमांक ९२ व ९३ ची पत्रे ( ता. १४–१०–१७१४ ) शंभू छत्रपतीच्या नावाची असली, तरी त्यावर प्रधान व प्रतिनिधींचे शिक्के मात्र

' श्री शिवनरपति हर्षनिदान । मोरेश्वरसुत नीलकंठ प्रधान ॥ ' व

' श्री आई आदि पुरुष श्रीराजा शिवछत्रपति स्वामी कृपानिधि '

तस्य परशराम त्र्यंबक प्रतिनिधि ' ॥ असे आहेत. यावरून, यात ' शिव 'छत्रपतीलाच ' शंभू ' म्हणून संबोधिले असावे असे वाटते. यावर रियासतकार सरदेसाई याचे म्हणणे असे आहे की—

' बावडा दप्तर न. ९२–९३ ची पत्रे राजारामपुत्र संभाजी कोल्हापूरकर छत्रपतीची आहेत. शिवाजी पदच्युत होऊन संभाजी गादीवर आला त्याच सधीची ही पत्रे असावी. नवीन शिक्के करण्यास अवधि लागतो आणि वचने घेणाराना प्रथम लवकर पक्का करून घ्यावयाचा असतो. कदाचित् राजा मागाहून वचन मोडील अशी भीति असते यावरून असे दिसते की पूर्वी एक दोन दिवसात शिवाजी जाऊन संभाजी छत्रपति बनला. त्या कामी रामचंद्रपंताने साह्य केले त्याचा हा मोबदला असावा. प्रसंगोपात संभाजीचा डाव उलटून शिवाजी पुनः राज्यावर आला तरी रामचंद्रपंताचे उत्पन्न कायम राहावे असे हे दुहेरी बंधन आहे. परशुरामपंत प्रतिनिधि मेल्यावर त्याच्या नावाचा शिक्का पुष्कळ दिवस त्याच्या मुलाने वापरला, अशी उदाहरणे पुष्कळ आहेत. '

पण श्री. सरदेसाई यांस हे म्हणणे पूर्णपणे मान्य करता येईल असे वाटत नाही. नवीन शिक्के करण्यास वेळ लागतो व म्हणून अनकदा जुन्याच शिक्क्याचा उपयोग करण भाग पडते, हे कबूल आहे. पण हे केव्हा? एक राजा जाऊन–मृत्यु पावून–त्याच्या जागी त्याचाच न्याय्य उत्तराधिकारी अधिकारारूढ होत असतो तेव्हा! पण जेथे एकाला कैदेत घालून त्याचे राज्य बळजबरीने दुसऱ्याने बळकाविले आहे तेथ या दुसऱ्या नव्याकारी राजाने पहिल्याच्या नावाचा शिक्का वापरणे योग्य होईल काय? त्याला स्वत ला तरी ते पसंत पडेल काय? राजारामपुत्र दुसऱ्या शिवाजीनंतर छत्रपतिपद (कोल्हापूर गादी) संभाजीकडे गेले हे स्थित्यंतर नैसर्गिकरीत्या झालेले नव्हते ती एक प्रकारची राज्यक्रांतिच होती अशा स्थितीत क्रांतिकारक अशा या दुसऱ्या छत्रपतीने आपल्याच कैदेत असलेल्या पहिल्या छत्रपतीचे किंवा त्याच्या अधिकाऱ्याचे शिक्के वापरले असतील असे म्हणणे तितकसे सयुक्तिक वाटत नाही, व ते पटतहि नाही यावरून असे वाटते की बाबडा दप्तरातील क्रमांक १२–१३ पत्रातील शंभु छत्रपति म्हणजे शिवछत्रपतिच असावा. राजनीतीच्या आरंभी ज्या शंभु छत्रपतीचा उल्लेख आहे तोही राजारामपुत्र शिवाजी दुसरा हाच असावा.

दुसरे असे की राजनीतीच्या लेखकाने आपल्या या 'शंभु छत्रपति स्वामीने' केलेल्या कार्याची जी जंत्री दिल्ली आहे ती दुसऱ्या संभाजीस लागू न होता दुसऱ्या शिवाजीसच लागू होते. 'स्वामी राज्यसनारूढ जाहले' नंतर त्याने जो उद्योग केला त्याचे वर्णन १, २, ३ व ५ ते ८ या पानांत आलेले आहे त्यातील एक महत्त्वाची गोष्ट अशी की हा स्वामी राज्यारूढ झाल्यानंतरच 'राज्यावर औरंगजेबासारिखा सबल शत्रु चालोन आला, या राज्यानिमित्त आपला संपूर्ण पराक्रम व अर्थवैभवादि सर्व शक्ति वेचली तथापि श्रीकृपाकटाक्षाने सकळही निर्फळ जाहले. परिणामी हतोद्यम होत्साता पराङ्मुख होऊन यमालयास गेला' स्वामीच्या कारकीर्दीतील औरंगजेबाच्या मृत्यूचा हा उल्लेख हेच सुचवितो की हा स्वामी म्हणजे औरंगजेबाच्या मृत्यूपूर्वी (इ. १७०७) राज्यासनारूढ झालेला दुसरा शिवछत्रपतीच असावा पान ५ वर औरंगजेबाच्या मृत्यूचा उल्लेख पुन आलेला आहे या म्लेंछ राजाने केलेल्या आघाता मुळे निस्खलित झालेली मराठी राज्याची घडीही या स्वामीनेच सावरली असे राजनीतीचा लेखक सांगतो तेव्हा त्याचेही कर्तृत्व दुसऱ्या छत्रपतीकडेच जाते, हे स्पष्ट दिसते या शिवाय या स्वामीने शामलाचा, सावंतादिकांचा व म्हैसुरकरादि पाळेगाराचा नि पात केल्याचे वर्णन पान ६ वर आहे त्यावरून या स्वामीने प्रथ प्राचीन वस्तीस्थाने निग्रहाने आक्रमून शामलाचे निर्नाम केले.' नंतर 'अनुपद सावंतादि जे राज्यास संकटभूत जाहले होते त्याचा नि पात केला' मग 'म्हैसुरकरादि पाळेगारास यथाचित शिक्षा करून' 'राज्य निष्कंटक' केले यात उल्लेखिलेली शामलाची स्वारी कोणती, हे उपलब्ध इतिहासावरून नीट कळत नाही. पण सावंताच्या नि पाताचा उल्लेख मात्र बावडा दप्तरातील एका पत्रात आढळतो. कुडाळकर सावंतावरील यशस्वी स्वारीचा मुहूर्त पाहून दिल्याबद्दल रामभट विश्वनाथभट वडणगेकर यास छत्रपतीने जमीन इनाम दिली, त्यासंबंधी रामचंद्र नीळकंठ अमात्याने पन्हाळा येथील दरामुरा देश कुळकर्णी यास लिहिलेले हे पत्र आहे

( बाबडा दप्तर अनु. ७८ ) ' कुडाळवर सावंत याणे राजश्री छत्रपती स्वामींच्या पासी दुर्बुद्धि धरून दुराचरण आरंभिले होते त्यास नतीजा पावावया निमित्य आगजे केला ' असा उल्लेख त्या पत्रात आढळतो. पत्र ता. १४-१०-१७१० चे आहे. तेव्हा राजनीतीत उल्लेखिलेला मावळाचा निःपात इ. स. १७१० मधील, म्हणजे, अर्थात् दुसऱ्या शिवाजीच्या कारकीर्दीतील होय. यावरूनही शंभु छत्रपतिस्वामी म्हणजे दुसरा शिवछत्रपति हाच असावा असे वाटते. याशिवाय या स्वामींने ' विजापूर भागानगरादि प्राचीन महास्थळे यावर स्वामी चालून जाऊन–' ते ' स्वशासनवश केले.' ' अनुपदे औरंगाबाद बऱ्हाणपुर ' ही स्थळेही घेतली. या सर्व उल्लेखांना कागदोपत्रींचा प्रत्यक्ष पुरावा अजून मिळावयाचा आहे ही गोष्ट खरी. तथापि त्या स्वामीच्या कारकीर्दीत ही इतकी प्रचंड कामगिरी झाली तो स्वामी इ. स. १७१४ मध्ये ( स्थिरबुद्धि राजाराम, पा. १५४) म्हणजे राजनीतीच्या लेखनापूर्वी एकच वर्ष आधी राज्यासनारूढ झालेला दुसरा संभाजी असावा असे मानणे योग्य होणार नाही. यापेक्षा हा स्वामी ' शंभु छत्रपति ' म्हणजे ' शिवछत्रपति ' अर्थात ताराबाईंचा मुलगा दुसरा ' शिवाजी 'च असावा असे मानणे योग्य होईल. वरील कामगिऱ्यांचे उल्लेख कोणाचे असावे याविषयी केलेल्या पृच्छेला ' मला वरील उल्लेख ताराबाईंचेच वाटतात. राजसबाईंचेही असू शकतील ' असे उत्तर श्री. सरदेसाई देतात. त्यावरून त्यांच्याही मते वरील काम जीत झाली ती कारकीर्द ताराबाईंची–म्हणजे दुसऱ्या शिवछत्रपतीची असावी असे उघड उघड दिसते

' शत्रूचा पराभव करावा हाच स्वामींनी दृढ विचार करून तमाम प्रांताचे रजपूत एकत्र करविले. स्वामी सुमुहूर्ते नर्मदापार जाहले. शीघ्रपे अल्पकालेच मुख्य शत्रूचा पराभव करून दिल्ली, आग्रा, लाहोर, ढाका, बंगाल, ठट्टा, जल्कयरादि करून सपूर्ण तत्तद्‌ध दशदुर्ग हस्तगत करून वाराणशीस जाऊन स्वामी श्रीविश्वेश्वर स्थापना करितात, तावत्कालपर्यंत दक्षिणप्रांत सरक्षणार्थ श्रीमत्मकल्तीर्थैकतीर्थ श्रीमन्मातोश्रीसाहेब दक्षिण प्रांतास राहिली आहेत ' अशाही उल्लेख या स्वामीविषयी आढळता त्यावरून दक्षिणप्रांत सोडून नर्मदेच्या पलीकडे स्वामी गेले होते असे दिसते. उपलब्ध इतिहासावरून, दुसरा शिवछत्रपति किंवा दुसरा संभाजी यापैकी कोणीच नर्मदेपलीकडे गेले होते असे आढळत नाही यावरून हा भाग अनैतिहासिक आहे की काय अशी शंका येते पण यापेक्षा या ' राजनीतीचा ' किंवा ' आज्ञापत्रा 'चा हा पुरावा ग्राह्य मानून दुसरा शिवाजी आपल्या सरदारांसह तिकडे गेला असावा असे मानण्यास हरकत नाही.

# त्रिंबकजी डेंगळे

[ लेखक—वि. स. वाकसकर, बडोदें ]

[ १ मूळ पत्रांतील सारांश २ त्रिंबकजीचे भाऊ वगैरे आप्त. ३ कुटुंबाचा वृत्तांत. ४ जन्म सन ५ त्रिंबकजीच्या काल्पनिक पत्नीचें शौर्य. ६ पूर्व वृत्तांत. ७ त्रिंबकजीचें वर्तन. ८ त्रिंबकजीच्या सुटकेसंबंधींचें पत्र. ९ पत्रांतील सारांशावर विचार १० गंगाधरशास्त्री यांची जन्म तारीख व कौटुंबिक माहिती ११ शाहीर प्रभाकर याचा वृत्तांत. १२ रियासतकारांच्या भगीरथ प्रयत्नामुळें इतिहासाचा लाभ.]

**गं**गाधरशास्त्री याचा खून आणि ठाण्याच्या किल्ल्यांतून पलायन या दोन मुख्य कर्तृत्वामुळे त्रिंबकजी डेंगळा हे नाव फार प्रसिद्ध आहे. त्याचें विश्वसनीय चरित्र आज सांगण्याचा विचार आहे. मराठी रियासत, उत्तरविभाग ३, पृष्ठ ४५० वर त्रिंबकजीचा परिचय पुढीलप्रमाणे करून दिला आहे.

**१ मूळ पत्रांतील सारांश**

"..... हा निंबगाव—जाळी या गावचा पाटील, बाजीरावाजवळ हुजऱ्याचें काम करीत होता. पुढें याची नेमणूक जासुदात करून ठिकठिकाणची माहिती आणण्याच्या कामावर बाजीरावानें यास नेमिलें. यशवंतराव होळकरा पासून पराभव पावून बाजीराव महाडास गेला, तेव्हा त्याजबरोबर त्रिंबकजी होता. महाडहून एक जरूरीचें पत्र बाजीरावास पुण्यास पाठवावयाचें होतें तें पत्र पोंचवून त्याचा जबाब तावडतोब त्रिंबकजीनें बाजीरावास आणून दिला. तेव्हापासून त्याजवर त्याची मर्जी विशेष बसली ..... विद्येचा किंवा राजकारणाचा उच्च संस्कार त्याला नव्हता, तरी खटपटी व तरतरी या वृत्तीमुळे बाजीरावाचे बेरबाईट हुकूम न्यायान्याय न पाहता अमलात आणण्यास तो कचरणारा नव्हता."

रियासतकारानीं त्रिंबकजीच्या चरित्राचें हें सार फार मार्मिक असें दिलें आहे. त्यानंतर पेशवे दसराचे ४५ भाग त्यांनीच प्रकाशात आणिल्यामुळे पुष्कळ नवीन वृत्तांत प्रगट झाला आहे. तो लक्षांत घेऊन हें चरित्र लिहिण्याचें ठरविलें आहे. यशवंतराव होळकरानें दौलतराव शिंद्याचा पराभव सन १८०२ मध्यें केला, तेव्हा बाजीराव महाडास

**२ त्रिंबकजीचे भाऊ वगैरे आप्त**

पळून गेला. त्या वेळी त्याबरोबर त्रिंबकजी हा हुजऱ्या या नात्यानें नोकर होता. पेशवे दसर

भाग ४१ लेखांक २६५ यात निंबकजीचा भाऊ कुसाजी यानें या डेंगळे कुटुंबानें वृत्त लिहिलेले प्रसिद्ध झालें आहे. त्या पत्राच्या आधारें पुढील वृत्तांत सांगता येतो. ' निंबकजीच्या बापाचें नाव मल्हारजी. या मल्हारजीला पहिल्या पत्नीपासून झालेली मुलें मरण पावलीं, त्यामुळें मल्हारजीनें दुसरें लग्न केलें. त्या दुसऱ्या बायकोचा मुलगा निंबकजी. हा झाल्यानंतर पहिलीला एक मुलगा झाला तो कुसाजी. म्हणजे कुसाजी हा निंबकजीपेक्षा वयानें लहान पण मानानें मोठा होता. कारण तो मल्हारजींच्या पहिल्या म्हणजे वडील पत्नीचा मुलगा होता. '

**३ कुटुंबाचा वृत्तांत** वर उल्लेखिलेले पेशवे दप्तर भाग ४१ लेखांक २६५ चे पत्र निंबकजीचा भाऊ कुसाजी डेंगळे यानें तारीख २२-३-१८२३ रोजीं लिहिलेलें आहे. सन १८०२ मध्यें निंबकजी हा पेशव्यांच्या पदरीं हुजऱ्या या नात्यानें नोकर होता हे वर सांगितलेंच आहे. निंबकजी हा बाजीरावाच्या पदरीं हुजऱ्याची नोकरी धरीपर्यंतचा डेंगळे घराण्याचा वृत्तांत त्या पत्रात पुढीलप्रमाणें सांगितला आहे. ' निंबकजी व कुसाजी हे दोघे बंधु मोठे झाल्यावर त्यांचे विवाह झाले. पुढें या दोघांचे वडील मल्हारजी हे निवर्तले, त्या वेळीं काहीं कर्ज देणें होतें. त्याचा तगादा लागला तेव्हां निंबकजी रोजगारासाठीं नागपुरास गेला. कुसाजी मात्र घरीं निंबगावजाली परगणे संगमनेर येथेंच राहून कर्जाची फेड करण्याच्या व्यवस्थेस लागला. निंबकजी हा दोन वर्षें नागपुरास राहून परत घरीं निंबगावजालीस आले. पण त्यानें पैसा असा काहींच आणिला नाहीं. त्यामुळे हे दोघेहि बंधु आपल्या मुलामाणसासह निंबगावजालीहून परागंदा होऊन पाडसर येथें गेले। तेथें राहिले. त्या वेळी कुसाजीचे कुटुंब गरोदर असल्यानें बाळतपणासाठीं माहेरीं वडसरी येथे पोंचविलें, व बाकीची सर्व मंडळी पाडसर येथेंच राहिली. दोनचार महिन्यांनीं त्या कुटुंबास घ्यावयास कुसाजी वडसरीस गेला, तेव्हा त्याच्या मेहुण्यानें त्याला तेथेंच शेती करून राहण्याचा उपदेश केला. त्यावरून कुसाजीनें आपला भाऊ निंबकजी याचा मनोदय काय असे निंबकजीस विचारिलें. निंबकजीनें त्यास संमति दिली. त्यावरून कुसाजी हा वडसरीस येऊन राहिला. व स्वत निंबकजी हा पाडसर येथें राहिला. पुढें काहीं दिवसांनीं निंबकजी आपल्या मुलामाणसांसह निंबगावजालीस गेला व त्यानें आपला भाऊ कुसाजी यासहि त्याच्या मुलामाणसांसह निंबगावजालीस नेलें, " असें कुसाजी आपल्या या पत्रात म्हणतो. यानंतर तो असें म्हणतो कीं, ' नंतर निंबकजीची पत्नी मरण पावली. हल्ली निंबकजीची जी पत्नी बाया या नावाची आहे, ती निंबकजी श्रीमंत झाल्यावर त्यानें केलेल्या लग्नाची आहे. आणि म्हणून तिला पूर्वीची माहिती नाहीं. '

सन १८०४ मध्यें नेमले या वळी म्हणज सन १८०२ अथवा सन १८०२ साली त्रिंबकजीनें पुन लग्न कलें असावें सन १८०२ पर्यंतचा त्याचा आयु क्रम पाहिला म्हणज त्यावळी तो चागला पचवीस तीस वर्षांचा असावा असे गृहीत धरिल, तर त्याचा जन्म साधारणत सन १७७५ च्या सुमाराम झाला असावा असें वाटते पुढील विवचनास प्रारभ करण्यापूर्वी तुमाजीनें आपल्या घराण्याची कुळकथा का लिहिली हे निवेदन करितों

सन १८०४ पासून सन १८१४ पर्यंत त्रिंबकजीचा उत्कर्ष सारखा हात गला पशव व गायकवाड याच्यामधील आपापसातील देण्याघण्याचा निवाडा करण्यासाठीं गायकवाडाच्या बाजूने गगाधरशास्त्री पटवर्धन या गृहस्थास गायकवाडाच्या छत्राखालीं व इग्रजाच्या कवचाच्या आश्रयानें पुण्यास पाठविण्यात आलें सन १८१५ मध्ये गगाधरशास्त्र्याचा पढरपुरात खून झाला, व पुढें एक दान महिन्यानींच त्रिंबकजीला अटक करून टाण्याच्या तुरुगात ठवण्यात आले तथून एक वर्षानें सन १८१६ मध्ये त्रिंबकजी पळाला त्यानें काहीं लाक जमवून सुमारें दान वर्षे दगा कला सन १८१८ मध्ये त्याला 'अहिरगावीं' पकडण्यात आलें त्या वळी घडलला एक चमत्कारी वृत्तात 'दुर्दैवी माहर' या पुस्तकात पृष्ठ १३२ वर दिला आह ता मनारम असल्यान पुढें दतों

**५ त्रिंबकजीच्या काल्पनिक पत्नीचें शौर्य**

" एक स्त्री व त्रिंबकजीचा नाकर इग्रजास फितूर झाले त्यानीं ब्रिगजला त्रिंबकजीच्या ठिकाणाची माहिती दिली त्याबरोबर कॅ स्वान्टन हा एक हजार स्वार बरोबर घऊन अहिरगावीं आला त्या वळीं बिचारा त्रिंबकजी सडा हाता व आपले अज्ञातवासाच दिवस कस तरी दकलीत हाता तेव्हा इग्रजास त्रिंबकजीला पकडण्याचें शूर कृत्य करण्यास चेव चढला त्यानीं लगच गावाची नाकेबदी केली आणि पहाटे त्रिंबकजी गाढ झोपीं गला असताना त्याच्या गळ्याभोंवतीं गळफास टाकला त्रिंबकजीच्या वाडयास गराडा घातला वाडा दानदा तळघरे—बळदासुद्धा शाधला पण त्रिंबकजीचा पत्ता लागना शवटीं तिसऱ्यादा मात्र त्रिंबकजीचें दुर्दैव ओढवलें तो एका बळदात लपवडी चारदाराच्या पलीकड एक जिना हाता त्या ठिकाणीं फरारी होण्यासाठीं म्हणून भित फोडात हाता त्यास धरण्यासाठीं म्हणून इग्रजाच लाक जाऊ लागल, ता त्यास एका वीर भालाइताने अडथळा कला व यणाऱ्या इसमास भाल्यानें ठार करण्याचा त्यानें सपाटा चालविला एकट्या माणसानें तीस आसामी ठार कल हें पाहून स्वान्टन घाबरला व या बहाद्दर माणसास कसे कह्यात आणावें हेंच त्यास सुचेना तेव्हा कंटाळून त्यानें त्या पराक्रमी भालाइतावर गोळ्या झाडण्यास हुकूम दिला आपला प्राण घण्याकरिता आता बदुकींतून गाळ्या सू सू करत यणार हें त्याने पाहिले, पण त्याची स्वामिनिष्ठा इतकी जाज्वल्य, कीं त्याचे त्यास काहींहि वाटलें नाहीं आपल्यावर सू सू करीत यणाऱ्या गाळ्या ह्या प्राणघातक नसून त्याच्यात अमृततुल्य सजीवन साठविलें आहे असे त्यास वाटत असल्यामुळें त्याचे आसन थोडेंसुद्धा ढळलें

नाहीं. तो भिनाडासारखा ताठ होता. त्याला कशाचीहि कदर नव्हती. यजमानानें रक्षण हेंच आपलें दिव्यनिधान वैकुंठ अशी त्याची भावना होती. येपीकर इसमाच्या लोकांनीं सोडलेल्या गोळ्या त्याच्या अंतःकरणाचा भेद करून जातात्र त्याचा वीर देह खालीं पडला. तो मराठा शूराच्या मरणानें मेला, त्याचें सोनें झालें ! त्या पुरुषाला जवळ जाऊन पाहतात तों त्यांखरीच आश्चर्य ! तो पुरुष नसून पुरुषवेष धारण करणारी स्त्री होती. ती त्या वीर त्रिंबकजीची वीरपत्नी होती !.........आपण पुरुष म्हणून मारलेला मराठा हा वाप्या नसून वाप्यास लाजविणारी स्त्री आहे आणि तीसुद्धां त्रिंबकजीची बायको आहे हें जेव्हां स्वान्टन यांस कळलें त्या वेळेस त्यास मोठा अचंबा वाटला.........."

या मजकुरामध्यें त्रिंबकजीच्या पत्नीच्या शौर्यांचें वर्णन मोठें चित्तवधक व रोमांचकारी केलेलें आहे. किंबहुना झाशीची महाराणी लक्ष्मीबाईसुद्धां या वर्णनांतील स्त्रीपुढें फिकी पडेल. झाशीची महाराणी ब्राह्मण असल्यानें ब्राह्मण लेखकांनीं तिची उगीचच अतिशयोक्तिपर स्तुति केली असेल असें कोणी म्हणेल; पण त्रिंबकजी हा मराठा असून त्याच्या पत्नीच्या शौर्याचें वर दिलेलें वर्णन श्री. लेले या गृहस्थांनीं केलें असून या पुस्तकाला पुण्याचे प्रसिद्ध इतिहास-संशोधक, व छत्रपति शिवाजीमहाराज व त्यांचा धाकटा बंधु व्यंकोजी असे दोघेहि जण १६३० मध्येंच एकाच पधरवड्यात जन्मले असें अट्टाहासानें सांगणारे श्री. दत्तोपंत आ यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. असा प्रकार असल्यानें वर उतरून घेतलेल्या वर्णनात थाना मानेची मुद्रा अतिशयोक्ति असणें संभवनीय नाहीं. म्हणून यासंबंधानें दत्तेत्र सागावयाचें कीं प्रस्तुत वृत्तान्त प्रसिद्ध होत आहे तोंपर्यंत उपर्युक्त इतिहासाला एकहि आधार प्रसिद्ध झालेला नाहीं. या उभयतांच्या कृपेनें यापुढें तो प्रसिद्ध होणार असल्यास तोंपर्यंत वाट पाहणें भाग आहे!!

त्रिंबकजीचा वृत्तांत मराठी रियासत उत्तर विभाग ३ पृष्ठ ५०८ वर श्रीयुत सरदेसाई यांनीं संक्षिप्त पण ऐतिहासिक असा दिला आहे. त्यांतील महत्त्वाचा

**६ पूर्व वृत्तांत**

भाग पुढें देतों. "(बाजीराव याचा) दुसरा साथीदार त्रिंबकजी डेंगळे यानेंही पुढें (सन १८१८ सालचे) स्वाधीन होण्याचें थोरले जनरल डोव्हटनकडे सुरू केलें.........डोव्हटननें त्याजवर हल्ला केला तेव्हां तो पळून गेला... ......वर्णादिंडोरीजवळ अहिरगाव येथें सन १८१८ च्या जुलै महिन्यांत एल्फिन्स्टननें त्यास पकडून बेड्या घालून कविन्यासुद्धां चादवडचे ठाण्यात आणून ठेविलें......(पुढें) त्यास चुनारगडचे किल्ल्यात ठेविलें. तेथें तो तारीख १६-१०-१८२९ रोजीं मरण पावला." रियासतकारांनीं आपलें हें उत्तरविभाग ३ चें पुस्तक सन १९३२ सालीं प्रसिद्ध केलें. त्यानंतर सन १९३४ सालीं मागीं मागितलेल्या पेशवे दप्तर भाग ४१ हा प्रसिद्ध केला. त्यांतील महत्त्वाचा वृत्तांत आता मागतों.

६ लि. २३७—११-३-१८१८ त्रिंबकजी पुण्याहून पळाला. साताऱ्याहून प्रसिद्धी-पत्रक निघालें कीं त्रिंबकजीस पकडून हजर करणार. वगैरे वर्तमान एकानें कळविलें.

२ ले. २३८—१७-७-१८१८ त्रिंबकजी डेंगळा यास किले आमदानगर येथे गेले बुधवारीं ( तारीख १०-७-१८१८ ) धरून आणून किल्ल्यास दाखल केला.

३ ले. २५१—१८१८ दाजीबा ढफळा यानें गंगाधरशास्त्री यांचा खून केला.

४ ले. २६२—४-११-१८२२ त्रिंबकजीच्या कुटुंबांतील मंडळींची यादी. १ मुलगा. ८ बायका. ३ मुली. १ लहान भाऊ. २ भावजया. १ पुतण्या ( भावाचा मुलगा ) १ पुतण्याची बायको. २ पुतण्या ( भावाच्या मुली ). एकदर १९ मंडळी त्रिंबकजीच्या कुटुंबात होती. या शिवाय संपत्तीचा तपशील व ३० कुणबिणी व वीस लेकवळे असे पन्नास नोकर असल्याचा उल्लेख याच पत्रांत आहे.

५ ले. २६५—२२-३-१८२३ त्रिंबकजीचा भाऊ कुसाजी यानें कुटुंबाची हकीकत लिहिली तो कागद. यांत त्रिंबकजीच्या एकच पत्नीचा उल्लेख आहे. कुसाजीनें हें पत्र लिहिण्याचें कारण असें आहे कीं, त्रिंबकजीच्या एका पत्नीनें ( बाया हिनें ) कुसाजी व त्रिंबकजी हे विभक्त असल्यानें त्रिंबकजीच्या संपत्तींत कुसाजीचा कांहींहि भाग नाहीं असे सरकारात कळविल्यानें कुसाजीनें पूर्ववृत्तांत त्या पत्रात लिहिलेला आहे. त्यामुळे त्या पूर्ववृत्तांताशिवाय इतर कांहीं माहिती त्यांत नाहीं हें रीतीचेच आहे.

६ ले २७७—१२-११-१८११ त्रिंबकजीनें पेंढाऱ्यावर केलेल्या स्वारीचें वर्णन.

७ ले. २७४—२४-१२-१८३१ मोंडूरचे दौलतराव घोरपडे यांनी त्रिंबकजीशीं पूर्वी केलेल्या लढाईचें वर्णन. ही लढाई गोंतायाचे घाटाखालीं गणेशपूर येथे झाली. ही लढाई सन १८१६ ते १८१८ या कालांतील होय. कारण सन १८१६ मध्यें तो तुरुगातून पळाला व बड करीत फिरत होता. सन १८१८ मध्यें त्यास पकडले, ते पुढे सांगू.

८ ले. २३६—४-७-१८१८ त्रिंबकजी यास वण पोटचे गावीं धरून चादवडात आणून बेडया घातल्या व कैदेंत टेविलें. वर क्रमांक २ पहा.

वर मुद्दाम आठ पत्रांतील सारांश सांगितला आहे. आता यापुढे त्रिंबकजीचा वृत्तान्त कथन करावयाचा आहे.

**७ त्रिंबकजीचें वर्तन**

त्रिंबकजी हा बाजीरावाच्या जवळ राहिल्यावर मोठया झपाट्यानें ऊर्जितावस्थेस आला, हें पाहिलें म्हणजे त्याच्याबद्दल फारसा आदर वाटत नाहीं. देवदेवतार्चनात बाजीरावाचा बराच काळ जात असे व बाकीचा वेळ स्त्रियांच्या संगतींत तो घालवीत असे. त्या समाजात वाटेल तो बीभत्स प्रकार होत असे असें एल्फिन्स्टन म्हणतो. जो सरदार अथवा नोकर आपली बायको त्या मजलसींत पाठवीत नसे, त्यावर बाजीरावाची इतराजी होऊन त्याचें उत्पन्न बंद करण्यांत येत असे. बाजीरावाचा सेनापति बापू गोखले यावरसुद्धा हा प्रयोग झाला व त्यानें बाजीरावाचें म्हणणें मान्य करताच त्यास त्याचें उत्पन्न मिळूं लागलें. हा एकदर इतिहास पाहिला म्हणजे त्रिंबकजीबद्दल मुळींच आदर वाटत नाहीं. त्रिंबकजीच्याच सल्ल्यानें बाजीरावानें लोकांचीं उत्पन्नें धडाधड बंद केलीं.

पूर्वी महाल इजाऱ्यानें देत असत. अधिक रक्कम देण्याचें वचन देईल त्यास तो महाल सोंपण्यांत येत असे. पण यामुळे प्रजेचे हाल मनस्वी होत असत. पण त्रिंबकजी पैशाशिवाय इतर कोणत्याहि मुद्द्याकडे लक्ष देत नसे. एका इजारदारास समक्ष बोलावून वसुलाच्या बाबतींत चर्चा चालू असता त्रिंबकजीनें, त्याच्या तोंडांत इतक्या जोरानें मारली कीं, तत्काळ तो गतप्राण झाला. असल्या राक्षसाबद्दल काय म्हणावें हें वाचकानीच ठरवावें. सातारच्या चतुरसिंगास तर विश्वासघातानेंच सन १८११ मध्यें त्रिंबकजीनें पकडून कैद केलें व शेवटीं तो त्यातच रायगड किल्ल्यावर सन १८१८ मध्यें मरण पावला. सातारच्या छत्रपतीवर सक्त देखरेख करण्याचें काम त्रिंबकजीनें सन १८०४ मध्यें पतकरिलें व नतरच त्याचा भराभर उदय झाला; यावरून त्याच्या उदयाचें कारण सहज लक्षात येतें. त्रिंबकजीच्या सल्ल्यानें बाजीरावानें सर्व जहागिरदारास भिकेस लाविलें, पण एल्फिन्स्टन यानें सन १८१२ मध्यें एक व्यवस्था ठरवून बाजीरावास तीच मान्य करण्यास लाविल्यानें जहागिरदार वाचले. त्रिंबकजीच्या सल्ल्यानें सन १८१५ मध्यें बाजीरावाजवळ पाच कोट रुपये खजीना जमला होता. या खजिन्याच्या जोरावर त्रिंबकजी स्वराज्य वाढविणार होता. त्रिंबकजी, बाजीराव, सर्जेराव घाटगे, दौलतराव शिंदे, ही मराठशाहीतील प्रमुख मडळी व वेल्स्ली, एल्फिन्स्टन, कॉर्नवालिस, ही इंग्रजाकडील प्रमुख मडळी, अशा उभयताचा सामना पाहिला म्हणजे त्याचा घडलेला शेवट योग्यच होय असें निश्चितपणें वाटतें. शेवटीं त्रिंबकजी हा ठाण्याच्या किल्ल्यातून पळाला. यात त्याचें चातुर्य दिसतें यात शंका नाहीं. या मुद्द्याची चर्चा करून हें प्रकरण संपवूं.

**८ त्रिंबकजीच्या सुटकेसंबंधींचें पत्र**

त्रिंबकजी हा ठाण्याच्या किल्ल्यातून पळाल्याचा इतिहास प्रसिद्ध आहे. तो असा कीं, त्याच्यावर ठेविलेले पाहेरकरी इंग्रज लोकच होते. त्यामुळें त्रिंबकजीनें एका घोडेवाल्याशीं संधान बांधिलें. इंग्रज पाहेरकऱ्यास मराठी येत नसल्यानें त्रिंबकजी हा आपलें मनोगत त्या घोडेवाल्यास समजावें या उद्देशानें पोवाड्यात गाऊन ऐकवीत असे. पुढें तो घोडेवालाहि त्याच रीतीनें त्रिंबकजीशीं भाषण करीत असे. याप्रमाणें संकेत ठरून त्रिंबकजी पळून गेला. हा प्रकार तारीख १२ सप्टेंबर सन १८१६ रोजीं सायंकाळीं सात आठ वाजता घडला. परंतु पेशवे दप्तर भाग ४१ पत्रांक ९१ मध्यें पुढील अर्थाचा मजकूर आहे. "त्रिंबकजीस फाशीं देण्यासाठीं म्हणून पंचवीस गारदी बरोबर देऊन मेण्यात घालून खाडीपाशीं आणिला व आतां त्याचा शिरच्छेद होणार तों त्यानें मोरकऱ्यास विनंति केली कीं, 'आम्हास मारूं नये, पुण्यास जत घेऊन चलावें. मी तुमचे उपकार फेडीन.' हें त्रिंबकजीचें बोलणें ऐकून मोरकरी म्हणाले कीं, 'आम्हास मोळा हजाराचा ऐवज, तोरा मोहरा पंधरा हजार आणि खास रुपये एक हजार इतके पैसे देण्याची हमीदार द्या, म्हणजे पुण्यास नेतों.' खाडीच्या काठीं प्रत्यक्ष हमी घेण्यासाठीं ऐपतदार मनुष्य कोठून आणावा अशी पंचाइत त्रिंबकजीला पडली. पण इतक्यात आपा जोशी नावाचे गृहस्थ तेथें आले. त्यास त्रिंबकजीनें आपली वस्तुस्थिति नीट समजावून सांगितली कीं, 'त्रिंबकजीस जिवत घेऊन तुम्ही पुण्यास चला. तेथें जाताच तुमची ठरलेली रक्कम मी स्वतः तुमच्या पदरी

टाळीन ' असे सागून आबा जाण्यानीं मारकऱ्याची खात्री पटविल्यावर रात्रीचा दिवस करून मजल मारीत ही मत मण्डळी सहाव दिवशीं पुण्यास आली पुण्यास यताच आपण गुप्त राहून डगळ्यानें स्वहस्तानें एक पत्र आपल स्वही हरबा आबा यास लिहिले व त्यास पधरा हजार हान व एक हजार यार अशा एवनाची तरतूद तातडताव करून आबा जाण्याच्या स्वाधान करण्यास सागितलें ' एवज आजच्या आज हातीं न यइल तर मारकरी आमची गदन मारतील म्हणून एवजाची व्यवस्था करावी तसच आता जादी लागतील त्याप्रमाणें वागावें गाव पट्टकर्णी करू नय येथून मुक्त म्हणज गाव गाबलयाच्या लष्करात जाइन ' असें सव खलासवार लिहिलें हातें त्याप्रमाण एवजाची व्यवस्था हाऊन त्रिंबकजी मुक्त " ( हा सव वृत्तान्त ' दुर्दैवी माहर ' पृष्ठ १२२–१२३ वरून घतला आह वरील अथाच्या पत्रावाली रियासतकारानीं आपल मत पुढीलप्रमाण प्रदर्शित कलें आह This solves the mystery of Trimbakji s escape on 12 September 1816 from the prison of Thana आता यासबधीं विचार करू

**९ पत्रातील साराशा वर विचार**

हें पत्र पुण्याहून तारीख १२ ९ १८१६ राजा मायकाळीं लिहिलें असून त्यात असे स्पष्ट म्हटलें आह कीं हमादार दताच रात्रीचा दिवस करून ठाण्याहून आज सहाव दिवशीं दिवस मावळता पुण्यास दाखल झालें ' यावरून त्रिंबकजी हा ठाण्याच्या किल्ल्यावरून तारीख ७ ९ १८१६ रात्रीं मकाळींच गुप्त झाला त्यावराल पाहरकरीसुद्धा त्याची मराठी भाषा न समजणार व इग्रज शिपाई ठविल हात पण त्याला ठार मारण्यास मात्र मराठा भाषा समजणारे माग रामाशी यामच पाठविलें व त्याच्यावरावर भरवसदार अधिकारी काणाच पाठविला नव्हता म्हणज गगाधरशास्त्री याच्या खुनासबधान जबढें दुर्लभ झालें तवढेंच दुर्लभ त्रिंबकजीच्या पलायनासबधान विशषत इग्रजाच झालें व तें काणाच्या लक्षात यऊ नय म्हणून त्यानीं महा दिवस गुप्त ठविलें असा एकदर तर्क करावा लागता असल वडगळ तर्क करण्यास कारण काय तर वर दाखविलेलें एक पत्र तें पत्रच बनावट आह असें म्हटले तर सगळा सगति सरळ लागत, पण पत्राचें महत्त्व कमी हातें अशा भलत्याच भीति इतिहाससशाधकास वाटते काहीहि असा तें पत्रच बनावट आह असें मला निश्चितपण वाटतें इतर महत्त्वाचा मजकूर असलय मानून या पत्रास भलतेंच महत्त्व दणें म्हणज भलत्याच प्राण्याच्या पाठीवर अबारी ठेविण्या सारख आह

**१० गगाधरशास्त्री याची जन्म तारीख व कौटुंबिक माहिती**

दुर्दैवी माहर ' या पुस्तकाच्या पृष्ठ ११८ व पृष्ठ ११० वर गगाधरशास्त्री याच्या आबासाहब नावाच्या मुलास प्रभाकर कवीची मुलगी दिली हाती असा त्याचा निकटसबध असून त्यानें त्रिंबकजीनें खून कला असें कवनात म्हटलें नाही यावरून शास्त्री याचा खून त्रिंबकजीने कला नव्हता असे अनुमान काढलें आहे पुढें पृष्ठ ११९ वर गगाधरशास्त्री याची मुलगी यमुनाबाई हा आपल्या बापाच्या खुनाचा आराप त्रिंबकजीवर करीत नाहीं असें लिहिलें आह हीं सव अनुमानेंच असल्यान यासबधी विस्तृत चर्चा करण्याचें कारण

नाहीं. परतु या निमित्तानें अवश्य ती विशेष माहिती प्रसिद्ध करावीशी वाटते, म्हणून ती तेवढी लिहितों. गगाधरशास्त्री याचा जन्म तारीख २-१-१७६९ रोजीं झाला होता असें त्याच्या पत्रिकेवरून दिसते. त्याचे वडील चिरजीव भिमाशंकर ऊर्फ रायसाहेब याचा जन्म तारीख २२-६-१८०४ रोजीं झाला. दुसरे चिरजीव विनायकराव ऊर्फ आबासाहेब. याची पत्रिका मला मिळाली नाहीं. हे विनायकराव साधारणत. सन १८०६ मध्ये जन्मले असावत हें जर खरें असेल तर गगाधरशास्त्री याच्या खुनाच्या वेळीं म्हणजे सन १८१५ मध्ये हे विनायकराव, आबासाहेब नऊ किंवा दहा वर्षांचे असावेत. आता प्रभाकराच्या मुलीशीं याचा विवाह केव्हा झाला असावा हे सागतो. प्रभाकराची मुलगी ही या विनायकरावाची दुसरी पत्नी होय याच्या पहिल्या पत्नीस मुलगा झाल्यावर ती निवर्तली. त्या मुलाचे चिरजीव श्री. दाजीसाहेब शास्त्री हे होत. हे आज बडोदे राज्यात नायबसुभे आहेत. साराश हे दाजीसाहेब वर सागितलेल्या विनायकरावाचे नातु व गगाधरशास्त्री याचे पणतु होत. प्रभाकराची मुलगी ही विनायकरावाची दुसरी पत्नी असल्यानें ती या दाजीसाहेबाची सावत्र आजी होय. या बाईचे नाव यमुनाबाई ही बाई सन १९२५ च्या सुमारास निवर्तली, त्या वेळीं तिचे वय शभर वर्षांचे असेल असें मानिले तरी बाईचा जन्म सन १८२५ सालीं म्हणजे गगाधरशास्त्री याचा खून झाल्यावर दहा वर्षांनीं झाला असें म्हणावे लागतें. अशा एकदर प्रकार असल्याने प्रभाकर हा गगाधर शास्त्री याचा व्याही होता व त्याने आपल्या कवनात खुनाचा आरोप केला अगर न केला या म्हणण्यात काहीं स्वारस्य नाहीं. गगाधरशास्त्री याच्या मुलीचें नाव यमुनाबाई नव्हतें. श्री. लेले यानीं हे नाव गगाधरशास्त्री याच्या मुलीचे असल्याचे लिहिलें आहे पण ती त्याची नजरचूक आहे. प्रभाकराच्या काव्यावर रा. लेले एवढा विश्वास का ठेवितात हे कळत नाहीं. कारण तो एवढा विश्वासपात्र नव्हता.

'दुर्दैवी मोहरे' या पुस्तकात 'प्रभाकर'चा उल्लेख केला आहे त्यामुळें त्याची विशेष माहिती सागणे अवश्य वाटते. प्रभाकर हा टफावर म्हणण्यासारखीं

**११ शाहीर प्रभाकर याचा वृत्तांत**

सुदर रचनें करीत असल्यानें तो शाहीर या अभिधानाने प्रसिद्ध आहे. महाराष्ट्रसाहित्य पृष्ठ ४७३ वर या प्रभाकराचा इतिहास पुढीलप्रमाणें दिला आहे. " प्रभाकर, दादा वीर, बत्तु फदी, महादु सुतार हे .. सर्व ..आपआपले डफ घेऊन पडद्याआड होतात. त्यांचे डफ डाव्यापुढे असतात आणि त्याच्या कवनाकडे कान लागलेले असतात तोंपर्यंत हे काय व कुठल याची चौकशी करण्याचे मनातहि येत नाहीं. पण ते जरा दूर झाल्यावर या असल्या चौकशा आपल्या मनाला सुचू लागतात. हे सर्वजण समकालीन असून एकाच बैठकींत. असत बत्तु फदी हा अनत फदीचा कोणीहि आप्त नव्हता. याचे उपनाव दिवट. हा मोठा विचित्र पुरुष होता .. सारा वेळ तमाशे करावे, पारे नाचवावे आणि मिळेल तें सुख साधून समाधानानें खुशालींत काळ घालवावा असा याचा क्रम होता या सर्व मडळींत प्रभाकर दातार हा जरा प्रतिष्ठित दिसतो . हा मूळ हरणई-मुरूडचा राहणारा. याच्या कवनात आलेल्या उल्लेखावरून याची घरची . स्थिति फार गरीबीची अगदीं असें दिसते. किंबहुना उत्तर

वयात मुंबई, ठाणें यासारख्या शहरांतहि मरकस्टर माणमारर कवनें करून हा द्रव्याची याचना करी. यावरून याची स्थिति कव्हांहि फारशी सुधारली असेल असें वाटत नाहीं सवाई माधवरावाचा भरलेला ऐश्वर्यसंपन्न दरबार पाहून त्यानें त्यावर कवन करून म्हटल, त्याला उत्तरत्यात नाण्याच्या नजरीचें वर्णन करणें भाग पडावें ज्याने पेशव्याचीं आणि त्याच्या शिंदे, होळकर, गायकवाड, पटवर्धन इत्यादि सरदारांचीं वर्णनें आपल्या रसवतीनें गाइलीं त्याला मुंबईकडल्या पारशांचीं, सोनारांचीं आणि इतर अनेक लुग्यासुग्यांचीं वर्णनें करीत सुरण्याची पाळी यावी आणि वाग्देवीच्या गळ्याला दारी बांधून दरबाराच्या अस्वलीप्रमाणें तिला दारादार नाचविण्याची पाळी यावी, हें पाहून खेद वाटतो. कोंकणातून घाटावर आल्यावर प्रभाकर हा प्रथम नाशकाजवळ गंगापुरास राहत असे पुढें हा तेथून निघून प्रत्यक्ष पुण्यास येऊन राहिला होता पुण्यात गडबडाव रास्ते या उदार सरदाराच्या घरीं हा कारकुनीवर असे नाकरी सोडून हा कवनें करू लागला सरदार पटवर्धन गंगाधर शास्त्री– याच्या घराण्याशीं याचा शरीरसंबंधहि जडला हा शके १७६५ (सन १८४३) मध्यें आपल्या वयाच्या ७४ व्या वर्षी मृत्यु पावला " याचा मृत्यु सन १८४३ आहे यावरून याचा जन्म सन १७६९ हा असावा असें दिसतें

रियासतकारांनीं रियासतींमध्यें या कवींचा आधार घेतलेला नाहीं हें लक्षात ठेवणें अवश्य आहे आणि म्हणूनच व्याकरणावर जशी अष्टाध्यायी, तशीच मराठ्याच्या इतिहासावर 'मराठी रियासत' प्रमाण होय रियासतींची योजना व प्रभाकराच्या शाहिरी वर्णनाचें मूल्य भिन्न प्रांतांतील असल्यामुळे एकाच मुद्यावर दोघांचीं मतें अजमावून त्यांची श्रेष्ठ कनिष्ठता ठरविणें अगदीं ग्राह्य नाहीं इतिहास म्हणजे पोवाडा नव्हे व पोवाडा हा निश्चयानें इतिहास नव्हे हें सूत्र विसरता कामा नये

निंबकजीचें चरित्र सांगण्याचें काम संपलें हें चरित्र आता इतकें सविस्तर लिहिण्यास पेशवे दप्तर प्रकाशन हे मुख्य साधन प्राप्त झालें हा फार मोठा लाभ होय बाजीरावाच्या आज्ञेवरून निंबकजी डेंगळ्याने गंगाधरशास्त्री याचा खून करविला यात काडीमात्र संशय नाहीं पेशवे दप्तर प्रकाशनानें असे कितीतरी मुद्दे स्पष्ट झाले आहेत हें दप्तर प्रकाशनाचें कार्य मुंबई सरकारनेंच निश्चित केलें व रियासतकार गोविंदराव सरदेसाईंसारख भगीरथ या कायास मिळाल्यानें समाजावर फार मोठे उपकार झाले आहेत

**१७ रियासतकाराच्या भगीरथ प्रयत्नामुळे इतिहासाचा लाभ**

# परकीयांचें व धर्मभ्रष्टांचें हिंदुकरण

[ लेखक—डॉ. अनन्त सदाशिव अळतेकर, एम्. ए., एल्एल्. बी., डी. लिट्., बनारस ]

हल्लींची सामान्य समजूत अशी आहे की, हिंदुधर्म हा जे जन्मत हिंदु आहेत त्यांच्या करिताच आहे. जे परधर्मांत अगर सरहद्दींत जन्माला आले असतील, किंवा जे जन्मानें हिंदु असून पुढें धर्मभ्रष्ट झाले असतील, त्यांना हिंदुधर्मांत प्रवेश मिळणें शक्य नाहीं, असा हल्लीं पुराणमताभिमानी लोकांचा समज आहे आर्यसमाज व प्रगतिप्रिय हिंदु संस्था यांनीं शुद्धिकरणास सुरुवात केली आहे, पण त्यांचें हें कार्य प्राचीन रूढीच्या व धर्मशास्त्राच्या विरुद्ध आहे असें सनातन्यांचें प्रामाणिक मत आहे आजच्याप्रमाणेच १७ व्या शतकांतील काशींतील पंडितांचेंहि मत होतें बर्नियर नावाच्या एका विदेशी प्रवाशानें इ. स. १६६० च्या सुमारास काशींतील विद्वानांशीं या बाबतींत चर्चा केली होती त्यास त्यांनीं प्रांजळपणें सांगितलें,— " आमचा हिंदुधर्म हा सर्व देशांतील लोकांकरिता आहे असे आमचें मुळींच म्हणणें नाहीं. परमेश्वरानें तो फक्त आमच्याकरिताच केला आहे, म्हणून आम्ही परधर्मायांना हिंदु करून घेत नाहीं. " ही विचारसरणी आपल्या सरहद्दींस कितपत धरून आहे याचें थोडसें विवरण करण्याचें या लेखांत योजिलें आहे.

वैदिक आर्य हे राजकीय दृष्ट्याच नव्हे तर धर्मदृष्ट्याहि विजिगीषु वृत्तीचे होते. '**कृण्वन्तो विश्वमार्यम्**' या मंत्रावरून सर्व विश्वास आर्यमय करणें हे आपलें कर्तव्य होय असें त्यांचें मत होतें असें स्पष्टपणें दिसून येईल ते त्याप्रमाणें चालतहि होते. प्रथम प्रथम वैदिक आर्यांनीं अनार्यांचा निःपात करण्याचाच उपक्रम सुरू केला होता, पण पुढें त्यांनी त्यांना आपल्या धर्माची दीक्षा देण्यासहि सुरुवात केली पूर्व पंजाब, दिल्ली व उत्तर संयुक्तप्रान्त या मुलुखांत अनार्य लोक बहुसंख्य होते, त्यांच्या काही देवता व धार्मिक आचार यांना आपल्या धर्मांत स्थान देऊन आर्यांनीं त्यांना आपल्या वैदिक धर्माची पुरी दीक्षा दिली आर्य व अनार्य यांच्यामध्यें बेटीव्यवहारहि रूढ झाले, हें हिडिंबा, उडुपी वगैरे स्त्रियांशीं भीम, अर्जुन इत्यादि-कांनीं जीं लग्नें केलीं त्यावरून दिसून येईल.

'**कृण्वन्तो विश्वमार्यम्**' ही प्रवृत्ति अनेक शतकें अव्याहत रीतीनें आर्यसमाजांत रूढ राहिली. हळू हळू सबंध हिंदुस्थान हिंदुमय बनविण्यांत आलें पुढें इ. स. पूर्व चौथ्या शतकामध्यें अलेक्झँडरनें हिंदुस्थानावर स्वारी केली, व पुढें कांहीं दशकांनीं पंजाबमध्यें अनेक ग्रीक राज्यें

स्थापन झाली व अनेक ग्रीक लोक वसाहत करून राहिले. प्रथम प्रथम हे ग्रीक लोक आपला धर्मच पाळीत होते, पण पुढें लवकरच 'कृण्वन्तो विश्वमार्यम्' या तत्त्वाचा प्रयोग त्यांच्यावर करण्यात येऊं लागला. त्यांच्यापैकीं मिनँडर, हर्मियससारखे कांहीं राजे बौद्ध बनले. बौद्ध धर्मानुयायी ग्रीक लोकांपैकीं कांहींनीं कार्ले वगैरे ठिकाणीं बौद्ध भिक्षूंना राहण्याकरितां गुहा बांधल्या. बौद्धधर्मीयांप्रमाणें हिंदुहि ग्रीक लोकांना आपल्या धर्मांत घेण्याची खटपट करीत होते, व त्यांच्या खटपटीस यशहि येत होतें. विशेषतः भागवत धर्माचीं तत्त्वें ग्रीक लोकांना फार आवडलीं, व त्यांपैकीं अनेकांनीं त्या मार्गाचा स्वीकारहि केला. इ. स. पू. १५० च्या सुमारास तक्षशिलेस ॲंटिअल्काइडस् नांवाचा एक ग्रीक राजा राज्य करीत होता. त्याचा एक हेलिओडोरस् नांवाचा वकील माळव्यामध्यें विदिशा नगरांत शुंगराज दरबारांत होता. त्यानें वैष्णव धर्म स्वीकारून एक विष्णूचें देवालय विदिशेला बांधलें होतें. त्या देवालयाच्या समोरील गरुडध्वज सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी उपलब्ध झाला आहे. त्यावरील लेखामध्यें हेलिओडारसनें आपणास 'परमभागवत' हें विशेषण लावून घेतलेलें दिसून येतें. हिंदुस्थानांत ग्रीक अमलाच्या वेळेस सुमारें ५०,००० तरी ग्रीक येथें वसती करून राहिले होते. ते सर्व थोड्याच दशकांत पूर्ण हिंदु बनून हिंदुसमाजांत एकरूप होऊन गेले असें इतिहासावरून स्पष्ट दिसून येतें.

इ. स. पू. ५० ते इ. स. ३५० पर्यंत उत्तर हिंदुस्थानांत, शक, कुशाण वगैरे परधर्मीयांच्या स्वाऱ्या होऊन त्यांचा अमल सुरू झाला होता. हे परधर्मीय राज्यकर्तेहि थोड्याच अवधींत हिंदु बनून गेले. इ. स. च्या प्रारंभीं मथुरेस षोडास नांवाचा शकराजा होता, त्याचा उपाध्याय एक ब्राह्मण होता. विमकडफायसेस नांवाचा कुशाण बादशाह सुमारें इ. स. ५०-७५ पर्यंत उत्तर हिंदुस्थानांत राज्य करीत होता. त्याच्या नाण्यावर त्यास परममाहेश्वर असें विशेषण दिलेलें असून शिवमूर्तिहि कारलेली आढळते. प्रख्यात कनिष्क बादशाह बौद्धधर्मी होता. गुजराथ-काठेवाडमध्यें जे शक घराणें ३०० वर्षें राज्य करीत होतें, तें तिसऱ्या पिढीपासून हिंदु बनलें व संस्कृतविद्येस मनापासून उत्तेजन देऊं लागलें. या सुमारास हिंदु व बौद्ध लोकांनीं जावा, सुमात्रा, बोर्निओ या ठिकाणीं धर्मोपदेशक पाठवून आपल्या धर्माचा प्रसार केला. बोर्निओ बेटांतील हिंदु राजांनी केलेल्या यज्ञांतील शिलालेखयुक्त स्तूप सापडले आहेत. फाहियन हा इ. स. ४१५ च सुमारास जेव्हां जावा बेटांत थांबला होता, तेव्हां तेथें त्यास हिंदुधर्म रूढ असलेला आढळला. या प्रदेशांत इ. स. १३०० पर्यंत हिंदु व बौद्ध धर्मच प्रचारांत होते. पांचव्या सहाव्या शतकांत हिंदुस्थानांत हूणांच्या स्वाऱ्या झाल्या, व बरेच हूण लोक येथें येऊन राहिले. एक मत असें आहे कीं, हल्लींचे राजपूत हे या हूणांचेच वंशज आहेत. तें जरी खरें नसलें तरी ही गोष्ट निर्विवाद आहे कीं, हे सर्व हूण लवकरच हिंदु बनण्यांत आले. चंदेल, चंदल वगैरे प्रख्यात राजपूत राजघराणीं हूण कन्यांशीं लग्न करीत, असें शिलालेखावरून दिसून येतें. प्रख्यात हूण राजा मिहिरकुल हा कट्टा शैव होता, व त्याच्या नाण्यावर त्रिशूल व नंदी हे आढळतात.

परकीयांना हिंदु बनविण्याची ही प्रथा मुसल्मानांच्या स्वाऱ्या आठव्या शतकांत सुरू झाल्या त्या वेळींहि सुरू होती, पण मुसल्मानी समाजास हिंदुसमाज आत्मसात् करू शकला नाहीं. शक, कुशाण, हूण वगैरे लोकांचा स्वत चा असा विशिष्ट धर्म नव्हता पण मुसल्मानी लोकांची गोष्ट निराळी होती अल्ला, महंमद व कुराण यांवर त्यांचा अढळ निष्ठा होती, व महंमदा शिवाय इतर कोणासहि ते धर्मोपदेशक किंवा प्रेषित मानण्यास तयार नव्हते मूर्तिपूजकांचा त्यांना अत्यंत तिरस्कार होता व मांसभक्षणामध्यें त्यांना काहींच दोष दिसत नव्हता उलटपक्षीं हिंदु हे या वेळीं शाकाहारी बनले होते व गोभक्षक लोकांनी एक नवीं हिंदु जात मानणें त्यांना शक्य नव्हतें मूर्तिभंजक व मूर्तिपूजक यांचा समेट होणें शक्य होईना वरील कारणामुळें हिंदु समाजास मुसल्मानी समाजास शक, यवन, हूण इत्यादि समाजाप्रमाणें आत्मसात् करता आलें नाहीं

मुसल्मानी समाजास आत्मसात् करून स्वत चें बळ वाढवणें जरी हिंदुसमाजास शक्य झालें नाहीं, तरी मुसल्मानांच्या भ्रष्टीकरणाच्या चळवळीनें आपलें बळ कमी न होऊं देण्याची खबरदारी आपण घेतली पाहिजे असें विचारवंत हिंदुसमाजधुरीणांचें मत आठव्या शतकांत होतें सिंधमध्यें आठव्या शतकांत स्वाऱ्या होऊन जेव्हां अनेक लोक लोचलुचपतीनें अगर बळजबरीनें बाटवण्यांत येऊं लागले, तेव्हां त्यांना शुद्ध करून घेण्याचा स्वाभाविक चळवळहि त्या प्रांतांत सुरू झाली गामांतरातील शुद्धीकरणाच्या चळवळींचें नेतृत्व जसें एका तपस्व्याकडे होतें, तसें या चळवळीचा पुढारीहि एक ऋषीकडे होता त्याचें नांव देवल ऋषि समाजास आपली चळवळ चांगली कळावी म्हणून त्यांनीं आपलीं तत्त्वें एका स्मृतींत ग्रथित केलीं ती स्मृति अद्याप ' देवल स्मृति ' या नांवानें उपलब्ध आहे सदरहु स्मृतींमध्यें म्लेच्छ पासून गर्भ राहिलेल्या स्त्रियांना देखील शुद्ध करून घेतां येत असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे

> योषा गर्भं विधत्ते या म्लेच्छात्कामादकामत ।
> ब्राह्मणी क्षत्रिया वैश्या शूद्रावर्णेतराच या ॥ ४८ ॥
> अभक्ष्यभक्षणं कुर्यात्तस्या शुद्धि कथं भवेत् ।
> कृच्छ्रसांतपनं शुद्धि घृतैर्योनेश्च पाचनम् ॥ ४९ ॥

देवलस्मृतींत वीस वर्षांपेक्षा जास्त काल यवन बनलेल्यास शुद्ध करून घेत येत नाहीं असें विधान आहे पण त्यास कारण म्हणजे त्या स्मृतीचा काल असावा ती स्मृति आठव्या शतकाच्या प्रारंभीं लिहिली गेली होती व त्या वेळीं भ्रष्टकरणाची चळवळ फार बळ चालल असें लोकांना वाटलें नसावें अग्निपुराणामध्येंहि बाटलेल्या लोकांना शुद्ध करून घेण्याची मोकळीक दिलेली आहे तेथें कालमर्यादा घातलेली नाहीं हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे

> म्लेच्छैर्गताना चोरर्वा कान्तारे वा प्रवासिनाम् ।
> भक्ष्याभक्ष्यविशुद्ध्यर्थं तेषां वक्ष्यामि निष्कृतिम् ॥
> पुन प्राप्य स्वदेशं च वर्णानामनुपूर्वश ।
> कृच्छ्रस्यान्ते ब्राह्मणस्तु पुन संस्कारमर्हति ॥ अध्याय १७०, ३०-३१

देवलादि समाजधुरीणांची मतें समाजास मान्य होतीं, व त्याप्रमाणें लोक वागत, असें मुसलमानी इतिहासकाराच्या विधानावरून दिसून येतें आठव्या शतकाच्या अखेरीस सिंध मधील एकंदर स्थितीचे वर्णन करिताना अल् बिलादुरी म्हणतो कीं, त्या वेळी मुसलमानी सत्तेस उतरती कळा लागली होती, व बहुतेक सर्व बाटलेले लोक परत मूर्तिपूजक बनल्ले होते (इलियट व डौसन, भाग १, पृ १२६) या विधानावरून देवलस्मृतींतील तत्त्वें समाज आचरणात आणीत होता असें दिसून येतें अल् उत्बीनें ११ व्या शतकातील एका शुद्धिकरणाचें उदाहरण दिले आहे गझनीच्या महमदानें जयपालाच्या एका नातवास बाटवून त्यास एका शहराचे गव्हर्नर नेमले होतें पुढे त्यास पश्चात्ताप झाला व त्यानें पुन्हा हिंदु बनण्या करिता खटपट सुरू केली हें जेव्हा महमुदास समजलें तव्हा त्यानें त्याजवर झंजावाताप्रमाणें हल्ला केला, व त्यास त्याच्या जागेवरून हाकलून लावले (ईलियट् व डौसन, भाग २, पृ ३२–३)

पण या वेळीं ब्राह्मणसमाजात कूपमंडूकवृत्ति वाढत चालली होती व बाटलेल्या लोकाना परत हिंदु करू नये असे मत प्रभावी ठरू लागलें होतें अल्बेरुनीनें या बाबतींत बरीच चौकशी केली होती काहीं हिंदु लोकानीं त्यास सांगितलें कीं, थोडें प्रायश्चित्त देऊन अशा लोकाना परत स्वधर्मांत घेण्यात येतें पण ब्राह्मण लोकानीं असे करण्यात येत नाहीं असें त्यास सांगितलें अल्बेरुनीस ब्राह्मण लोकाचें म्हणणें खरें वाटलें 'जर शूद्राचे घरीं थोडे दिवस जवले तर ब्राह्मणाचें ब्राह्मण्य कायमचें नष्ट होतें तर मग म्लेच्छांत भक्षण केल्यावर तें कसें शिल्लक राहील?' असे तो विचारतो

वरील वृत्तातावरून असे दिसून येईल की, ११ व्या शतकात ब्राह्मण हळू हळू शुद्धीकरणाच्या विरुद्ध होत चालले होते, पण बहुजनसमाजास ती चळवळ अद्याप सामान्यत संमत होती पण जातिभेदाचीं बंधनें हळू हळू जास्त दृढ होत चाललीं होतीं व त्यामुळे शुद्धीकरणाच्या जातीचा प्रश्न बिकट होत चालला होता त्यामुळें इ स ११०० ते १८०० पर्यंतच्या काळात काहीं प्रातात शुद्धिकरण होत असे व काहीं प्रातात होत नसे राजपुतान्यामध्ये जरिया राजपुत मुसलमान झाले होते, व पुढें त्याना परत हिंदु बनण्याची तीव्र इच्छा झाली पण त्याना इतर राजपुतानीं शुद्ध करून घेण्याचें नाकारले असें टॉडच्या ग्रंथावरून दिसून येतें (भाग १, पृ ५०७) टिपूनें अनेक हिंदु लोकाना गोमास बळजबरीने खावयास लावून बाटविलें होतें त्यांच्या मनात परत हिंदु बनावे असें फार होतें, पण समाजानें त्यानें एकले नाहीं अखेर त्यानीं आपली स्वत ची एक नवी जात बनवून पृथक् राहण्याचें ठरविलें (इंपीरियल गॅझेटियर, भाग ९, पृ ४३)

पण शुद्धिकरणाचें तत्त्व या काळात अमलात आणल्याचेहि अनेक दाखले आढळतात १७ व्या शतकात बगालमध्ये बाटलेल्या ब्राह्मणानादेखील परत घेत असत 'ब्राह्मणाचें तेज कशानेंच लुप्त होऊ शकत नाहीं' असें गौडीय ब्राह्मणाचें निश्चित मत होतें (J A S B १९३५, पृ १९४) शिवाजीमहाराजानीं निंबाळकर घराण्यातील एक मुसलमान

बनलेल्या सरदाराम शुद्ध करून त्यास आपली मुलगीहि देऊन टाकली होती हे सर्वश्रुतच आहे. गोव्याकडे पोर्तुगीझ अधिकाऱ्यांनीं जेव्हा न बाटणाऱ्या हिंदूंची कत्तल करण्यास सुरुवात केली, तेव्हा बदला घेण्याकरिता शिवाजीमहाराजांनीं चार पाद्री लोकांना पकडलें, व हिंदु बनण्याचे त्यांनीं नाकारल्यावर त्याचा शिरच्छेद करविला ( पत्रसारसंग्रह न. ११८६ ) तेव्हा शिवाजीमहाराजाचे धर्मकारण हें त्यांच्या राजकारणाप्रमाणें चढाऊ वृत्तीचें होते हें दिसून येईल. १२–१३ वर्षे मुसलमान बनल्ल्या नेताजी पालकरासहि ते दक्षिणेत परत आल्यावर त्यानी परत हिंदु करून घेतले. शिवाजीमहाराजाचे अनुकरण तजावर येथील त्यांचे वंशज १८ व्या शतकात करीत असत असे मनुची वगैरे प्रवाशांच्या वृत्तातावरून दिसतें. ज्या वेळीं जेसुट लोकांच्या कारस्थानांनीं शेकडो लोक तजावरमध्यें बाटवण्यात येऊ लागले त्या वेळीं अखेर तेथील मराठा राजांनीं शुद्धिकरणाच्या चळवळीस राजदंडाची मदत दिली. बाटलेले लोक जर परत हिंदु झाले नाहींत तर त्यांची मिळकत जप्त करून त्याना वर निराळा दंड करण्याचा हुकूम तजावरच्या राजांनीं काढला होता, व त्यामुळें बहुतेक सर्व जण परत हिंदु बनले (मनुची भाग ३, पृ. ३२८). अठराव्या शतकात पैठण हें सनातन ब्राह्मणाचे आगर होते, पण तेथील ब्राह्मणहि शुद्धिकरणाच्या उलट नव्हते. नरहर नराळेकर नावाचा एक ब्राह्मण पानिपतच्या लढाईवर गेला होता. तेथे तो मुसलमानांच्या तावडींत सापडून अखेर बाटविला गेला. पुढें तो ११ वर्षांनीं १७७२ साली कैदेतून सुटून पैठणला परत आला. तेव्हा पैठणच्या ब्रह्मसभेनें त्यास प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेतलें. पण नरहर नराळेकराचे कांहीं हितशत्रू होते, त्यांनीं या शुद्धिकरणाविरुद्ध पुण्याला पेशव्याकडे तक्रार केली. पुण्याच्या पंडितानीं पैठणच्या ब्रह्मसभेचा निकाल फिरविला. १० १२ वर्षे यवनमय झालेल्यास शुद्ध करून घेता येत नाही, तेव्हा नराळेकरास हिंदु करू नये असा हुकूम पुण्याहून पैठणला गेला, व नरहर नराळेकर पुन्हा मुसलमान झाला! ( पेशवेकालीन महाराष्ट्र, पृ. ३८९ ९० ) पुण्याच्या पंडिताचे मत २-४ वर्षांच्या आत शुद्धि व्हावयास पाहिजे असे असावे असें दिसते

वरील उदाहरणावरून असे दिसून येईल कीं, १८ व्या शतकापर्यंत धर्मभ्रष्टांचें शुद्धिकरण मधून मधून होत असे, व त्या कृत्यास हिंदु राजसत्तेचाहि पाठिंबा मिळत असे. ब्राह्मणापैकीं सुद्धा कांहीं लोक बारा वर्षे यवनमय झालेल्यास सुद्धा परत शुद्ध करून घ्यावें अशा मताचे होते. बंगाली ब्राह्मण तर ब्राह्मण्य हें कशानेंच नष्ट होत नाहीं असे प्रतिपादीत. पण एकदरींत अग्निपुराण, देवलस्मृति इत्यादि ग्रंथामध्यें प्रणीत केलेली शुद्धिकरणाची पद्धत मागें पडत चालली होती. राजसत्ता मुसलमानी असल्यामुळें स्वाभाविकच ती शुद्धिकरणास विरुद्ध होती. शिवाजीसारखे कांहीं दूरदर्शी हिंदु राजे शुद्धिकरणाचे पुरस्कर्ते होते, पण ते अल्पसंख्यच होते. दुसरी अडचण म्हणजे जातिभेदाची होती. या कालात हिंदु समाज अनेक जमातींत विभागिला गेला होता, व प्रत्येक जमातीस असे वाटे कीं शिवाशिव, खाणेपिणें, बेटीव्यवहार इत्यादि बाबतींत आपण जितका अधिक आकुंचितपणा दाखवू, तितकें अधिक आपल्ले श्रेष्ठत्व मानले जाईल. या वृत्तीमुळे स्वाभाविकच धर्मभ्रष्टांच्या शुद्धिकरणास बहुजनसमाज उलट होऊ लागला.

याच वृत्तीमुळें राजपुतामधील जेरिया, मालकाना वगैरे जमातीस इच्छा असूनहि परत हिंदु होता आलें नाहीं. टिपूनें बाटवलेल्यांनाहि नवी जात करून राहावें लागलें.

हिंदु करणाच्या व शुद्धिकरणाच्या वरील इतिहासावरून असें दिसून येईल कीं, शुद्धिकरणाची हल्लीं सुरू झालेली चळवळ आपल्या संस्कृतीस धरूनच आहे. त्यामध्यें शास्त्रविरुद्ध काहींच नाहीं. ती फक्त अशास्त्रप्रणीत, रूढिसिद्ध व कूपमंडूक वृत्तीच्या उलट आहे. '**कृण्वन्तो विश्वमार्यम्**' हें आपल्या धर्माचें ब्रीद वैदिक कालापासून तें सुमारें इ. स. ८०० पर्यंत होतें, व शुद्धिकरणाची चळवळ ही त्यास अनुसरूनच आहे. अल्बेरुनीला जेव्हा काहीं ब्राह्मण शुद्धिकरणाच्या उलट आहेत असें कळलें, तेव्हा त्यास अचंबा वाटला. तो म्हणतो, "भ्रष्ट झालेली गोष्ट पवित्र करावी ही स्वाभाविक मानवी प्रवृत्ति आहे. आपल्या हातास अगर पायास घाण लागली तर आपण ती लगेच धुऊन टाकीत नाहीं काय? पण हिंदु लोक हे फार विचित्र आहेत. परधर्मीयांस जरी मनापासून त्यांच्या धर्माचा स्वीकार करावासा वाटला तरी ते त्यास आपल्या धर्मांत घेत नाहींत." तेव्हा बळजबरीनें अगर ल्पालुचपतीनें जे लोक फसून परधर्मांत गेले असतील, त्यास जर खरोखर पश्चात्ताप होत असेल, तर त्यांना परत आपल्या धर्मांत घेणें, किंवा ज्या परधर्मीयांना आपला धर्म मनापासून आवडत असेल, त्यांना त्यांत प्रवेश करण्यास परवानगी देणें हें आपल्या संस्कृतीस एकदरींत अनुकूलच आहे असा निष्कर्ष वरील विवेचनावरून निघतो.

# मराठेशाहींतील फौजा

[ लेखक—जनरल नानासाहेब शिंदे, बडोदें ]

" ज्या देशास संस्मरणीय भूतकाळ नाहीं, त्याला स्पृहणीय भविष्यकाळहि नाहीं. "

कोणत्याहि राष्ट्राच्या इतिहासाचा अभ्यास करताना प्रथमतः त्या राष्ट्रातील लष्करी सामर्थ्याकडे व लष्करी पराक्रमाकड लक्ष जावें हें साहजिकच आहे. कारण राज्ये मिळविण्याच्या किंवा राखण्याच्या कामीं जीं साधनें उपयोगी पडतात त्यात लष्करी सामर्थ्याचा दर्जा नि.संशय पहिला असतो. नाना फडणविसाची तरवार केवळ मनसुभाची होती हे खरें, तरी पण प्रत्यक्ष खऱ्याखुऱ्या तरवारीशीं तिची गाठ पडली, तेव्हा तिला नमावेंच लागलें. **श्रीशिवाजीमहाराज** हे मुत्सद्दी होते, पण ते तरवारबहाद्दर नसते तर स्वराज्यसंस्थापनेस त्याची निव्वळ मुत्सद्देगिरी कितपत उपयोगी पडली असती हें सागणें फार कठिण आहे.

या लेखात फक्त मराठेशाहीमध्यें म्हणजे श्रीछत्रपति शिवाजीमहाराजापासून पेशवाई अखेरपर्यंत फौजेची रचना, व्यवस्था, शिक्षण वगैरे कोणत्या प्रकारचें होतें याबद्दलची माहिती देण्याचा प्रयत्न मी करणार आहें. यासाठीं श्रीशिवाजीमहाराजाच्या वेळीं लष्कराची व्यवस्था कशी होती याजबद्दल आपण प्रथम विचार करूं. घोडदळात **बारगीर** व **शिलेदार** असे दोन प्रकार होते. बारगिराच्या घोडदळास पागा असें म्हणत. या पागेंतील सगळीं घोडीं सरकारचीं असून त्याचा खर्चहि सरकारातून केला जात असे. शिलेदाराच्या घोडदळातील घोडीं प्रत्येक शिलेदारानें आपापलीं आणावीं व त्याची जोपासना ज्याची त्यानें करावी असा निर्बंध असे. याबद्दल त्यास घोड्याचा खर्च व शिवाय पगार सरकारातून रोख मिळत असे. हें शिलेदाराचें घोडदळ ठेवण्याची पद्धत यवन पादशाहींतील होती. ती महाराजास फारशी आवडत नसे. कारण अशीं घोडीं राहावींत तशी हुशार राहात नसत, व कोणी शिलेदार चाकरीस कंटाळला असता तो आपल्या घोड्यासह निघून जाण्याचा संभव असे. यासाठीं या शिलेदाराची संख्या कमी करण्याचें महाराजाचें धोरण नेहमीं असे. अशी शिलेदारी करून उदरनिर्वाह करणाऱ्या लोकाची संख्या त्या काळीं पुष्कळ असल्याकारणानें, महाराजास त्याना नोकरीस ठेवणें प्राप्त असे. पावसाळ्यामध्यें घोड्यास ठेवण्याकरिता पागा बाधलेल्या असत. त्या ठिकाणीं घोड्यास ठेवून त्याचा व स्वाराचा खर्च सरकारातून होत असे. सुगीच्या दिवसात घोडदळानें आपला खर्च दुष्मनाच्या मुलुखातून भागवावा असें असे.

पायदळात मुख्य दोन प्रकारचे लोक असत. एक घाटमाथ्यावरचे मावळे आणि दुसरे घाटाखालील कोंकणातील हेटकरी. मावळे तरवारबहाद्दर असत व हटकरी अचूक नेम मारण्यात कुशल असत. हे मावळे व हेटकरी सर्वदा डोंगराळ प्रदेशात राहणारे असल्यानें अवघड डोंगरावर व कडयावर चढण्यात अत्यंत तरबेज असत. असे चपळ लोक इतर कोणत्याहि प्रांतात त्या वेळीं नव्हते. पायदळांतील कांहीं शिपायांच्या हातीं तीरकमठे, पट्टे, इटे, बरच्या व सांग असत, व कांहीं खास बारदार असत. पायदळास लागणाऱ्या बंदुका व दारूगोळा श्रीछत्रपति शिवाजीमहाराजास पोर्तुगीज लोकांकडून घ्यावा लागत असे. याप्रमाणें जो ज्या शस्त्राच्या कारवाईंत कुशल असे त्यानें तें शस्त्र वापरावें असा नियम असे. सर्व पायदळास रोख पगार देण्यात येत असे.

महाराजाच्या ताब्यात २८० किल्ले होते. या किल्ल्याचें महत्व महाराजास फार वाटे. कारण काबीज केलेल्या प्रांताचें रक्षण यथास्थित व्हावयास या किल्ल्यांची आवश्यकता त्या धामधुमीच्या काळांत अतिशयच होती. हे किल्ले स्वराज्याचे केवळ जीवप्राण आहेत असें महाराजास वाटत असे. म्हणून या किल्ल्यांची व्यवस्था त्यांनीं फार चौकसपणानें लावून दिली होती. किल्ल्यावरील लोकास अडीशेरी, नगदी वगैरे वेतन वेळच्या वेळीं देण्यात येत असे.

महाराजाच्या अंतसमयीं खारा ८०,००० स्वार होते व शिलेदार पागेंत २५,००० होते. एकुण १,०५,००० घोडदळ होतें. याशिवाय मावळे व हेटकरी यांचें पायदल सैन्य एकंदर सुमारें एक लक्ष होतें.

नेपोलियन बोनापार्टप्रमाणें शिवाजीमहाराजावर त्यांच्या फौजेची मोठी भक्ति व प्रेम होतें. त्यांच्यायोगें वाटेल त्या संकटात उडी घालण्यास महाराजाची फौज नेहमीं तयार असे. बहादुरीबद्दल बक्षिसें देण्यात महाराज जसे उदार होते, तसेच लष्करी कडक शिस्तीचेहि ते फार भोक्ते होते. स्वारीस जाणाऱ्या इसमापैकीं कोणीहि आपली बायको, बटिक किंवा कलावंतीण बरोबर नेऊ नये, व त्याचप्रमाणे स्वारीबरोबर कलाल नसावेत, अशी सक्त ताकीद असे. हा नियम मोडणारास देहान्त शासन देण्यात येत असे. सिंहगड काबीज केला तेव्हा प्रत्येक शिपायास त्यांनीं चांदीचें कडें बक्षीस दिलें होतें. कडक शिस्तीमुळें व त्यांच्यावरील भक्तीमुळेंच बाजी प्रभु यानें मरेपर्यंत रांगण्याची घोडखिंड अडवून धरली होती. अफझलखानाच्या तुकडीस फळून जाण्यास खंडोजी काकडे यानें मदत केली, म्हणून महाराजानीं त्यास फाशी दिले. जंजिऱ्याचा किल्ला घेताना श्यामराज पंताचा पराभव झाला म्हणून महाराजानीं त्याची पेशवाई काढून घेतली. हे सर्व नोकर पगारी होते, म्हणून महाराजास अशी शिस्त ठेवता येत होती.

भाला, बोथाटी, तरवार व बंदूक हीं चालविण्यास शिकविण्याच्या शाळा त्या वेळीं नव्हत्या. या सर्व गोष्टी सवयीनें करावयास येतात तशा त्या मराठी सैनिकानाहि येत असत तथापि शिक्षणाच्या लष्करी शाळा व शिस्तीची कवाइत नसल्यामुळें मराठ्याच्या लष्करी गुणाच्या उपयुक्ततेंत उणेपणा होता तो त्याना पुढें पुढें जाणवू लागला. लष्करी भरतींत मागें

व घोडीं याची वाण मात्र मराठयास कधींच पडली नाहीं. सुगीच्या दिवसात कुरणात घोडी सोडून द्यावयाची व जातिवंत मादयांना वाळगून घोडयाच्या पागा तयार करावयाच्या हें शिलेदार लोकांचें काम असे. हा एक त्या काळचा प्रतिष्ठित धंदा असून वैभवास चढण्याचा मार्ग होता. सर्वच घोडयाचा षौक असल्यामुळें गरिबापासून श्रीमंतापर्यंत उमदी घोडीं पदरी बाळगण्याचा सर्वांनाच एक प्रकारचा षौक असे. दारात घोडें नाहीं असें घर नाहीं, घोडयावर बसता येत नाहीं असा घरात मनुष्य नाहीं, अशी महाराष्ट्राची स्थिति एक वेळ होती. कृष्णा, भीमा व गोदावरी या नद्यांच्या काठचीं तट्टें खबीर असून तीं भारी मजला मारीत. या भीमथडीच्या घोडयासच मराठयानीं दिग्विजय करून सिंधूनदाचें पाणी पाजलें. गनिमी काव्याच्या लढाईत या चपळ व भारी मजला मारणाऱ्या घोडयाचा मराठयास फार उपयोग होत असे हें सागण्याची जरूर नाहीं

## सरंजामी पद्धत

श्रीछत्रपति शिवाजीमहाराजानीं फौजेस रोख पगार देण्याची जी पद्धत सुरू केली होती ती पुढें शाहूमहाराजाचे वेळीं पेशव्यानें बदलली. फौजेस रोख पगार देण्याचे ऐवजीं नवीन जिंकलेल्या मुलखामध्यें जहागिरी देण्याची पद्धत पेशव्यानें सुरू केली. या पद्धतीस सरंजामी पद्धत असें म्हणतात. मराठयाची आपल्या वतनावर म्हणजे जमिनीच्या तुकडयावर अतोनात आसक्ति असते. या आसक्तीची परक्या लोकास कल्पना होणें शक्य नाहीं. मराठे लोक दुसऱ्या वाटेल त्या गोष्टीचा त्याग करतील, परंतु वडिलार्जित मालकीच्या जमिनीचा त्याग ते प्राण गेला तरी करणार नाहींत. या स्वभावगुणाचा फायदा घेऊन औरंगजेब लोकास भराभर नवीन वतनें देऊ लागला, तेव्हा राजाराममहाराजास व त्याच्या कारभाऱ्यासहि तोच मार्ग स्वीकारावा लागला. नाहीं तर बादशहाशीं लढण्यास कोणीच पुढें आला नसता. मुख्य अडचण म्हणजे त्या वेळीं फौज पाहिजे होती. पुरती फौज कशी निर्माण करावी हा मोठा प्रश्न होता. औरंगजेबासारख्या बलाढ्य बादशहाशीं टक्कर देण्याचा तो वखत होता. श्रीछत्रपति संभाजीमहाराजाचा वध होऊन राजाराममहाराज जिंजीच्या किल्ल्यात अडकून पडले होते. युरोपात हल्लीं कायद्यानें व शिस्तीनें जशा फौजा निर्माण करता येतात, तसा प्रकार त्या वेळीं नव्हता. श्रीछत्रपति शिवाजीमहाराजानीं रोख पगार देण्याची पद्धत घातली होती ती बंद पडली. कारण फौजेस पगार देण्यास पैसा नव्हता. म्हणून वतनाची लालूच दाखविल्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. हा जो प्रघात एकदा पडला तो पुढें नाहींसा करता आला नाहीं. आपणात कोणीहि राजा नसता व जवळ तिजोरीत पैसा नसता, औरंगजेब बादशहाबरोबर मराठयानीं महाराष्ट्रात जें हें २१ वर्षे स्वातंत्र्याधीस्वर्थ युद्ध चालू ठेविलें होते, त्या कामीं त्यास जहागिरीचा व वतनाचा अवलंब करणें भाग पडलें पेशव्यानासुद्धा वतनदारीची पद्धत चालवावी लागली. प्रत्येक वतनदारानें अमूक एक फौज धेऊन लढायला यावें असा करार असे मात्र या व्यवस्थेंत एक मोठा दोष असा होता कीं, पावसाळ्यात सर्व लोक आपली शेतीभाती पाहाण्यासाठीं घरीं जात आणि त्या वेळीं सरकारजवळ लढण्यास फौज राहात नसे एखादी

मोहीम चालू असतां पावसाळा सुरू झाल्याबरोबर ती मोहीम तशीच टाकून लोक घरोघर निघून गेल्याने राज्याचें कार्य बिघडलें, असे अनेक प्रसंग पुढें मराठेशाहींत आले. वतनावरील आसक्ति मराठे लोकांच्या मनात किती होती हें यावरून दिसतें. महादजी शिंद्यास दिल्लीच्या बादशहाचा वजीर अगर 'अलिजा बहादर' म्हणवून घेण्यापेक्षा जाय गावचे 'पाटील' म्हणवून घेण्यात प्रौढी वाटत असे.

बाळाजी विश्वनाथ पेशवा दिल्लीहून चौथाईच्या सनदा घेऊन आल्यावर वसुलाची व लष्कराची पुढील तरतूद करण्यासाठीं त्यानें सरंजामी पद्धत ठरवून दिली. निरनिराळ्या सरदारास मुलुखगिरीसाठीं प्रदेश तोडून दिले. सरदारानें आपल्या मुलखांत वसूल गोळा करावा, न्यायनिवाडा करावा व त्याचा बंदोबस्त ठेवावा. सरदाराना जहागिरी देतांना बाळाजीनें पुढीलप्रमाणें अटी घातल्या होत्या—

१ सरदारांनीं आपआपल्या मुलखात मुलकी व लष्करी अंमल चालवावा.

२ छत्रपति व त्यांचे मुख्य प्रधान यांच्या हुकमाशिवाय कोणत्याहि सरदारानें परराष्ट्रांशीं लढाई किंवा तह करूं नये.

३ ठरविलेली खंडणी सरकारात भरावी.

४ जहागिरीच्या उत्पन्नाचे हिशेब सरकारचे अंमलदार तपासतील, त्यांस तपासूं द्यावेत.

या अटी सरदारांनीं मोठ्या खुषीनें पत्करल्या. जहागिरी मिळाल्याबद्दल सर्वांस मोठा आनंद झाला व जवळच्या मोगलाचा प्रांत काबीज करून आपली जहागिर वाढविण्याचा जो तो सरदार प्रयत्न करूं लागला. यामुळें पुढें मराठ्यांचें राज्य झपाट्यानें वाढलें.

लाख रुपये कर्जदार, " अशीं पत्रें बाजीरावानें ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलेलीं त्या वेळच्या स्थितीचीं निदर्शक आहेत. रोकड तनखे देण्याऐवजीं जहागिरीची पद्धत ठरविल्यानें हे दोष उत्पन्न झाले. अन्यवस्थित लष्करी पद्धत हें नेहमींच मराठी राज्यानें मोठें व्यंग असून त्यामुळें राज्याचें फार मोठें नुकसान झालें. सर्व सरकारी नोकराम रोख पगार देणें आणि त्याच्या नोकऱ्या केव्हांहि पिढीजाद न चालविणें, हा श्रीछत्रपति शिवाजीमहाराजाचा मुख्य नियम होता, परंतु त्याच्या पश्चात् तो पुढें पाळला गेला नाहीं.

पेशवाईत फौजेचा पगार नेहमीं बाकी थकलेला असे. मागील देण्याचा निकाल लागल्याशिवाय एकहि स्वार पुन्हा दुसऱ्या मुलुखगिरीवर जाण्यास खुशी नसे. स्वारांनीं पागे व पथके यास पैशाकरिता तगादा लावावा, पागांनीं व पथकांनीं मुख्य सरदाराच्या दारात धरणें देऊन त्यास उपाशी बसवावें, मुख्य सरदारानीं कारभाऱ्याच्या दारात गयावया करीत जाऊन बसावें असा नित्यक्रम असे.

## डेरे दाखल होणें ( Mobilization )

मराठी फौजाची चाकरी नेहमीं आठमाही असे शत्रूच्या मुलखात छावणी झाल्यास क्वचित् बारमाही चाकरी पडे उदाहरणार्थ समजू कीं, कोणा शिलेदारास रु ३०० तैनात ठरली आहे बहुधा श्रावणाच्या महिन्यात त्या शिलेदारास नालबंदी मिळे. ही नालबंदीची रक्कम रु. १२५ असे. भाद्रपद मासात स्वारीस तयार होण्याविषयीं पत्र जात असे त्या वेळीं खानगी म्हणून आगखी रु. १० देत असत. पुन्हा आश्विनात दसऱ्याचें कापड ५० आख अथवा रोख रु. २५ मिळत. मिळून रु. १६० त्यास पेहेचित असत व रु. १४० सरकारातून देणें बाकी राहात असे. सरदार ' डेरे दाखल झाला ' म्हणज ती मोहीम सुरू झाल्याची व फौज जमा होण्याची खूण होती. त्या वेळचें हें Mobilization समजलें जात असे. लगेच सरदाराचें पत्र त्या शिलेदारास जात असे कीं, तुम्ही जल्दीनें तयार होऊन अमूक मुक्कामीं लष्करात दाखल व्हावें. याप्रमाणें तो कार्तिक शु॥ १ ला घराहून निघून त्याच दिवशीं लष्करात हजर होई व त्या दिवसापासून त्याचा रोजमुरा सुरू होत असे. हा रोजमुरा आठवड्याचा रु. ४ असे व वैशाख अखेरपर्यंत तो कर्नाटकात अगर हिंदुस्थानात मोहिमेवर राहिला म्हणून त्यास सात महिन्यात रोजमुरा रु. ११२ मिळत असे. नतर मोहीम सपल्यावर बाकी रु. २८ पेहराव अगर रोख रुपये त्यास मिळत व रोजमुरा बंद होत असे. याप्रमाणें सरदाराशीं केलेला करार पुरा करून तो घरीं जात असे. पाऊस सुरू होण्यापूर्वीं आपल्या मुलामाणसात जाऊन राहावें, आपली शेतीभाती व संसाराचीं इतर कामें पहावीं, घोड्यास विश्रांति देऊन ते ताजेतवान करावेत, इकडे शिलेदाराचा फार ओढा असल्यानें छावणीस राहाण्याचें त्याच्या फार जिवावर येई. त्यास राहावून घ्यावयाचें झाल्यास सरदारानीं सक्ति करून काहीं उपयोग होत नसे.

छावणींत फौज ठेवण्याची गोष्ट निघाली कीं, सरजामी सरदाराच्या पोटात धस्स होत असे. याचें कारण उघड आहे. समजा कीं, दर स्वारास रु. ३०० प्रमाणें हिशोबानें १००० स्वार बाळगण्याच्या शर्तीवर कोणास रुपये तीन लक्षाचा मुलूख जहागिर मिळाला होता. त्याप्रमाणें

त्या सरदारानें १००० स्वारासह वैशाख अखेरपर्यंत स्वारी चाकरी केली. येथपर्यंत ठीक झालें. पण पुढें त्यास छावणींत राहाण्याचा हुकूम सरकारांतून झाल्यास त्यानें आपल्या फौजेस रोजमुरे कोठून द्यावेत ? छावणीचा खर्च त्यानें सरजामाच्या उत्पन्नामधूनच समजून घ्यावयाचा ठराव असल्यामुळें व वर सांगितल्याप्रमाणें वैशाख अखेरपर्यंतच प्रत्येक शिलेदार म. ३०० खाऊन गेल्यामुळें पुढचे आश्विनपर्यंतचे रोजमुरे सरदारानें पदरचे दिले पाहिजेत. याशिवाय पावसाळयात काहीं आसरा करून घेण्यासाठीं पाल्पडदा पाहिजे. त्यासाठीं, सणावाराकरिता व भाद्रपद मासीं पक्षाकरिता म्हणून शिलेदारास काहीं निराळें द्यावेंच लागे. मिळून, दर स्वारास रु. ७५ धरलें, तरी एक हजार स्वारांच्या सरदारास निदान पाऊण लाख रुपये छावणीनिमित्त खर्च नाहक पडला. अशा दोन किंवा तीन छावण्या पडल्या म्हणजे सरदारी लिलावासच निघावयाची ! सरकारच्या मागण्यावरून त्या सरदारानें ठरावापेक्षा अधिक फौज ठेवली असली तर त्याच्या फजितीस पारावारच नाहीं ! राज्यात चोहींकडे शांतता असली तरी देखील फौज छावणीस ठेवणें फार कठिण. मग सर्वत्र बंडाळी सुरू असल्यामुळें, कोठूनच वसूल येईनासा झाल्यावर सरदारांची स्थिति काय होत असेल याची कल्पनाच करणें शक्य नाहीं. मराठे सरदार नेहमीं कर्जबाजारी व फौजेच्या थकलेल्या बाकीकरिता त्यांना तगादे व दारीं सदैव धरणीं चालू असत, त्यांतील खरें इंगित वरील वाईट पद्धतींत होतें असें कोणीहि कबूल करील.

शिरस्त्याप्रमाणें सरजामी सरदाराकडून जहागिरीचें, सरजामाचें हिशेब घेण्याचा योग येई, त्या वेळीं नेहमीं तकरारी चालत. कारण या सरदारांचें महत्त्वच इतकें वाढलें होतें कीं, त्यांच्या सरजामाचे हिशेब पेशव्यांनीं आपणाजवळ मागणें हा एक प्रकारचा आपला अपमान किंवा कमीपणाहि वाटू लागला होता. अर्थात् सरजामी सरदारांचीं मर्जी अशी माजल्यामुळें दौलतीचें व्यापक धोरण त्यांच्या अनुमतीशिवाय ठरविणें पेशव्यास अशक्य झालें होतें. मूळ राजसत्ता छत्रपतींची, सर्वाधिकार पेशव्यांचा, मनसबा फडणिसांचा व तरवार सरदारांची अशी मराठे दौलतीच्या सत्तानीं चार ठिकाणीं वाटणी झाल्यामुळें एकतंत्री कारभार चालणें अशक्यच झालें होतें. सरदारांनीं स्वाई जिंकून वसूल सहारा आणावे, फडणिसांनीं मुलकी धोरण पाहून वहाच्या अर्टी बनवाव्यात, पेशव्यांनीं यावर सहलाली करावी व सातारच्या छत्रपतींनीं त्यावर शिक्कामोर्तब व्हावें. असा चौतर्फी कारभार चालत असून, सर्वांचें ऐक्य असल्यास इतर मोठें सर्वे मामलत लगत, व हें जोंपर्यंत पण आदरपूर्वक सांभाळलें जात असत तोंपर्यंतच मराठेशाहीत अतरथ जोर जिवत राहिला. इंग्रज इतिहासकार मराठेशाहीचें वर्णन करतांना 'मराठी राज्य' असें न म्हणता 'मराठा संघ' असें म्हणत तें बरोबर आहे. हा संघ जोंपर्यंत टिकला, तोंपर्यंत मराठ्यांची सत्ता सर्व हिंदुस्थानभर होती. परंतु तो संघ मोडताच ती सत्ता नष्ट झाली.

काव्याची लढाई करण्यात मराठ्यांइतके पटाईत लोक हिंदुस्थानात कोणीहि नव्हते. शत्रूबरोबर तोफा, पायदळ व पुष्कळसे बाजारबुणगे असले म्हणजे त्याची या गनिमी काव्यानें जी त्रेधा उडून जाई ती पुसू नये! ते लुटालूट व जाळपोळ करीत शत्रूच्या मुलुखांतून हिंडत तेव्हा त्यांच्यानें त्यांचा पाठलागहि करवत नसे. कारण तो जर फक्त घोडेस्वाराची फौज घेऊन पाठीस लागला तर ते बेशक त्याजवर उलटून पडून त्याचा चुराडा करीत. पायदळ व तोफखान्याचें लटांबर घेऊन तो पाठीस लागेल तर हे तोंपर्यंत शेंपन्नास कोस दूर जात असत. हा गनिमी काव्याचा एक प्रकार झाला. मराठ्यांची फौज शत्रूपेक्षा कमी असली म्हणजे दुष्मनास हेलपाटे घालावयास लावून बेजार करून नंतर त्याच्याशीं गांठ घालावयाचा त्यांचा विचार असला तर ते याप्रमाणें करीत. जर शत्रूपेक्षा दीडपटीनें, दुपटीनें आपली फौज अधिक असली तर त्यांची गनिमी काव्याची निराळीच तऱ्हा होती. ते जेथें शत्रू असेल तेथें जाऊन त्यास घेरीत. त्याच्या लहानसहान टोळ्यावर झडप घालून त्या मारून टाकीत. मोठीशी चांगली १०-१५ हजाराची टोळी आपली मुख्य फौज सोडून अंगावर चालून आली, म्हणजे आपण म्यालेंसे दाखवून ते पळू लागत. आपला जय झालासें समजून शत्रु झपाट्यानें पाठलाग करी. या प्रमाणें त्यास पाठीवर घेऊन बरेच अंतरावर गेल्यावर व त्याची लढाईची व्यवस्था अगदी मोडली आहे व तो बेसावध झाला आहे असें पाहून एखादी अडचणीची जागा पाहून हे एकदम माघारी उलटून त्याजवर तुटून पडत व त्याचा संहार करीत. ते शत्रूच्या लष्करा-भोंवती रात्रंदिवस घिरट्या घालीत. त्याच्या चौक्या मारून तुडवून टाकीत. त्यास अन्नपाणी व वैरण अगदीं पोंचू नयेसा बंदोबस्त करीत. रात्रीं त्याच्या लष्करात बाणाचा वर्षाव करीत व दिवसा जेजालाचा व बंदुकाचा मारा करीत. अशा स्थितींत तो हैराण होऊन तळ हालवून कूच करू लागला, म्हणजे हे नेहमीं त्याच्या पिछाडीस बिलगत व त्यास "पायबंद" करीत. यामुळे त्यास मुक्कामच करणें भाग पडे. त्यानें मुक्काम केला म्हणजे अन्नपाणी बाहेरून पोंचण्याचें बंद केल्यामुळें त्यास उपाशीं मरण्याची पाळी येऊन, शरण येऊन कशी तरी आपली सुटका करून घेणें त्यास भाग पडे.

मराठ्यांच्या गनिमी काव्याच्या युद्धपद्धतीचे श्रीछत्रपति शिवाजीमहाराज हे आद्य प्रवर्तक होते. सह्याद्रीसारख्या डोंगराळ प्रदेशात डोंगरी किल्ल्यांच्या आश्रयानें मूठभर मावळे लोकांनिशीं गनिमी काव्यानेच मोगल बादशाहीशीं व विजापूरकराशीं टक्कर देऊन महाराजांनीं स्वराज्याची मुहूर्तमेढ रोविली. अफझलखानाच्या वधानंतर त्याच्या लष्करांतील पकडलेल्या घोड्यावर मात्र मावळ्यास बसवून महाराजांनीं प्रथम आपले घोडदळ तयार केलें. या घोडदळामध्ये गनिमी काव्याचें शिक्षण देऊन तयार केलें. या घोडदळाचा मुख्य सेनापति नेताजी पालकर हा होता. शिवाजीमहाराजांच्या धाडशी व बाणेदार सरदारांपैकीं हा एक होता. कोठेंहि संकटाची वेळ आली कीं, तेथे ही स्वारी दत्त असेच. प्रतापराव गुजर हाहि एक घोडेस्वाराचा सेनापति होता. खंडेराव दाभाडे, परसोजी भोसले, संताजी घोरपडे, धनाजी जाधव वगैरे शूर पुरुष नुकतेच कोठें समरांगणात येऊं लागले होते. शिवाजी-महाराजांच्या पश्चात् यांची खरी योग्यता दिसून आली. यांपैकीं पहिल्या जोडीनें गनिमी काव्याने

लढून वऱ्हाडात मराठ्यांची सत्ता कायमपणें स्थापिली. दुसऱ्या जोडीनें औरंगजेबास पादाक्रांत करून महाराष्ट्रास स्वतंत्र करण्याकरिता चालविलेल्या युद्धाचा शेवट गोड केला एकवीस वर्षेपर्यंत मराठ्यांविरुद्ध युद्ध चालविलें ही आपण अनर्थकारक चूक केली अशी औरंगजेब बादशहाची खात्री झाली. त्याचें तीन लाख प्रचंड सैन्य निरुपयोगी झालें. त्याच्या स्वत च्या तंबूचे सो न्याचे कळसहि मराठ्यांनीं लुटून नेले. खुद्द बादशहाहि पकडला जाण्याच्या अगदीं बेतात होता. तेव्हा अहमदनगर येथें मरते वेळीं "आपला जन्म फुकट गेला" असे ज बादशहानें उद्गार काढले, ते निष्कारण नव्हत. मूठभर मराठे लोकांनीं, धाडशी व शूर सरदाराच्या नेतृत्वाखालीं गनिमी काव्यानें लढून मोगल बादशहास कसें हैराण केलें त्याचें हे उत्तम उदाहरण आहे.

## मराठ्यांचा काटकपणा

शिवाजीमहाराजाच्या मृत्यूनंतर व संभाजीमहाराजाच्या वधानंतर औरंगजेबाबरोबर मराठ्यांनीं जें युद्ध चालविलें होतें त्याचें वर्णन ग्राट डफनें येणेंप्रमाणे केले आहे–"मराठ्याचें सामान म्हटले म्हणज थोडीशी भाकरी व एक घोंगडी एवढें काय तें असे. रात्रीं कोठें उतरले तर ते घोड्याची लगाम हातात धरूनच घोंगडी पसरून त्यावर काहीं वेळ अंग टाकून राहात. त्याप्रमाणें दिवसा दोनप्रहरीं काहीं खाण्याकरिता किंवा ऊन टाळण्याकरिता ते उतरले म्हणज पाच पाच, सहा सहा जण एखादें झाडझूड असलें, तर त्याच छायेखालीं उतरत परंतु उघडें मैदानच असलें, तर ते जमिनींत भाले रोवून त्यास आपले घोडे बांधून भाल्याचे टोकावरून एखादी घोंगडी आडवी पसरून देत व तिच्या लहानशा छायेत फक्त डोकीं ठेवून, बाकी सर्व अंगास दुपारचें कडक ऊन लागत असताहि जमिनीवर घोरत पडलेले आढळत. आपल्या तरवारींस मात्र ते कधींहि विसरत नसत. त्या ते कुशीशीं ठेवीत त्याजजवळ उंट, बैल, वगैरे काहीं नसून फक्त लहान, खुजीं, चपळ, काटक अशीं तट्टें असत. मिळालेली लूट त्यावर लादून ती ते फार जल्दीनें लांबवीत. येणेंप्रमाणें मराठ्याची फौज अगदीं मुठमुठीत असल्यामुळे, मिजासी, व काहीं अशीं बेफैद अशा बादशहाच्या फौजेस तिचा पाठलाग करणें कठिणच पडे. त्यातूनहि ती कधीं गाठली जाऊन तिचा पराभव झालाच तर तिचें नुकसान तें काय होणार? उलट पक्षीं मोगलांचेच हाल होत. बादशहा मारल्यापासून आपला फायदा नाहीं, तो जिवंत राहिल्यानेंच आमचा लुटीचा धंदा चांगला चालतो असें सर्व मराठे त्या वेळीं म्हणत असत."

शत्रूचे मुलखात मोहीम करण्याची मराठ्यांची अशी तऱ्हा होती कीं, त्याच्या सैन्याच्या लहान लहान टोळ्या साऱ्या प्रांतभर पसरत आणि लुटालूट व जाळपोळ एकदाच चोहोंकडे सुरू करून रहिवाशी लोकास व शत्रूच्या फौजेस अगदीं भंडावून सोडीत. त्यांची लढण्याची शिस्त अशा तऱ्हेची होती कीं, तिच्या योगानें कसलेहि पराक्रमी व बलाढ्य शत्रू मैदानात त्याच्या तावडींत एकदा सापडले म्हणज बहुधा सुरक्षितपणें सुटत नसत. त्याच्या गनिमी काव्याच्या लढाईंत पायदळ व तोफखाना याचा त्यास काहीं उपयोग होत नसे. म्हणून मराठे प्रत्यक्ष स्वारींत तो बाळगीत नसत. मराठे टाळी टाळीनें शत्रूवर हल्ला करीत व या हल्ल्यास

" हिरिरी " अशी मना होती मराठ्याची नहमींची हल्ला करण्याची रीत बहुधा हिरिरीचाच असे सान्या फौजेचा एकदम हल्ला फार कचित् होई याचें कारण असें कीं, असा सर्व फौजेनें हल्ला केला आणि जर का तो शत्रूनें माघारा फिरविला, तर सान्या फौजेचा धीर सुटून ती पळत सुटावयाची यासाठीं शत्रूस जिंकू अशी पक्की खात्री असल्याशिवाय सारी फौज शत्रूवर घालण्यास सरदार तयार नसत

## मराठ्यांची लढण्याची पद्धत

मराठा म्हटला म्हणजे त्याला बहुधा रणांगणाचें बाळकडूच पाजलेलें असावयाचें पेशवाईच्या वेळीं मराठी फौजेमध्यें पायदळापेक्षा घोडदळाचा भरणा अधिक असे पहिल्यापासून मराठ्याची पद्धत अशी असे कीं, त्याचा पायदळापेक्षा घोडेस्वारातच अधिक उपयोग होई तळ पाडून, खंदक खणून लढण्याची त्याची रीत नव्हती धिमेपणानें लढत बसणें हें त्याच्या गुरूनें त्याना कधीं शिकविलें नव्हतें शत्रू आटोक्यात आला कीं, त्याजवर दौड करून हल्ला चढवावा अगर घाला घालावा व एका हल्ल्याच्या घावात जितके तुकडे पाडता येतील तितके पाडावे पण शत्रू आटोक्यात येण्यासारखा नसेल किंवा आपणाहून अधिक प्रबळ असेल तर त्याजपासून फटकून दूर रहावें, त्याच्या आसपास घिरट्या घालून व त्याची रसद मारून त्याला जरास आणावें असा त्यांचा परिपाठ होता जनरल लेकबरोबर यशवंतराव होळकराचा लढाई चालू असता भरतपूरच्या जाठांनीं त्यास किल्ल्यात येण्यास सागितलें होतें त्या वेळीं यशवंतराव होळकरानें जाठास असें बाणेदार उत्तर पाठविलें होतें कीं, **' किल्ल्याचा आश्रय घेऊन लढणें आमचें ब्रीद नव्हे मराठ्याची गादी घोड्याच्या पाठीवर यासाठीं आम्ही किल्ल्याच्या बाहेर राहून शत्रूस हैराण करू '**

गनिमी काव्याच्या युद्धपद्धतीवरून मराठ्यास गनीम म्हणण्याची सर्व हिंदुस्थानात चाल होती " आम्ही गनीम, आम्ही दुसऱ्याची रसद बंद करावयाची ती उलट आमचीच रसद बंद होऊन आम्हास उपासमार काढावी लागत आहे, " असे पानपतच्या छावणामध्यें भाऊसाहेब पेशव्यांनीं उद्गार काढले होते त यावरूनच गनिमी काव्याच्या लढाईत बहुत वर्षांचा अनुभवी व वाकबगार सरदार मल्हारराव होळकर हा होता याच्या तोडीचा त्या वेळीं मराठ्यामध्यें कोणीहि दुसरा सरदार नव्हता गनिमी काव्यास अबदलीला हैराण करण्याचा त्यानीं दिलेली सल्ला भाऊसाहेबानें धुडकावून लाविली म्हणूनच पानपतमध्यें ' तीन लाख बागडी फुटली '

## मराठ्याचें आपल्या घोड्यावरील प्रेम

मराठ्याना आपल्या घोड्यासबधीं वाटत असलेल्या विलक्षण प्रेमाबद्दल तत्कालीन इंग्रजाना आश्चर्य व कौतुक वाटे घोडा दहा रुपयाचा असो किंवा हजार रुपयाचा असो, त्याचे चाज व शृंगार करण्यात मराठा स्वार गढलेला असे अनुकूलता असेल, तर तो घोड्याच्या गळ्यात पुतळ्याच्या माळा, पायात वाळे व इतर शृंगार घाली लगाम, अनिन जीन, जेरबंद वगैरे याचाही करी पण ज्याची एपत एवढी नसेल तो निदान आवळाच्या केसाच्या वण्या

करून कपाळावर रंगीबेरंगी बटीची गोंडवेणी लोंबत ठेवून बटीची शोभा वाढविण्यास कमी करीत नसे. पण त्याच्या प्रेमाची मर्यादा या बाह्य थाटावरच संपत नसून, तिचा ठाव घेण्यास आपणास या शिलेदाराच्या अंतःकरणात शिरलें पाहिजे. त्याला आपला घोडा जीवापेक्षाहि प्यारा वाटे. त्याची शुश्रूषा करण्यासाठीं एक स्वतंत्र पोरगा स्वारींत प्रत्येक शिलेदार घेत असे. तरी तो त्याच्यावर विसंबून न राहाता त्याला चंदी, वैरण, पाणी, खरारा वेळच्या वेळीं मिळत आहे किंवा नाहीं हें पाहाण्याविषयीं फार दक्षता ठेवी. इतकेंहि करून घोड्यावरून खालीं उतरताच, त्याच्या पुठ्यावर थाप मारून, त्यास गोंजारून, त्याचें सारें अंग मनगटा पासून बोटापर्यंत हातानें जोरजोरानें रगडल्यावाचून व त्याचे पाय मागें व पुढें ओढून साफ मोकळे केल्यावाचून मराठा शिलेदारास चैनच पडत नसे. सारांश, मराठा शिलेदाराचे घोडे तेजस्वी, तयार व चालाक असून धन्याच्या प्रेमळ वर्तनाचा त्यांच्यावर परिणाम झालेला दिसे. तत्कालीन एक इंग्रज गृहस्थ लिहितो, "घोडा बाळगावा मराठ्यानेंच. त्याचें तो जें कौतुक करतो, त्याचें वर्णन करता पुरवत नाहीं. पण येवढें खरें कीं, इंग्रजी सैन्यात घोड्यास रोज चार शेर साडेचार शेर चंदी असून त्यापेक्षा शेर दीडशेर चंदीवर मराठ्याचे घोडे जास्त तयार आहेत!"

## कवायती कंपू

पोर्तुगीज लोकाशीं कोंकणात लढत असता कवायती गार्दीकडे प्रथम चिमाजी आप्पाचें लक्ष गेलें, व वडिलाचा हा गार्दीविषयीं अनुकूल ग्रह त्याचे चिरंजीव सदाशिवराव भाऊ याचे मनात दृढ झाला. ते गार्दीचा विशेष चहाते होते, पण खुद्द त्याच्याच जीवास मुजफ्फरजंग गार्दीकडून अपाय होण्याचा एके वेळीं समय आला होता. पानिपतच्या लढाईंत मराठ्यांच्या सर्वस्वाचा जो नाश झाला त्याचें कारण सदाशिवराव भाऊचे गार्दी व त्याची कवायती पद्धति हेंच सर्वांत जास्त महत्त्वाचें होतें, असा त्या वेळच्या कांहीं मोठ्या लोकाचा ग्रह होता. नारायणराव पेशव्याचा खून गार्दीच्या हातूनच झाला. या गार्दीमुळें व गार्दीच्या परकीयपणामुळें बहुतेक मराठे मुत्सद्दी व सेनानायक कवायती पद्धतीच्या अगदीं मनापासून विरुद्ध होते.

केवळ भितीप्रमाणें आहे. एक शिपाई पडला तर दुसरा त्याच्या जागीं उभा आहेच. मला जें सैन्य हवें तें असेंच पाहिजे." आपले विचार कल्पनासृष्टींतच ठेवण्याची सवय पाटिलबुवास नव्हती. व योग्य संधि मिळाल्याबरोबर त्यांनीं त्यास मूर्तस्वरुप दिलें. सुदैवानें ज्या युरोपियनाची योजना या कामावर करण्यांत आली तोहि अगदीं सामान्य मनुष्य नव्हता. असा दुग्धशर्करेचा योग आल्यामुळें जनरल डिबॉइनची कीर्ति व शिंद्यांची सत्ता थोडक्याच काळांत उत्तर हिंदुस्थानांत अतोनात वाढली.

डिबॉइन हा फ्रान्समधील राहाणारा असून त्यानें नेपोलियन बोनापार्टच्या हाताखालीं कांहीं दिवस काम केलें होतें. यानें शिंद्याकरितां पुष्कळ कवायती कपू तयार केले. या फौजेमध्यें फ्रेंच, इटालियन, डच, जर्मन, इंग्लिश इत्यादि युरोपियन, अमलदार म्हणून नेमले होते. प्रत्येक कपूमध्यें दहा पायदळ पलटणी, पांचशें लोकांची शिबंदीची एक तुकडी, पांचशें तुर्क स्वार व साठ तोफा इतकी तयारी असे. या पल्टणींपैकीं सात पलटणींस तेलंग असें म्हणत असत. त्यांचे पोषाख, हत्यारें वगैरे ईस्ट इंडिया कंपनीच्या शिपायाप्रमाणें असत. बाकीच्या तीन पल्टणीस नजीम म्हणत. त्यांचे पोषाक पर्शियन तऱ्हेचे होते. सर्व पायदळ पलटणींस इंग्रजी तऱ्हेची कवाईत शिकविली जाई व हुकुमाचे शब्दहि इंग्रजींतच असत. शिंद्यानें आग्रा किल्ला आपल्या ताब्यांत घेऊन तेथें सँडरर या स्कॉच इसमाच्या मार्फत आपला हत्यारांचा व दारुगोळ्याचा कारखाना काढला होता.

रजपुतांबरोबर झालेल्या युद्धांत या कवायती सैन्याचा महादजी शिंद्यास फार मोठा उपयोग झाला. या कवायती कपूंतील फौजेस वेळच वेळीं पगार मिळावा म्हणून दिल्ली व मथुरा यांच्या दरम्यानचा बावन्न परगण्यांचा मुलूख कवायती कपूच्या खर्चाकरितां डिबॉइनला देण्यांत आला होता. या परगण्यांचा वसूल तीस लाख रुपये होता. वर दिलेली गार्दीची फौज व कवायती कपू यांजमध्यें पुष्कळ फरक होता. कवायती कपूला जें लढाईचें शिक्षण देत तें पाश्चात्य राष्ट्रांतील युद्धकलेप्रमाणें असे. जनरल डिबॉइनच्या नंतर जनरल पेरन हा या कपूचा मुख्य अधिकारी झाला. परंतु तो नीच वृत्तीचा असल्यानें दौलतराव शिंद्याच्या व इंग्रजाच्या ज्या पुढें लढाया झाल्या त्या वेळीं तो इंग्रजास फितूर झाला, व त्यामुळें कवायती कपूचा नाश झाला.

महादजी शिंद्यानीं कवायती कपू तयार करण्यामध्यें एक मोठी घोडचूक केली ती ही कीं, या कवायती कपूमध्यें एकहि मराठा शिपाई नव्हता किंवा एकहि मराठा सेनानायक नव्हता. या कपूमध्यें उत्तर हिंदुस्थानांतील पुरभय्ये व मेवाती लोक यांचाच मुख्यत: भरणा होता व वरिष्ठ अमलदार हे सुद्धा परकी असल्यामुळें व त्यांनीं ऐन वेळीं दगा दिल्यामुळें, कपूंतील सर्व लोक शिंद्याची नोकरी सोडून इंग्रजास जाऊन मिळाले.

शिंद्याप्रमाणें होळकरानेंहि डोड्हेलियर, डुड्रेन, व्हिनेट व गार्डनर हे युरोपियन अधिकारी आपल्या नोकरीस ठेवून त्यांच्याकडून कवायती कपू तयार करविले. शिंद्याच्या उपसेनापतींनींहि आपल्या हाताखालीं गोरे अधिकारी ठेविले होते. कॅ. बदरफील्ड हा लखबादादाकडे राहिला,

शेफर्ड व बेलासीस हे अंग्रजी इंग्रजांकडे राहिले; आप्पा खंडेराव यानें जॉर्ज टॉमस यास नोकरीस ठेविलें. बुंदेलखंडांत अलि बहादरनें व वऱ्हाडांत रघुजी भोसल्यानें हाच क्रम स्वीकारला. दुसऱ्या बाजीराव पेशव्यानें मेजर टोन व मेजर बॉइन यांस नोकरीस ठेवून आपल्याच पदरच्या सरदारांचें अनुकरण केलें होतें.

परकी लोकांचा तोफखाना, परकी लोकांचें पायदळ व बडेबडे परकी अंमलदार चाकरीस ठेवून त्यांच्या भरावर राज्याचा बचाव करण्याची आशा मराठ्यांनीं धरली ही मोठी चूक झाली. हाच पैका त्यांनीं देशी पायदळावर खर्च करून व त्यावर देशी अंमलदार नेमून तें पायदळ उजगारीला आणलें असतें तर त्याचा फारच उपयोग झाला असता.

आपली गनिमी काव्याची युद्धपद्धति टाकून देऊन मराठ्यांनीं कवायतीपद्धति स्वीकारली ही गोष्ट त्यांच्या फायद्याची झाली नाहीं असें पुष्कळ लोकांचें म्हणणें आहे. "मराठ्यांच्या खालचा घोडा ज्या दिवशीं निघून गेला त्या दिवशीं त्यांचें राज्य गेलें," असें एकानें म्हटलें आहे. दौलतराव शिंदे व त्यांचा सरदार गोपाळराव यांच्या दरम्यान भर दरबारांत पुढीलप्रमाणें संवाद झाल्याचें सांगतात. गोपाळराव हा एक जुन्या पद्धतीचा सेनापति होता. तो म्हणाला, "तुमच्या वाडवडिलांनीं राज्य मिळविलें त्यांचें घर घोडयाच्या खोगिरावर होतें; तेथून उडून तें तंबूंत जाऊन बसलें! आतां तर तुम्ही शिपायांना मातीच्या बराकी बांधून देऊं लागला. पण सांभाळा, पुढें सर्वांचीच माती होईल." दौलतराव म्हणाला, "माझीं पलटणें व तोफा आहेत तोंवर मी कोणासच भीत नाहीं." त्यावर गोपाळराव म्हणाला, "पण या तोफाच शेवटीं तुमचा घात करतील." पार्लमेंटमध्येंहि सर फिलिप फ्रॅन्सिस यानें एकदां असें उघड बोलून दाखविलें कीं, "मराठे कवायत शिकूं लागले व तोफा ओतूं लागले, पण त्यांतच त्यांचा नाश आहे. त्यांनीं आपली लढाईची स्वदेशी पद्धति सोडली व परदेशी पद्धति तर कोणासच मानवत नाहीं. आम्हांपुढें भिण्याचें त्यांना कांहींच कारण नाहीं." ड्यूक ऑफ वेलिंग्टनचेंहि मत असेंच होतें. एका दृष्टीनें हें म्हणणें खरेंहि दिसतें. इंग्रजांनीं दौलतराव शिंद्याच्या कवायती कंपूचा पुरा नाश अवघ्या एका वर्षांत केला; पण बेशिस्त भुरट्या पेंढाऱ्यांना वठणीला आणण्याला मात्र त्यांना सात आठ वर्षें लागलीं. मोगलांविरुद्ध मराठ्यांना गनिमी काव्यानें यश आलें, पण इंग्रजांविरुद्धहि तें साधन सदासर्वदा उपयोगी पडलेंच असतें असें म्हणवत नाहीं. छापे घालणें किंवा दौड करून जाणें हा युद्धकलेपैकीं एक भाग झाला; पण तेवढ्यानें कार्यभाग होऊं शकणार नाहीं. शिवाय गनिमी काव्याच्या लढाईत आश्रयस्थानें म्हणून किल्ल्यांचा जो उपयोग होत असे, तो होणें इंग्रजांच्या तोफांमुळें पुढें पुढें अशक्यच झालें होतें. अर्थात शत्रूचीं युद्धसाधनें आपलींशीं करून घेतल्याशिवाय मराठ्यांना यश मिळणें शक्य नव्हतें. महादजी शिंद्यांनीं कवायती पद्धतीचें सत्य ओळखिलें होतें; परंतु तें सत्य पूर्ण नव्हतें, अर्धें होतें; व त्यामुळेंच त्यांनीं उभारलेली इमारत ऐन वेळीं खचली. कांहीं दिवसांची फुरसत मिळती तर कदाचित् मराठ्यांनीं उत्तम कवायती राष्ट्रीय सैन्य तयार केलें असतें. परंतु दैवी इच्छा निराळी होती, आणि रणजितसिंगानें भविष्य केल्याप्रमाणें लवकरच "हें सर्व लाल होणार" झालें.

# मराठ्यांचे माळव्यांतील दोन प्रबळ शत्रू

[ लेखक—चिंतामण बळवंत लेले, बी. ए., धार ]

१८ मे सन १७२४ त बाजीराव व निजाम यांची नालछे येथें भेट झाली. या वेळीं बाजीराव माळव्यात मोहिमेकरिताच आले होते. याच वेळस हैदराबादचा सुभेदार मुब्रीजखान ( मुबारिझखान ) यास निजामास दक्षिणेंत न येऊं दण्याची ताकीद बादशहाकडून दिली गेली होती. मोठ्या फौजेनिशीं तो निजामाशीं तोंड देण्यास तयार झाला निजामाच्या छातींत धडकी भरली. त्यानें तहाचें गाल्हणें सुरू केले. पण सर्व प्रयत्न निष्फळ ठरल्यावर निजामानें पेशव्याची मदत घेऊन २ आक्टोबर, १७२४ रोजीं साखरखेडें येथें मुब्रीजखानाचा पूर्ण पराभव केला. निजामाचें वाढतें वर्चस्व पाहून बादशहाने अजिमुल्लाखाकडून माळव्याची सुभेदारी काढून घेऊन अलाहाबाद यथील गिरधर बहादर या नागर ब्राह्मणाकडे माळव्याची सुभेदारी दिली ( २ जून, १७२५ ). यानंतर निजाम दक्षिणेंत उतरला व पुन. बाजीरावाविरुद्ध त्यानें आपलीं कारस्थानें पूर्ववत् चालू ठेविलीं याच वेळीं देशस्थ–कोंकणस्थ वाद दक्षिणेंत उद्भवला होता. ही वेळ साधून निजामानें श्रीपतराव प्रतिनिधिला बाजीरावाविरुद्ध प्रवृत्त केलें व कोल्हापूरच्या संभाजीला शाहूमहाराजांविरुद्ध फूस दिली " दक्षिण सहा सुभ्याची चौथें व सरदेशमुखी वसुलीची रक्कम, शाहू व संभाजी यांच्या वाट्याबद्दल निर्णय होईपावेतों अनामत ठेवण्यात येईल–वारसाचा निकाल होण्यापूर्वीच शाहूमहाराजाना आम्ही का रकम दऊं ?" असा साफ रोकडा जबाब त्याने बाजीरावास दिला. त्यामुळें बाजीरावाला संताप येऊन त्याने लढाई करण्याबद्दल शाहूमहाराजाची अनुमति मिळविली. ता. २७ ऑगस्ट, १७२७ रोजीं बाजीराव सातान्याहून स्वारीला निघाला निजामाला रेटीत तो पुण्यास आला व तेथे दसरा करून मोठ्या फौजेसह त्यानें निजामावर चढाई आरंभिली तत्पूर्वींच उदाजीराव पवारास ३ डिसेंबर, १७२२ त सनद देऊन बाजीरावानें माळवा व गुजराथ येथील निम मोकासा त्यास सोंपवून दिला होता. त्यात " आमची इमारत सर्व तुम्हावरच आहे यविषयीं आपले समाधान असो दणें " असा उल्लेख केला आहे. माळव्यात मराठ्यांच्या आक्रमणात उदाजीराव पवाराचें प्रमुख अग होतें. बाजीरावाचा मुक्काम गुजराथेंत पाणोथा येथें असताना त्यानें आनंदराव पवार यास पत्र पाहताच येण्यास सांगून उदाजीराव पवार न आल्याबद्दल विस्मय प्रदर्शित केला आहे. " अनमान कराल तर आमची आण असे " इतक्या कळकळीच्या उद्गारात पवार बंधूंविषयीं बाजीरावाचे मनात वसत असलेला आत्मविश्वास दृग्गोचर होतो. या वेळीं आनंदराव पवार व उदाजीराव गुजराथेंतच बाजीरावानें सोंपविलेल्या कामगिरीवर असावेत. पुष्कळ ठिकाणीं झुलवीत

आणि चुकवीत बाजीरावानें निजामाची अगदीं दाणादाण केली. बऱ्हाणपूरला सैन्याची रवानगी करण्यात निजामाची फटफजिती झाल्यामुळे त्यानें पुण्यावर चाल केली. परंतु बाजीरावानें गोदावरीच्या पूर्व तीरावरील निजामाचे वैजापूर व गाडापूर हे परगणे उध्वस्त केले. (म. रि., म. वि., भाग १, पृ. १९६) आणि ठिकठिकाणीं लहान लहान चकमकी करीत, दाणापाणी नाहीं अशा पालखेड नजीक घनदाट जंगलात निजामास रेटलें. शेवटीं २५ फेब्रुवारी, १७२८ त गुढी पाडव्याचे दिवशीं निजाम-पेशवे यांचें युद्ध होऊन निजामाचा संपूर्ण पराभव झाला (पे. द., पृ. ५६). जेरीस येऊन निजामानें तहाचें बोलणें सुरू केलें. ६ मार्चला मुंगी शेवगावचा तह ठरला. सहा सुभ्यातील वसुली करण्याकरिता बाजीरावाच्या कारकुनाना हरकत नसावी व त्या करिता कांहीं किल्लेहि निजामाकडून मिळावे अशा अटी होत्या. बाजीरावानें संभाजी (कोल्हापूरकर) यास तावीन म्हणून मागितले होते. पण निजामास ते पटलें नाहीं. यापूर्वीच छत्रपति संभाजी पन्हाळगडावर गेला होता. हा तह झाल्यावर शाहूनें कित्येक वेळा निजामाच्या वाटेस न जाण्याकरिता आपल्या सरदाराना ताकीद दिली होती.

यानंतर बाजीराव दक्षिणेंत गेला. माळव्यांत मराठ्यांच्या वतीनें उदाजी पवार, अंबाजीपंत पुरंदरे हे खंडवसुली करीत होते. परंतु माळव्याचा बादशाही सुभेदार राजा गिरधर बहादर व त्याचा पुतण्या दया बहादर याचा या कामात नेहमीं अडथळा होत असे. अंबाजीपंतानें गुजराथेंतून खंडवसुली केली. गुजराथचा सुभेदार सरबुलंदखान याच्याशीं पेशव्याचा तह झाल्यामुळे त्याचे कामात कांहींच व्यत्यय आला नाहीं. केशो महादेवानें राजा गिरधर बहादर अडथळा करतो म्हणून कळविलें होतें. शाहूमहाराजानींहि गिरधर बहादरला तसें न करण्याबद्दल ता. ४ मार्च, १७२६ ला पत्र लिहिलें होतें (पे. द., भाग १३, प. ५), परंतु त्यानें शाहूच्या पत्राकडे कानाडोळा करून दया बहादराच्या चढाईलाच प्रोत्साहन दिलें. पालखेडच्या लढाईनंतर मात्र मराठ्यांचें लक्ष माळव्याकडे वेधलें गेलें. मुंगी शेवगावच्या तहानें पुष्कळशा गोष्टींचा निर्णय झाला. निजामाला वेसण घातली गेली. प्रतिनिधीला नमतें घ्यावें लागलें. चंद्रसेन जाधवाची निराशा झाली व संभाजी व शाहू यात एकी झाली. पालखेडच्या लढाईत हताश झालेला निजाम दोन तीन वर्षें तरी डोकें वर करूं शकला नाहीं. तत्पूर्वीच इ. स. १७२६ त शाहूमहाराजानीं उदाजीराव पवाराशीं माळवा गुजराथ येथील चौथाईसंबंधीं एक नवीन तह करून घेतला. त्याप्रमाणें माळवा व गुजराथ येथील सरदाराना ताकीद पत्रें पाठविलीं गेलीं. त्यापैकीं सरबुलंदखान, राजा गिरधर बहादर, उमरखान, महम्मदयारखां, तेगबेगखां याना जीं गौरवयुक्त पत्रें पाठविण्यांत आलीं (तीं धार दरबारचे दप्तरांत उपलब्ध आहेत) त्या योगानें उदाजीराव पवाराना माळवा व गुजराथ येथील वसुलीचा मार्ग मोकळा करण्यात आला. गुजराथेंत सरबुलंदखानाशीं मैत्रीचा तह झाल्यामुळे वसुलीला अडथळा झाला नाहीं. पण माळव्यात मात्र पहिल्यापासून मुसलमान अधिकाऱ्यांचा विरोध होऊ लागला. बाकानेर आणि मांडव यांच्या कांहीं भागापर्यंत मराठ्यांचें आक्रमण झालें होतें. पण दया बहादरास संताजी भोसले मिळाल्यामुळें अधिक उत्तरेकडे जाणें मराठ्याना धोक्याचें वाटलें. त्या वेळेस फक्त मांडव

येथून चौथ वसूली झाली (*Malwa in Transition*, p. 161, पे. द., भाग १३, पृ. १३) सुरवातीला मराठी फौजेच्या तीन टोळ्या माळव्यात आ ल्या. परंतु दया बहादरानें त्याना सर्व बाजूंनी घेरून वसुलीला अडथळा केला. इतकेंच नव्हे तर केसो महादेवाच्या आधिपत्याखालीं असणाऱ्या सैन्याला नजरकैदेंतच ठेवलें. मुसलमानी फौजाच्या कचाट्यातून निसटणें मराठ्याना अवघड जाई. दादो भीमदेवानें दिल्लीहून बाजीरावास व चिमाजी अप्पास जयसिंगाची हार्दिक इच्छा –" तुमची फौज माळवियात जल्दीनें यतें. तरी पादशा तुमचे जे मतालब आहेती तें सर्वहि करून देतों. फौज माळव्यात येऊन धामधूम करी ते गोष्ट केली पाहिजे, फौज माळव्यात येतें अगत्य केलें पाहिजे "– कळविली आहे (पे. द., भाग १३, पृ. १०). संताजी भोसले दया बहादराशीं मिळाला होता. त्याच्याशीं पेशव्यानीं सगनमत करून चिमाजी अप्पाच्या मदतीने स्वारीची तयारी केली व इ. स. १७२८ त फौजेचा गाहा करून मल्हारजी होळकर व उदाजी पवार याच्यासह माळव्याच्या स्वारीस सुरवात केली.

ता. २४ नोव्हेंबर, १७२८ रोजीं मराठे नर्मदेच्या दक्षिण तीरावर राजापूर येथून दुसरेच दिवशीं नर्मदोत्तर धरमपुरीजवळ आले. या वेळीं राजा गिरधर बहादर व दया बहादर याचा तळ आमझेरें मुक्कामीं होता. गिरधर बहादरानें दयाबहादराम बाकानेरच्या तोंडाशींच ताफखाना सज्ज ठेवण्यास कळविलें होतें. कारण मराठ्याची फौज बाकानेर मनावर मार्गे येणार असा अगाऊच सुगावा त्याला लागला असावा. मुसलमानी फौजेची हालचाल सावध मराठ्याना तातडतोब कळली आणि त्याप्रमाणें त्यानीं मांडवच्या घाटाचा अवलंब केला. ता. २७–२८ या दोन दिवशीं चिमाजी अप्पानें नालछास जो मुक्काम केला तो का केला हें कळत नाहीं. कदाचित् मुसलमानी सैन्याचा रोख अजमावण्यासाठीं पूर्व बातमी काढण्याकरिताच हा असेल. शवटीं गिरधर बहादर व दया बहादर हे एका ठिकाणीं नाहींत अशी पक्की खात्री झाल्यावर मराठ्याचें सैन्य नालछाहून आमझऱ्याच्या रोखानें पुढें सरसावलें. ता. २९ नोव्हेंबर रोजीं आमझऱ्याच्या जवळ येऊन घडक्यावर चिमाजी अप्पानें गिरधर बहादरावर अचानक छापा घातला. ही लढाई किती तास चालली होती याबद्दल अजून सबळ पुरावा मिळाला नाहीं. जो आहे तो सरलष्कर सोमवशींचे चिमाजी अप्पास पत्र. त्यात दया बहादराशीं दोन प्रहर युद्ध झालें व त्यात तो पडला असा निर्देश आहे (पे. द., भाग १३, पृ. २५).

आता गिरधर बहादर व दया बहादर याच्या मृत्युदिनाविषयीं इतिहाससंशोधकात जो वाद आहे त्याची तोंडमिळवणी करण्याचा प्रयत्न सितामहूचे युवराज डॉ. रघुवीरसिंह यानीं केला आहे. परंतु पेशवे दप्तरातील उपलब्ध साधनावरून जरी विधान करावयाचे म्हटलें तरी डॉक्टराच्या प्रतिपादनाप्रमाणें गिरधर बहादर व दया बहादर हे एकाच दिवशीं एकाच लढाईत मारले गेले असें वाटत नाहीं. अधिकृत पुराव्याची मदत घेऊन मराठ्याच्या या दोन प्रतिस्पर्ध्यांची मृत्युतारीख ठरविण्याचा प्रयत्न आम्ही यथामति पुढें करतों.

प्रथमत हें सागणें जरूर आहे कीं, श्री. सरदेसाई यानीं आपल्या मराठी रियासतींत राजा गिरधर बहादर हा सारंगपूरच्या लढाईत इ. स. १७२६ त मारला गेला असें दाखविणारी

जीं सहा सात भालेरावी पत्रें ( म. रि., मध्य वि. १, पृ. ३२४ ते ३२९ ) समाविष्ट केलीं आहेत, तीं अस्सल नाहींत असें नदलाल मडलोई याचे वंशज रावराजा छत्रकर्ण यांचेकडून ठाम समजलें आहे (भा. इ. सं. मं., त्रै., वर्ष १०, अंक २ रा, पृ. ४०). आता ही गोष्ट खरी आहे कीं, इ. स. १७२६ सालीं मराठयांनीं सारंगपूर परगण्यांतून १५००० रुपये वसूल केले ( पेशव्यांची बखर पृ. ३७, Malcolm ). तरी पण सारंगपूरच्या लढाईचा ऊहापोह निरर्थक आहे हें वरील पत्राच्या असत्यतेवरून स्पष्टच होत आहे. किंबहुना २९ नोव्हेंबर, १७२८ पावेतों तो माळव्याच्या सुभेदारीवर होता हें सिद्ध झाल्यावर आता अधिक पुराव्याची अपेक्षाच उरत नाहीं. वस्तुत हीं बनावटी पत्रें मागाहून तयार करण्याचें प्रयोजन काय, एतद्विषयीं कार्यकारणभाव समजत नाहीं.

यानंतर पेशवा दप्तराच्या १३ व्या भागात जीं अस्सल पत्रें छापलीं आहेत, त्यावरून एकंदर समरप्रसंगाविषयीं व तदनुषंगिक मराठयांच्या हालचालींसंबंधीं ठळक गोष्टी निश्चयात्मक अनुमानिता येतात त्यांचा विचार करूं.

ता. २९ नोव्हेंबर, १७२८ रोजीं लढाई झाल्यावर सरासरी २ डिसेंबरपर्यंत चिमाजी अप्पाचा मुक्काम आमझेरे येथेच होता ( पे. द. २२, पृ. ५ ). लढाईचें इतिवृत्त त्यानें बाजीरावास दुसरेच दिवशीं लिहिलें. हें पत्र पोहचण्यापूर्वीच पेशव्याकडून चिमाजी अप्पास ता. ८ डिसेंबर, १७२८ रोजीं पत्र गेलें तें चिमाजी अप्पास उज्जैन जवळ त्याच महिन्याच्या बारा तारखेस पोहचलें. बाजीरावाचें हेंच एक पत्र चिमाजीस लवकर मिळालेलें दिसतें. त्यात बाजीरावानें "सांप्रत आजीच वर्तमान आलें कीं, तुमचे व गिरधर बहादर याचें युद्ध जाहालें. गिरधर बहादर याजकडील कितेक सरदार व लोक मारून गिरधर बहादर बुडविला.... . येसियासी ये गोष्टीचे तत्वता वर्तमान काय आहे ते सविस्तर लिहून पाठविणें" (पे. द., भाग १३, प. १५ ). यावरून बाजीराव यास चिमाजीचें पत्र ता. ८ ते २७ डिसेंबरच्या संधिकालात मिळालें असलें पाहिजे. कारण ता. २७-१२-१७२८ रोजीं पेशव्यानें मुक्काम वासीम येथून चिमाजीस जें पत्र लिहिलें, त्यात आमझेऱ्याच्या पत्राची पोहोंच दिली आहे. यात "गिरधर बहादर याचे युधीं" हे शब्द पुढील विचारसरणीस पुष्टिकारक असल्यामुळें महत्त्वाचे आहेत. गिरधर बहादराशीं झालेल्या युद्धात उदाजी पवारानें केलेला पराक्रम चिमाजीनें "राजश्री उदाजी पवार याणी व हुजूरच्या पथकानी कस्त मेहनत बहुत केली" म्हणून स्पष्ट शब्दात व्यक्त केला आहे. यानंतर बाजीरावानें चिमाजीस ता. ४-१-१७२९ रोजीं पत्र पाठविलें आहे (पे. द., भाग १३, प. २९). ह्या चिमाजीनें पाठविलेल्या ३० नोव्हेंबरच्या व २० डिसेंबरच्या पत्राची पोच लिहिली आहे. या पत्रात लिहिलेला गिरधर बहादराचा उल्लेख पेशव्याच हातून नजरचुकीनें केला गेला आहे असें वाटतें. कारण ता. २० डिसेंबर रोजीं उज्जैनहून पाठविलेल्या पत्रातील दिपग दया बहादर उटिला. हे पत्रेची खबर घेऊन राजश्री आप्पा कडून जासूद आले. त्यास रुपये ४८" असें आहे (पे. द., भाग ३०, पृ. २८७). या नोंदीचा कार्यकारणभाव सिद्ध करावयास हवा. ही पैवस्तीची तारीख नसून मूळ चिमाजीनें पत्र

लिहिलेल्या दिवसाची तारीख आहे असें पेशव्याकडून आलेल्या ता. ४ व ९-१-१७२९ अशा दोन पत्रावरून नक्की वाटतें. ही पोंहचण्याची तारीख म्हणावी तर ३० नोव्हेंबरचें आमंत्रण्याचें चिमाजीचें पत्र बाजीरावास ९ ते २७ डिसेंबरच्या दरम्यान मिळाल्यावर हें पत्र केव्हा पाठविलें असावें, याबद्दल कोडेंच उत्पन्न होते आणि तें सोडविणें साधन-ग्रंथावरून शक्य दिसत नाहीं. हें दुसरें पत्र पेशव्यानें चिमाजीस गिरमडगाऊ, प्रांत वऱ्हाडहून पाठविलें आहे. त्यांतहि २०-१२ १७२८ च्या पत्राची ( २९ जमादिलावलची ) नोंद आहे. पण चूक असलेल्या मजकुराची मात्र पुनरावृत्ति केलेली नाहीं (पे. द , भाग १३, प. ३३) तेव्हा ता. २९ नोव्हेंबर १७२८ रोजीं मराठ्याच्या फौजेची गिरधर बहादराशीं लढाई होऊन त्यांत तो मारला गेला, हें उघड दिसत आहे. परंतु वरील २० डिसेंबर, १७२८ च्या चिमाजी अप्पाच्या पत्रावरून व १७२९ च्या जानेवारींतील मल्हार दादाजी, दावलजी सोमवशी, पिलाजी जाधव, अताजी गणेश, बापूजी श्रीपत, मडोजी, धोंडाजी महादेव व [ पुढें एप्रिल महिन्यात ] चिमणाजी दामोदर इत्यादिकांच्या पत्रावरून राजा गिरधर बहादराच्या पाडावानंतर मराठ्यांना दया बहादराशीं पुन. लढावें लागलें असें अनुमान करावेंच लागते ( पे. द., भाग १३, प. २५-२६ २७-२८-३१-३२-३५ ३७ ३८-४६). कारण दया बहादराच्या मृत्यूबद्दल उज्जैनहून *चिमाजीनें जसें पेशव्यास कळविलें तद्वतच वरील लोकांस कळविलें असलेंच पाहिजे.* यावरूनच वरील पत्राद्वारें सर्वांनीं चिमाजी अप्पाचें अभिनंदन केलें आहे. मल्हार दादाजी लिहितो, " प्रथम स्वारीस स्वामी गेले. वडिलाचें आशिर्वादें व महाराज स्वामींचे प्रतापें थोर येश पदरीं पडले. कीर्ति घोष दिगती झाला. " दावलजी सोमवशी सर लष्कर यास " सतोषाच्या कोटी " झाल्या. पिलाजी जाधवानें " श्रीनें थोर येश दिल्हे " म्हणून समाधान प्रगट केलें ( दिघेकृत मराठ्याच्या उत्तरेंतील मोहिमा, पृ. ११ ). इतकेंच नव्हे तर कृष्णराव महादेव चासकरानें सुद्धा दया बहादरासंबधींच उल्लेख केला आहे ( पे. द., भाग १३, प. १७ ). याशिवाय चिमाजी अप्पानें १७२८ च्या डिसेंबरात सातान्यास दादोबास ( मल्हार तुकदेव ) दया बहादराचा पाडाव होऊन त्याजकडील १८ हत्ती हस्तगत झाले आहेत, असें शाहू महाराजास कळविण्यास लिहिलें आहे ( पे. द., भाग ३०, पृ ४१ ). स्वत शाहूमहाराजांनीं गिरधर बहादर यास पूर्वी वसुलीच्या कामात अडथळा करू नये म्हणून पत्र पाठविलें असताना माळव्याच्या सुभेदाराच्या मृत्यूबद्दल शाहूमहाराजाना कांहींच गधवार्ता मिळू नये हें आश्चर्य नव्हे काय ? उलट दया बहादरासंबधीं मात्र शाहूकडे बातमी जावी याचा राजकारणाच्या दृष्टीनें कांहींच उलगडा होत नाहीं. शाहूच्या सरदाराना दया बहादराबद्दल महत्त्व वाटत असेल. पण महाराजाना गिरधर बहादराच्या पाडावानें वृत्त कळविणें चिमाजीला व बाजीरावाला क्रमप्राप्त नव्हतें का ? यानंतर शाहूमहाराजांनीं पावसाळा जवळ आल्यामुळें पुढील कार्यासंबधीं मसलत करण्याकरिता सातान्यास चिमाजी अप्पाला खानदेशातून फौजेसह येण्यास कळविलें होतें. बरोबर उदाजी पवार यासहि घेऊन येण्याकरिता त्यात लिहिलें होतें (शा. म. रो., पृ. ४८, पे. द., भाग १३, पृ. १४ ता. १२-४ १७२९ ) यानंतर चिमाजी अप्पा मे महिन्यांत पुण्यास येऊन दाखल झाला ( ब्र. स्वा. च. ले. ४३ ).

तेव्हा एकंदर अस्सल पत्रव्यवहारावरून असें अनुमानानें भाग पडतें कीं, मराठ्यांच्या फौजेनें माडव घाटाचा अवलंब केल्यावर ती आमझऱ्याच्या नजीक पोहचते न पोंहचते तोंच शाजनेर वा मनावराच्या आसपास मुसज्ज असणाऱ्या दया बहादराला मराठे आमझऱ्यास पोंहचल्याचा सुगावा लागला असावा. तावडतोब त्यानें सैन्यास आमझऱ्याकडे कूच करण्यास हुकूम केला. उपलब्ध साधनावरून चिमाजी अप्पाची गिरधर बहादराशीं लढाई झाल्यावर दया बहादर फौजेसह येऊन ठेपला व त्यानें तावडतोब " बहमियानें " मराठी सैन्यावर हल्ला केला असला पाहिजे. मराठे काहीं बेसावध नव्हतेच ! कारण दया बहादर आपल्यावर लौकरच चालून येणार याची त्यांना पूर्ण जाणीव होती. आमझऱ्याला पोंहचताच त्याला गिरधर बहादराच्या मृत्यूचें कटु सत्य कळलें व बचाव काढण्याकरिता त्वेषानें नुकत्याच निघालेल्या मराठी सैन्यावर त्यानें निकराचा हल्ला केला. आमझऱ्याच्या जवळ वा आहू व आमझेरें यांचे दरम्यान ता. २ वा ३ डिसेंबर, १७२८ रोजीं उभयतांचें घनघोर युद्ध सुरूं झालें. दावलजी सोमवशी सरलष्कर यानें आपल्या पत्रांत चिमाजी अप्पाच्या पत्रांतील "दया बहादर फौजेनिशीं बहमियानें चालोन आले, त्याचे व आमचे फौजेचें दोन प्रहर युद्ध जाहलें. दया बहादर ठार पडले," वगैरे जो मजकूर समाविष्ट केला आहे तो या दुसऱ्या लढाईच्या यथार्थतेला पुष्टिकारकच आहे. गिरधर बहादरानंतर लागोपाठ दया बहादराशीं झालेलें हें दुसरें युद्ध सहा तास झालेलें आहे, हें कोण नाकबूल करील ? तेव्हां अधिक सबळ पुराव्याचे अभावीं एकाच दिवशीं अर्थात २९-११-१७२८ रोजीं हे दोघेहि काका पुतणे पडले हें अनुमानानें किंवा ठाम विधान करणें धाष्टर्याचें आहे.

आता शकावलींत गिरधर बहादर यास उदाजी पवार व चिमणाजी दामोदर यांनी युद्धात मारला हें कोणत्या आधारावर लिहिलें आहे समजत नाहीं ( पे. श., पृ. ५६ ). ही लढाई १७२८ च्या सुरवातीला झाली असावी म्हणून श्री. वि. गो. दिघे यांनीं अनुमान केलें आहे तें सयुक्तिक दिसत नाहीं. कारण गिरधर बहादराशीं झालेल्या युद्धांत हजर असलेला चिमणाजी दामोदर दया बहादराच्या मृत्यूबद्दल चिमाजी अप्पास बहादुरपुऱ्याहून लिहितो असा, हेंच समजत नाहीं. प्रचलित साधनावरून चिमणाजी दामोदर हा या वेळीं माळव्याच्या स्वारींतच दिसत नाहीं. तेव्हां वरील लढाईच्या सत्यतेबद्दल साशकच राहावें लागतें. याशिवाय चिंतामणराव पवार कैफियतींत व मावजीकृत कैफियतींत जगदेवराव पवाराने हत्तीवरून दया बहादराचें शिर उडविलें, असें म्हटलें आहे याबद्दल तर अजून विश्वसनीय पुरावा नाहीं.

तेव्हां अधिक ऐतिहासिक सबळ पुराव्याची वाट पाहून माळव्यातील मराठ्यांच्या या दोन प्रबल शत्रूंचा अतकाल वरील उपलब्ध साधनावरून जो निदर्शनास येतो त्यावरच तूर्त विसबून राहावें लागतें.

# रामटेक येथील
# रामदेवराव यादवाच्या काळचा शिलालेख

[ लेखक-प्रो. वा. वि. मिराशी, एम्. ए. व श्री. ल. रा. कुळकर्णी, एम्. ए. ]

रामटेक हें नागपूर जिल्ह्यातील रामटेक तहसिलीचें मुख्य गांव असून नागपूरच्या उत्तरेस २८ मैलांवर वसलें आहे. गावाला लागूनच असलेल्या टेकडीवर श्रीरामचंद्राचें पुरातन देवालय असल्यानें या गावाला रामटेक हें नाव पडलें आहे. गावात व टेकडीवर अनेक तीर्थें व देवालयें असल्यानें त्याची क्षेत्रस्थान म्हणून फार प्रसिद्धी आहे. कार्तिक महिन्यात येथे मोठी यात्रा भरते, त्या वेळीं आजूबाजूच्याच नव्हे तर दूरदूरच्या प्रदेशातून हजारों लोक देवदर्शनास येतात.

तीर्थस्थान म्हणून रामटेकची ख्याति आज निदान दीड हजार वर्षांइतकी जुनी आहे. **गुप्त** वंशातील प्रख्यात राजा द्वितीय **चंद्रगुप्त विक्रमादित्य** याची मुलगी **प्रभावती गुप्ता** ही विदर्भाच्या **वाकाटक** वंशातील द्वितीय **रुद्रसेन** नामक राजास दिली होती. लग्नानंतर थोड्याच काळानें तिचा पति वारल्यामुळें ती आपल्या मुलाच्या नावानें राज्यकारभार पाहू लागली. वऱ्हाडातील **ऋद्धपूर** येथें सापडलेला तिचा ताम्रपट प्रसिद्ध आहे.§ हा ताम्रपट तिनें **'रामगिरिस्वामिनः पादमूलात्'** म्हणजे रामगिरीवरील श्रीरामचंद्राच्या पादुकाजवळून कार्तिक शुद्ध द्वादशीस दिला होता. प्राचीन कोरीव लेखात पादमूल या शब्दाचा प्रयोग पादुका अशा होता. सध्या सामान्यतः श्रीदत्तात्रयाचीच पादुकारूपानें पूजा होते. पण प्राचीन काळीं इतर हिंदु देवतांचीहि पादुकारूपाने पूजा होत असे. वर उल्लेखिलेल्या प्रभावती गुप्तेचा मुलगा द्वितीय **प्रवरसेन** याच्या वेळचा एक ताम्रपट मध्यप्रांतातील बैतूल जिल्ह्यातील **पट्टन** या गावीं दोन वर्षांपूर्वी सापडला होता,† त्यातहि महापुरुषाच्या म्हणजे विष्णूच्या पादुकाच्या देवालयातील अन्नछत्राकरिता काहीं जमीन दान दिल्याचा निर्देश आहे. इतर ठिकाणींहि विष्णूच्या पादुकांचा उल्लेख आढळतो. कविकुलगुरु कालिदास याच्या मेघदूतातील ( श्लो. १२ ) यक्ष रामगिरीवरच काही काळ राहात होता. त्यानें मेघाला अलकेच्या मार्ग सांगण्यापूर्वी रामगिरीचा **'वन्द्यैः पुंसां रघुपतिपदैरङ्कितं मेखलासु'** ( मनुष्यांना वंद्य अशीं श्रीरामचंद्राचीं पदें ज्यावर उमटलीं आहेत ) असा निर्देश केला आहे. त्यावरूनहि कालिदासाच्या काळींहि रामगिरीवरील देवालयात श्रीरामचंद्राची पादुकारूपानें पूजा होत असे

§ भारत इतिहास संशोधक मंडळाचें त्रैमासिक पुस्तक २, पृ. ८९ पहा.

† या ताम्रपटावरील लेख लौकरच एपिग्राफिया इंडिकात प्रसिद्ध होईल.

असें स्पष्ट दिसतें.§ यानंतर कांहीं काळानें तेथें राम व सीता यांच्या मूर्ती बसविण्यांत आल्या व लक्ष्मणाचेंहि देऊळ बांधण्यात आलें असें दिसतें S म्हणून सध्या रामटेकावर श्रीरामचंद्राचें देऊळ मागें व लक्ष्मणाचें पुढें असें दिसतें सध्याच्या मूर्ति रामटेकास दुधाळा नामक तळ्यांत सापडल्या व पूर्वीच्या मूर्ति भग्न झाल्यामुळें त्यांनी त्यांच्या जागीं स्थापना करण्यात आली असें समजतें %

प्रभावती गुप्तेचा ताम्रपट कार्तिक शुद्ध द्वादशीस दिला होता. त्यावरून तिनें आदल्या दिवशीं प्रबोधिनी एकादशीस उपोषण करून दुसऱ्या दिवशीं द्वादशीस पारणें सोडताना या ताम्रपटात उल्लेखिलेला गांव एका ब्राह्मणास दान दिला होता असे दिसते प्रभावती गुप्तेचा पुण्यास सापडलेला दुसरा ताम्रपट@ **नंदिवर्धन** गांवाहून दिला आहे. तें नंदिवर्धन रामटेक जवळ नंदर्धन किंवा नागर्धन या नावानें प्रसिद्ध आहे व रामटेकमाहात्म्यातहि नंदिवर्धन गावातील तीर्थांचा उल्लेख आढळतो £ उपरिनिर्दिष्ट ताम्रपट हाच वाकाटकांचा सर्वांत प्राचीन ताम्रपट असल्यानें त्यांत निर्दिष्ट केलेलें नंदिवर्धन हें गांव त्या वेळीं वाकाटकांची राजधानी असावी असा कांहीं संशोधकांचा तर्क आहे. तसें असल्यास प्रभावती गुप्तेच्या काळीं म्हणजे इ. स. च्या चौथ्या शतकाच्या अखेरीस रामटेकला राजधानीच्या सान्निध्यामुळें फार महत्त्व आलें असावें कालिदास विदर्भांत असतांना रामटेकास अनेकदा गेला असावा व टेकडीवरून आसपासचा देखावा पहात असता मेघदूताचें कथानक त्यास सुचलें असावें असा तर्क करण्यास हरकत नाहीं.¶

यानंतरचा रामटेकचा उल्लेख महानुभावांच्या स्थानपोथींत महानुभाव प्रथमस्थापक **श्रीचक्रधर** हे रामटेकास गेले त्या वेळच्या वर्णनांत आढळतो. श्रीचक्रधर हे रामदेवराव यादवांच्या काळीं होऊन गेले व पुढें सिद्ध केल्याप्रमाणें प्रस्तुत शिलालेखहि यादवकालीनच आहे स्थानपोथी ही श्रीचक्रधरांच्या काळींच लिहिलेली नसली तरी तींत आलेलें स्थळवर्णन श्रीचक्रधरांच्या काळापासून आलेल्या परंपरागत माहितीवरून लिहिलें गेलें यांत संशय नाहीं. प्रस्तुत कोरीव लेखांत उल्लेखिलेलीं तीर्थें व देवालयें पुढें परिशिष्टांत दिलीं आहेत. त्यांतील कांहीं सध्या दाखविता येत नसलीं तरी त्यांचा उल्लेख महानुभावांच्या वरील स्थानपोथींत आढळतो त्यावरून ती पोथी व प्रस्तुत शिलालेख परस्परांद्वारक आहेत हें दिसून येईल व याशिवाय सिंदूरगिरिमाहात्म्य नांवाची पोथी कांहीं वर्षांपूर्वी नागपूर येथ श्री जोशी

§ अद्यापि गयेला विष्णूच्या पादुकांचीच पूजा केली जाते

S लघु व व बृहत् सिंदूरगिरि माहात्म्यांत लक्ष्मणाच्या देवळाचा उल्लेख आहे, पण हीं माहात्म्यें फार प्राचीन दिसत नाहीत

% रा. ब. हिरालाल यांचा रामटेकवरचा लेख इंडियन अँटिक्वेरी पु. ३७

@ एपिग्राफिया इंडिका पु. १५, पृ. ३९ पहा

£ अ. ६, श्लो. १-२, ८, ७, ११, ८ इत्यादि पहा

¶ वा. वि. मिराशी कालिदास (नवभारतप्रकाशन) पृ. १२१ पहा.

= या पोथीचा उतारा आमचे मित्र श्रीयुत हरि नारायण नेने, एम्. ए., यांच कडून आम्हांस मिळाला

यानीं छापून प्रसिद्ध केली, तींतहि रामटेकच्या व आजूबाजूच्या पचक्रोशींतील तीर्थांचा उल्लेख व वर्णन आहे. हें माहात्म्य पद्मपुराणातून घेतलें आहे असा शेवटीं उल्लेख आहे तथापि सध्या प्रसिद्ध असलेल्या आनदाश्रमग्रथावलींतील किंवा वेंकटेश्वर प्रेसच्या ग्रथावलींतील पद्मपुराणात तें आढळत नाहीं. [ त्यातील माहिती शेवटच्या परिशिष्टात दिली आहे. ]

वर उल्लेखिलेल्या राम व लक्ष्मण याच्या देवळाखेरीज इतर अनेक देवालयें टेकडीवर आहेत त्यातील काहीं फार प्राचीन असावीं. तेथें वामनावताराची एक मूर्ति भग्न स्थितींत आढळते. ती प्राचीन दिसते व म्हणून पुराणवस्तुसशोधन खात्यानें ती व तिचें विशीर्ण देवालय आपल्या ताब्यात घेतलें आहे या मूर्तीचा उल्लेख प्रस्तुत शिलालेखाच्या सध्याच्या अवशिष्ट भागात तसेंच रामटेकमाहात्म्यातहि कोठें आढळत नाहीं. टेकडीवर एकात एक असे तीन प्राकार असून शेवटच्या प्राकार आलाडून गल्यावर राम व लक्ष्मण याचीं देवालये व त्याच्या सभोंवार इतर लहान देवालयें दिसतात हिंदूशिवाय इतरास या तिसऱ्या प्राकाराच्या आत जाता येत नाहीं

प्रस्तुत शिलालेख लक्ष्मणाच्या देवळाच्या सभामडपात गर्भगृहाच्या पुढील भिंतींत दरवाजाच्या उजव्या बाजूस बसविला आहे या शिलालेखाचा उल्लेख जनरल **कनिंगहॅम**चा सहायक **बेगलर** यानें प्रथम केलेला आढळतो. हा सन १८७३–७४ सालीं रामटेकास गेला होता त्याला शेवटच्या प्राकारात जाऊ दिलें नव्हतें तथापि आपल्या हिंदु नोकराकडून त्यानें लेखाचा छाप काढविला त्यात रामदेव हें नाव त्यास आढळलें § तथापि हा लेख कोणी व कदा करविला याची काहींच माहिती त्याला देता आली नाहीं $ यानतर डॉ **फ्लीट**मार्फत प्रस्तुत शिलालेखाचा एक अस्पष्ट छाप प्रसिद्ध पुरातत्त्वज्ञ प्रो **कील्हॉर्न** यास मिळाला तो छाप अस्पष्ट असल्यानें कील्हॉर्नला तो सबध वाचता आला नसावा तथापि त्यातील **सिंहण** व **रामचंद्र** हीं राजाचीं नावें त्याला दिसलीं हीं नावें **हैहय** वशाच्या रायपूर शाखेंतील राजाच्या नामावलींत दिसत असल्यानें त्यानें हे राजे **कलचुरि** किंवा हैहयवशाचे असाव असें एपिग्राफिया इडिकामधील हरिब्रह्मदेवाच्या खलारी या लेखाचें सपादन करताना म्हटलें आहे † त्यानतर **कुझेन्स्** सन १९०३ ४ मध्यें रामटेकास गेला होता पण त्यासहि आत जाऊ न दिल्यानें प्रस्तुत शिलालेखाविषयीं काहीं माहिती देता आली नाहीं या लेखाचा शेवटचा उल्लेख मध्यप्रान्तातील प्रसिद्ध पुरातत्त्वज्ञ कै. रायबहादूर डॉ **हिरालाल** यांनीं आपल्या मध्यप्रात वऱ्हाड यातील कोरीव लेखाच्या सूचींत केला आहे @ याप्रमाणें अनेकदा या शिलालेखाचा निर्देश केला असला तरी अद्यापि कोणी तो समग्र छापला नाहीं त्यामुळें त्यातील माहितीबद्दल अनेकाचा गैरसमज झाला आहे या लेखाचें यादवकालीन इतिहासात महत्त्व जाणून आम्हीं तो येथें सपादित आहों

§ हें नाव एकमष्ठाच्या ओळींतील असावें पण तेथें तें श्रीरामचद्राचें वाचक आहे

$ कनिंगहॅम–आर्किऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्ट, खड ७, पृ ११२ पहा

† ए इ, खड २, पृ २३० पहा

@ पहिली आवृत्ति (१९१६), पृ ३–४, दुसरी आवृत्ति (१९३२), पृ ३.

वर लिहिल्याप्रमाणें प्रस्तुत लेख लक्ष्मणाच्या देवळात गर्भगृहाच्या दरवाजाच्या उजव्या बाजूस भिंतींत बसविलेल्या दगडावर कोरलेला आहे. आरंभीं हा लेख फार मोठा असावा पण सध्या त्याच्या फक्त ७५ ओळी दिसतात. त्यांनीं २ फूट ६ इं. रुंद व ३ फू. १ इं. उंच इतकी जागा व्यापिली आहे. या लेखाचे दोन भाग पडतात. पहिल्यात १ ते ३१ ओळी व दुसऱ्यात ३२ ते ७५ ओळी येतात. हे दोन भाग ३१ व्या व ३२ व्या ओळींत ' ळ ' काराकृति चिन्हें काढून निरनिराळे दाखविले आहेत. शिलेचा पृष्ठभाग अनेक ठिकाणीं—विशेषत वर, खालीं व डाव्या बाजूस खराब झाल्यानें लेख त्रुटित झाला आहे. या लेखाच्या आरंभीं एका राजवंशाचें व त्यातील पुरुषांनी केलेल्या पराक्रमाचें वर्णन केलें होतें, पण हा भाग फारच खराब झाल्यानें त्यातील बहुतेक ऐतिहासिक माहिती आतां नष्टप्राय झाली आहे. दुसऱ्या भागात रामटेकच्या देवळाचें व तीर्थाचें वर्णन आलें आहे. यातील आरंभीचा भाग बराचसा शाबूत आहे, पण खालचा भाग पुन अतिशय खंडित झाला आहे.

या लेखाची लिपी इ. स. च्या बाराव्या तेराव्या शतकातील नागरी आहे. पृष्ठमात्राचा अनेक ठिकाणीं उपयोग केला आहे. ' रि ' बद्दल ऋ, व च्या ठिकाणीं ब, प बद्दल ख, आणि ख बद्दल ष लिहिलेले अनेक ठिकाणीं आढळतात. क व प यांच्या पूर्वी येणाऱ्या विसर्गाबद्दल पू चा उपयोग केलेला आहे. कांहीं ठिकाणीं अवग्रहाचें चिन्ह कोरलें आहे.

या लेखाच्या पहिल्या चार ओळींतील बहुतेक सर्व शब्द नाहींसे झाल्यानें त्यातील मजकुराचा पत्ता लागत नाहीं. पाचव्या ओळींत ' **यादवो वंशः** ' व ' [ य ] **दुवंशजः** ' हे शब्द येतात, त्यावरून ज्या राजाच्या कारकीर्दीत हा लेख कोरविला गेला तो स्वतःस यादव-वंशी म्हणवीत असे हें उघड आहे. या वंशातील एका राजाच्या पराक्रमाचें वर्णन पुढील ओळींत आलें होतें. पण त्यापैकीं रुद्र ( ओळ ७ ) **अंध्राधिप** व **चोल** ( ओ. ८ ) व कदाचित् **गुर्जरेन्द्र** ( ओ. ९ ) एवढींच त्याच्या शत्रूंचीं नांवें शिल्लक आहेत. नवव्या ओळीच्या शवटीं ' **जैत्र** ' असा शब्द आला आहे तो **जैत्रपाल** या नावाचा अवशेष असावा. पधराव्या ओळींत सिंहणाचा उल्लेख त्याच्या नतरच्या राजाच्या वर्णनात ओघात आला आहे. सिंहणाचें नाव १३ व्या ओळींतहि आलें असावें पण त्याचीं पहिलीं दोन अक्षरें फुटून गेलीं आहेत. सोळाव्या ओळींत **श्रीराघव** नामक अधिकाऱ्याची वंशावळ सुरू होते. तो **वायिनायक** नावाच्या गृहस्थाचा नातू होता सतराव्या ओळींत असें म्हटलें आहे कीं, श्रीरामचद्रराजानें आपल्या साम्राज्यातील समृद्धीमुळे सुदर दिसणाऱ्या लक्ष्मीला या राघवाच्या स्वाधीन केलें व स्वत क्रीडायानात नाखिलकलानिपुण अशा स्त्रियांच्या सहवासात रममाण झाला. अठराव्या व एकोणिसाव्या ओळींतहि याच राघवाचा शब्दशः म्हणून उल्लेख आल्यासारखा दिसतो त्याची पत्नी **राजाथी** हिचें नाव १९ व्या ओळींत आलें आहे. एकदा या राघवानें आपल्या गुरूस प्रश्न केला कीं, " भगवन्, आश्रम सर्व मलीन आहे; तेव्हा हा अगाध ससारसागर तरून जाण्यास योग्य असा एखादा उपाय मला सांगावा." त्यावर, " विष्णूच्या भक्तीशिवाय दुसरा उपाय नाहीं " असें त्या गुरूनें उत्तर दिलें. व नतर

या टेकडीवरील व आजूबाजूच्या देवळांचें व तीर्थांचें वर्णन केलें लेखाच्या पहिल्या भागात रामटेकच्या चारी बाजूंच्या धर्मेश्वर, मुधश्वर, केदार व आजनय या चार देवळांचा उल्लेख आला आहे दुसऱ्या भागात सिंदूरगिरिमाहात्म्यातल्याप्रमाणें रामगिरीवरील व त्याच्या सभोंवतालच्या देवळांचें व तीर्थांचें वर्णन केलें आहे यातील बरींचशीं सिंदूरगिरिमाहात्म्यात व काहीं महानुभावांच्या स्थानपोथीतहि वर्णिलीं आढळतात या सर्व उल्लेखावरून व स्थानिक माहिती वरून त्यातील बहुतेकांचें स्थानहि निश्चितपणें ठरविता येतें तसा प्रयत्न या लेखाच्या शेवटीं परिशिष्टात केला आहे

मागें सांगितल्याप्रमाणें खलारी येथील शिलालेखाचें संपादन करीत असता कील्हॉर्ननें प्रस्तुत शिलालेखाचा उल्लेख केला आहे त्यातील सिंहण व रामचंद्र हे राजे, खलारी लेख ज्या हरिब्रह्मदेव नामक हैहयवंशी राजाच्या कारकीर्दीत कोरविला होता, त्याचे अनुक्रमें पितामह व पिता असावे असें त्याला वाटलें व त्यावरून कलचुरि किंवा हैहयवंशी राजांचें राज्य पश्चिमेस नागपूर प्रांतापर्यंत पसरलें होतें असा त्यानें निष्कर्ष काढला कलचुरि राजांचे अनेक लेख आजपर्यंत प्रसिद्ध झाले आहेत त्यातील बहुतेकात एका विशिष्ट शकाचा उपयोग केला आहे हाला कलचुरिशक किंवा चेदिशक असें म्हणतात या शकाच्या मितींचा विचार करून कील्हॉर्ननें असें अनुमान काढलें कीं, कलचुरि शकाचा आरंभ पूर्णिमान्त आश्विन महिन्याच्या शुक्ल प्रतिपदेस होत असावा पण हिंदुस्थानात आश्विन शुक्ल प्रतिपदेस एखाद्या शकाचा आरंभ होत होता याविषयीं निश्चित पुरावा त्याला आढळला नाही. शेवटीं प्रसिद्ध संस्कृतज्ञ **हेन्री टॉमस कोलब्रुक** याचें एक पत्र त्याच्या मुलीनें लिहिलेल्या चरित्रात§ कील्हॉर्नला सांपडलें त्यात नागपूर प्रांतीं आश्विन शुक्ल प्रतिपदेस वर्षारंभ होता असें म्हटलें होतें रामटेकच्या लेखावरून कलचुरि किंवा हैहय वंशाचें राज्य नागपूरपर्यंत पसरलें होतें असे कील्हॉर्नला वाटलें व कोलब्रुकच्या पत्रावरून कोलब्रुकच्या कालापर्यंत नागपूर प्रांतीं आश्विन शुक्ल प्रतिपदेस वर्षारंभ होत होता असें दिसलें तेव्हा नागपूर प्रांतातील हा वर्षारंभ कलचुरि शक या प्रांतात प्रचलित होता याचा त्यानें द्योतक मानला व त्यावरून या शकाचा वर्षारंभ पूर्णिमान्त आश्विन महिन्याच्या शुक्ल प्रतिपदेस होत असे असा सिद्धान्त त्यानें प्रस्थापित केला † तेव्हा प्रस्तुत शिलालेखात कोणत्या राजवंशाचें वर्णन आहे याचा विचार केवळ या शिलालेखाच्या अर्था करिताच नव्हे तर कलचुरि शकाचा आरंभ निश्चित करण्याकरिताहि महत्त्वाचा होणार आहे

हा लेख समक्ष पाहण्याची संधि कील्हॉर्नला मिळाली नव्हती या लेखाचा एक अस्पष्ट छापच त्याच्यापुढें होता आज शेकडों वर्षे या लेखाला तेलाचीं काजळीचीं व चुन्याचीं पुटे चढलीं असल्यानें त्याचीं अक्षरें अर्धीअधिक बहुतेक बुजून गेलीं आहेत त्यामुळे याचा

§ पृ १६३ पहा कोलब्रुक हा नागपूरच्या भोसल्यांच्या दरबारीं इंग्रजांचा वकील म्हणून १८ मार्च, १७९९ ते १९ मे, १८०१ पर्यंत होता सन १७९९ च्या नागपुरातील दसऱ्याचें वर्णन कोलब्रुकनें केलें आहे त्यात त्यानें हें विधान केलें आहे

† *Festgruss an Roth* या पुस्तकांतील त्याचा कलचुरिशकाचा वर्षारंभ हा लेख पहा

चांगला छाप घेता येत नाहीं व घेतलेल्या छापावरून लेख वाचणें अत्यंत कठिण जातें रायबहादुर हिरालालजी हा लेख समक्ष पाहिला होता व त्यात त्यांना यादवांचे वंश हीं अर्थहि दिसली होतीं पण यात देवगिरीच्या यादवांचें वर्णन आलें असावें असें न मानता किल्हॉर्नच्या मताचाच अनुवाद त्यांनी केला आहे व हैहयवंशी राजे हे यदूच्या वंशातील राजे असल्यानें त्यास यादव मानण्यात हरकत नाहीं असें त्यांनीं प्रतिपादिलें आहे यदु, नंतर त्याचा मुलगा सहस्रजित् व त्यानंतर हैहय अशी वंशावळ पुराणात आढळत असल्यानें हैहय हे यदुवंशज होते यात संशय नाहीं पण रूढीमुळें यादव हें नाव यदूचा दुसरा मुलगा कोष्टु ह्याच्या वंशजानाच प्राचीन काळापासून लावण्यात आलें आहे § कलचुरि राजांचें साम्राज्य उत्तर हिंदुस्थानात दहाव्या व अकराव्या शतकात दूरवर पसरलें होतें व त्या वंशाच्या दोन शाखा मध्यप्रांताच्या पूर्वेकडील छत्तीसगढ या भागात रतनपुर व रायपूर येथे मराठ्यांची सत्ता स्थापित होईपर्यंत राज्य करीत होत्या हे राजे आपणास हैहयवंशी म्हणवत त्याच अनेक लेख सापडले आहेत, पण त्यांतील एकातहि त्यांनीं आपणास यादव म्हटलें नाहीं किंवा आपल्या पूर्वजांच्या यादींत यदूचा उल्लेख केला नाहीं तेव्हां रामटकच्या शिलालेखातील राजे आपण यादव म्हणवीत असल्यानें ते हैहय असणें संभवनीय नाहीं शिवाय हैहयवंशी राजांच्या नामावळींत जैत्रपाल ह्यासारखें नाव कोठेंहि आढळत नाहीं हें नाव या लेखात नवव्या आळीच्या अखेरीस आलें असावें हें वर दाखविलें आहे शिवाय प्रस्तुत लेखात निर्दिष्ट केलेले सिंहण व रामचंद्र हे राजे हैहयवंशी होते असें मानण्यात सर्वांत मोठी अडचण येते ती ही कीं, छत्तीसगढात चौदाव्या पंधराव्या शतकात रायपूर येथें राज्य करणाऱ्या या राजांनीं किंवा त्यांच्या पूर्वजांनीं रुद्र, आंध्राधिप, चाल, गुर्जरेंद्र या राजावर कधीं जय मिळविल्याचें त्यांच्या किंवा इतरांच्या लेखातहि नमूद नाहीं कारण हे राजे दुर्बल असून यांचें राज्य सामान्यतः रायपूर जिल्ह्याच्या पलीकडे चौदाव्या पंधराव्या शतकात पसरलेलें दिसत नाहीं शिवाय या शतकात रुद्र नावाचा कोणी राजा राज्य करीत होता असेंहि दिसत नाहीं त्यामुळें प्रस्तुत लेखातले सिंहण व रामचंद्र हे राजे हैहयवंशी होते हे कीलहॉर्न व हिरालाल यांचें मत बरोबर दिसत नाहीं

याच्या उलट सिंहण व रामचंद्र हीं नावें देवगिरीच्या यादव वंशातील प्रतापी राजांचीं म्हणून प्रसिद्ध आहेत हे राजे इ. स. च्या तेराव्या शतकात राज्य करीत होते नवव्या आळीच्या शेवटीं आलेलें जैत्रपाल हें नाव सिंहणाच्या पित्याचें दिसतें सातव्या आठव्या आळींत रुद्र, आंध्राधिप, चाल वगैरे नावें जैत्रपाल राजाच्या पराक्रमाच्या वर्णनात आलेलीं दिसतात कारण हेमाद्रीचा व्रतखंड$ रामदेवराजाचा पैठणचा ताम्रपट‡ इत्यादिकावरून जैत्रपालानें काकतीयवंशी रुद्रदेवाचा पराभव करून त्याच्या पुतण्यास गादीवर बसविलें असें वर्णन आढळतें रुद्र राजाचा काहीं ठिकाणीं आंध्र म्हणूनहि उल्लेख आढळतो त्यामुळें

§ पार्जिटर यांचें *Ancient Indian Historical Traditions*, पृ. ८७ पहा

$ त्रिकलिंगाधिपते रुद्रोविंदाशनं रौद्रस्य रौद्राकृत । कृत्वा पुरुषमेधमद्‌विधिना कन्धस्त्रिलोकीनयः ।

‡ इंडियन् अँटिकरी, खंड १४, पृ ३१६.

प्रस्तुत लेखातील जैत्रपाल, सिंघण व रामचंद्र हीं नावें यादववंशी राजाचींच होत असें निर्विवादपणें म्हणता येतें. यादवाचें राज्य मध्यप्रांतात पूर्वेस बालाघाट जिल्ह्यातील **लांजी** या गावापर्यंत पसरलें होतें, हें लांजी येथील शिलालेखावरून स्पष्ट दिसतें. हा शिलालेख सध्या नागपूरच्या संग्रहालयांत ठेवला असून त्यात रामदेवरावाचा उल्लेख आहे.‡

यादवाच्या इतर लेखावरून सिंघणाच्या नंतर त्याचा नातू कृष्ण हा गादीवर बसला असें दिसतें. पण त्याचें नाव या लेखाच्या अवशिष्ट भागात आढळत नाहीं. तथापि ते पधराव्या ओळींत आलें असावें असें अनुमान करता येतें, कारण त्या ओळींत आपल्या युवराज्यानें त्यानें पृथ्वीला सिंघण राजाचा वियोग भासू दिला नाहीं असें एका राजाविषयीं म्हटलें आहे, तें अर्थातच सिंघणाचा उत्तराधिकारी कृष्ण याबद्दलच असावें. कृष्णाचा बधु **महादेव** व त्याचा मुलगा **आमण** याचीं नावें या लेखात आलीं होतीं असें वाटत नाहीं. यानतर मागें सांगितल्याप्रमाणें कृष्णाचा मुलगा **रामचंद्र** राजा याचें नाव १८ व १९ या ओळींत आलें आहे. हा रामचद्र म्हणजे **श्रीज्ञानेश्वरांचा** समकालीन राजा **रामदेवराव** यादव होय.

प्रस्तुत लेखात उल्लेखिलेले राजे हे यादव वंशी होते हें याप्रमाणें सिद्ध झालें आहे. शिवाय कलचुरि किंवा हैहय याचा एकहि शिलालेख मध्यप्रांतातील मराठी जिल्ह्यात सापडला नाहीं. म्हणून कलचुरि शकाचा वर्षारंभ आश्विन महिन्यात होत असे हें कील्हॉर्नचे मत नागपूर प्रांताच्या वर्षारंभाच्या रूढीनें सिद्ध होणें शक्य नाहीं.§

प्रस्तुत शिलालेख अनेक ठिकाणीं खडित झाल्यामुळें तो कोरविण्यात काय उद्देश होता हें सागणें कठिण आहे. तथापि १६ व १७ या ओळींत श्रीराघव नावाच्या अधिकाऱ्याची वंशावळ दिली आहे. व त्यावर राज्याचा भार टाकून रामचद्र राजा विलासमग्न झाला असे म्हटले आहे. पुढें ६३ व्या ओळींत काहीं विशिष्ट काम केल्यावर या राघवाला कृतकृत्य वाटलें असे वर्णन आलें आहे. त्यावरून या लेखाचा उद्देश राघवाची रामटेक येथील कामगिरी—कदाचित् लक्ष्मणाच्या देवळाचा जीर्णोद्धार—नमूद करण्याचा दिसतो. ७० व ७१ या ओळींत माइदेव नावाच्या अधिकाऱ्याचा उल्लेख आहे. तो उपरिनिर्दिष्ट राघवाचा रामटेकला नेमलेला अधिकारी असावा.

ज्या टेकडीवर श्रीरामचद्र व लक्ष्मण याचीं देवळें बाधलीं आहेत तिचीं सिंदूरगिरि व तपगिरि अशीं नावें प्रस्तुत लेखात आलीं आहेत. यापैकीं पहिल्या नावाबद्दलची कथा या लेखाच्या २३ व्या ओळींत आली आहे. ही ओळ बरीच खडित झाली आहे. तथापि अवशिष्ट

‡ हिरालाल याची मध्यप्रांत, वऱ्हाड यातील लेखाची सूचि (द्वितीयावृत्ति) पृष्ठ २० पहा. या सूचींत 'या लेखाचा काहीं भाग रामटेक लेखाशीं तंतोतंत जुळतो ' हें हिरालालाचें विधान मात्र चिंत्य आहे. कारण तसा भाग आम्हास आढळला नाहीं

§ ही रूढीहि कोल्हुकच्या काळीं नागपूर प्रांतीं प्रचलित होती असें दिसत नाहीं. दसऱ्याचा मोठा समारंभ पाहून कोलब्रुकची तशी समजूत झाली. त्या वेळींहि नागपूर प्रांतीं चैत्रादि शालिवाहन शक प्रचलित होता हें तत्कालीन कागदपत्रावरून दाखविता येतें.

भागावरून, 'येथें नरसिंहानें आपल्या तीक्ष्ण नखाग्रांनीं हिरण्यकशिपूचें वक्ष स्थळ फाडलें त्यातून वाहाणाऱ्या रक्तानें हा सर्व प्रदेश माखला गेला, तेव्हापासून याला सिंदूरगिरि म्हणू लागले,' ही कथा त्या ओळींत वर्णिल्ली दिसते सध्या या टेकडीवर नृसिंहाची भव्य मूर्ति असलेलीं दोन देवळें आहेत रायबहादूर हिरालाल यांनीं अनुमान केल्याप्रमाणें सिंदूरगिरि हें नाव प्रारंभीं या टेकडीवरच्या तांबूस रंगाच्या दगडावरून पडलें असावें या टेकडीस तपगिरि (किंवा तपोगिरि) म्हणण्याचें कारण सिंदूरमाहात्म्यात असे दिलें आहे कीं, येथें शूद्रमुनि शम्बूक तपश्चर्या करीत होता नंतर श्रीरामचंद्रांनीं मृत ब्राह्मणपुत्रास जिवंत करण्या करिता आपल्या चंद्रहास खड्गानें त्याचा शिरच्छेद केला तेव्हा शम्बूकानें तीन वर मागितले ते हे कीं, माझ्या देहाचें या ठिकाणीं शिवलिंग व्हावें श्रीरामचंद्रांनीं या गिरीवर सदोदित वास्तव्य करावें व यात्रेकरूनीं श्रीरामचंद्राचें दर्शन करण्यापूर्वीं माझें दर्शन करावें त्याप्रमाणेंच सध्या यात्रेकरू टेकडीच्या दक्षिणेच्या टोकावर असलेल्या धूम्रेश्वराचें प्रथम दर्शन करून नंतर श्रीरामाच्या दर्शनास जातात शम्बूकाची कथा प्रस्तुत लेखाच्या ४१ व्या ओळींत आली आहे तींत धूम्राक्षनामक शिवलिंगाचा उल्लेख आहे

वाल्मीकि रामायणाच्या उत्तरकांडात शम्बूकाची कथा आली आहे तेव्हा तथील वर्णन रामटेकास कितपत जुळतें तें पाहू उत्तरकांडात शम्बूक शैवल पर्वताच्या उत्तरेस एका विस्तीर्ण तलावाच्या काठीं तपश्चर्या करीत होता असें वर्णन आलें आहे § या शैवल पर्वताचा इतर कोठें निर्देश सापडत नाहीं तथापि रामायणातच विंध्य व शैवल या पर्वतामधील देशावर दण्ड या नावाचा राजा राज्य करीत होता § त्यानें एका ब्राह्मण कन्येवर बलात्कार केल्यामुळें शैवल पर्वताच्या आसपासचा शंभर योजनें प्रदेश उध्वस्त झाला व त्यालाच पुढें दंडकारण्य म्हणू लागले असें म्हटलें आहे † या दण्ड किंवा दाण्डक्य राजाला इतर ठिकाणीं भोज म्हटलें आहे ¶ भोज हे प्राचीन विदर्भावर राज्य करीत होते हें प्रसिद्ध आहे तेव्हा शम्बूक हा विंध्याच्या दक्षिणेस विदर्भातच तपश्चर्या करीत होता हें उघड आहे शम्बूकाला ठार मारल्यानंतर श्रीरामचंद्र विमानात बसून देवांसह अगस्त्याश्रमीं गेले असें रामायणात म्हटलें आहे ‡ पण शम्बूकाच्या वधस्थानापासून अगस्त्याश्रम किती दूर होता याचा स्पष्ट निर्देश

---

§ दक्षिणां दिशमाक्रामत्ततो राजर्षिनन्दन । शैवलस्योत्तरे पार्श्वे ददर्श सुमहत्सर । तस्मिन् सरसि तप्यन्तं तापसं सुमहत्तपः । ददर्श राघवः श्रीमाल्लम्बमानमधोमुखम् ॥ अ० ७५, १३ १४ शैवलपर्वताविषयीं टीकाकार राम म्हणतो, शैवलस्य शैवलाख्यस्य विन्ध्यसमीपदक्षिणभागवर्तिगिरेः ॥

§ उत्तरकाण्ड, अध्याय ७९, श्लोक १६

† उत्तरकाण्ड, अध्याय ८१, श्लोक ८

¶ दाण्डक्यो नाम भोजः कामात् ब्राह्मणकन्यामभिमन्यमानस्सबन्धुराष्ट्रो विननाश । अ १, प्र ३

‡ उत्तरकाण्ड, अध्याय ७६, श्लो १६ २०

रामायणात आढळत नाहीं. एकदरींत, रामायणात उत्तरेंतल्या स्थळांच्या इतकें दक्षिणेंतील स्थळांचें वर्णन स्पष्ट व निःसंदिग्ध नाहीं त्यामुळें लंका कोठें होती याबद्दल विद्वानात वाद मातून राहिला आहे. तथापि उत्तरकाड लिहिलें गेलें त्या काळीं विंध्य पर्वताच्या दक्षिणेस व गोदावरीच्या उत्तरेस विदर्भात केलें तरी शबूकाच्या तपश्चर्येचें स्थान होतें यात संशय नाहीं. रामायणातील या स्थानाचें वर्णन रामटेकास जुळेल असें आहे. कारण रामटेकाम टेकडीच्या पायथ्याशीं अंबाळा नावाचा तलाव अद्यापि विद्यमान आहे. [ या भागात रामटेकाइतकें शबूककथेशीं संबद्ध असें प्राचीन स्थान दिसत नाहीं म्हणून उत्तरकांडाच्या कर्त्यांमहि रामटेक हेंच शबूकाच्या तपश्चर्येचें स्थान म्हणून विवक्षित होतें असें मानण्यास हरकत नाहीं.¶ ]

**ओळ** **शिलालेख**

1 ..... ..... ..... ..... ...... णु ... . .... ..... .
..... ..... ... . . . .. ... मवाहमु....

2 . .. पूजित. .. . .. . .
..... ..... .. . ..... स्तत्वे (त्त्वे) नऽ

3 .. . ..... देवासुरोर... . .... .....
........... न्नचरितो..... .

4 .... ..... क सुकविसार्थपथे प्रा..... ..... .....
... . ..... .... प्रोत्सृति (?) .... .....

5 .. ..... . .. . युग्म ॥ ततोभूद्यादवो वंशः
..... ..... किं वर्ण्यतेऽ [ यं ].... .....
[ य ] दुवंशज ... . .. . . ... .

---

¶ वर उल्लेखिलेल्या सोळा अध्यायाच्या सिंदूरगिरिमाहात्म्याशिवाय आणखी एक ४५ अध्यायाची प्रत नागपूर येथील सुप्रसिद्ध ॲडव्होकेट श्री **वा तु भगवन्मूर्ति** यांच्या वडिलांजवळ आम्हास पहावयास मिळाली तींत (अ २, श्लो २० २२) तपोगिरि व सिंदूराद्रि या दोन नांवा शिवाय महाशैवल नांवाचाहि उल्लेख आहे व या गिरीवर श्रीशंकर शैवास आणतात ( **अस्मिन् गिरिवरे शम्भो शैव लाति यतो भवान्** ) म्हणून यास शैवल म्हणतात अशी व्युत्पत्ति दिली आहे हें बृहत् सिंदूरमाहात्म्य पद्मपुराणाच्या कौमारखंडातून घेऊन रामानंदानें लिहिलें असें त्यात म्हटलें आहे पण यातील शबूकवधाविषयींचा भाग वाल्मीकि रामायणांतून जशाचा तसा घेतलेला दिसतो *पद्मपुराणाच्या छापील प्रतींत कौमारखंड आढळत नाहीं तथापि या माहात्म्यांतील* वर्णनावरून रामटेकला शैवलगिरी म्हणत असावे या आमच्या अनुमानाला पुष्टि मिळते

ऽ या लेखातील दुरुस्त्या अर्धचंद्राकृति कंसात व अस्पष्ट अक्षरें चतुष्कोणी कंसात दाखविलीं आहेत एखादें अक्षर लेखात गळालें असल्यास तें चतुष्कोणी कंसात देऊन त्याला तारकांकित केलें आहे

6 ..............................[क्षो]णिपालप्काल:S प्रोद्वैरिवीर......
..............................................जंभशत्रु: । प्रद्यत्कलंक-
विधुम..................................................................

7 ..........................................यस्याति भीषणरणांगण......
..................................................मंडलमिदं स्मरति स्म
रुद्रको [ ला ? ]..........................................................

8 ..................................................लीवनालीतलग (?)
भुजगवा ............................................... त्वमंभाधिपत्वं
रे चोड विमुंच द [ पं ]...................................धरानाथप्रबोध

9 ..................................................पि ( खि ) लभूपतीनां
शिर [ स्सु ? ]..............................[ गुर्ज ? ] रेन्द्र: पराड्मुखो यस्य
पुरो रणेभूत्...........................................हेपु महामहीन्द्रे जैत्र-
....................

10 .................................................दि [ शि ? ] प्रभिन्नप्रति-
भटविक [ म ? ]............................................[ मौक्ति* ] कौघै-
र्गगनमिव सतारं संध्यया स.................. [ क ] रोतकराणां सादरस्य

11 .................................................[ क्षो ? ]णिपतेरस्य
भूमिपालो ............................................ हासिनिहतप्रति-
भटेभकुंभद्वयीपट्टुद्य..............................कमुक्ताच्छलात् । असुष्य

12 ............................................................ महीरुहस्य
यशसा चंद्र................................................वाचस्पते: ।
तेजोभिर्दिनकृद्रुचामपि हठादा [ धि ] क्य..................ञालयभोग-
भूमिरभवत्काल —

13 ................................................................णई-
देवनामा गुणाभि........................ ...............................कृष्ण-
चंडकोदंडमुक्तै: शितकांडदण्डैर्विप( ख )ण्डितारक........ देहपं ( खं )-
डैरमंडि क्षितिराद्यस्य ।

14 ....................................................................
[मा] साच शान्ति परमामवाप.......... जगतीं क्षितीश: । शशाश (स)

S क्षोणिपाल : काल: असें वाचावें.

§ ' सिंघणदेवनामा ' असें वाचावें.

विश्रामतरुस्ततो यफ्फलेग्रहि[1]र्याचकपत्रिपंक्तेः । धराचक्रं भ्रांत्वात् ( त्रि ) दश—

15 ..... .......... ..... ..... ..... ..... ..... ..... .....

धिधाय रचयत्यहो नृत्यक [ बंध ] .. . ....... अपारसंसारसमुद्रसारैर्यशः सुधीधैर्वसुधा यदीयैः । श्रीसिंहणक्षोणिपतेर्वियोगतापं जहौ ॥

16 ....................... .................................. ..............

..... [ मः ] हीतले । वायिनायक इति क्षमातले नि . यशोभरैः । तत्सुतः सकललोकविश्रुतो न श्रुतः क्वचिदपीह यत्समः तस्याप्ययं राघवदेवनामा

17 .. . .. . ................. ..... ..... ..... .....

. ..... [ गु ] णगौरवप्रणयिनं श्रीरामचंद्रः प्रभुर्यं साम्राज्यसमृद्धिसुंदररुचः पात्रं विधाय श्रियः । क्रीडोद्यानतलेऽपि (खि) लोज्ज्वलकलालीलागृहस्त्रीजनालाप—

18 . ..... ..... ..... .....

.........श्रीरामभूपत्वधरस्य शय्यापालीकृतात्मानममानसत्वं ( त्त्वं ) ॥ श्रीवैद्यनाथशिवपादपयोजभक्तिसंपादिताषि( खि )लमहत्व ( त्त्व ) पदाय तस्मै । के के नृपा ज—

19 . ... . .. .. . . .. . .. .. ..... ..... ....

द्वीरं क्षातिरपि प्रधानकुलजं श्रद्धा यथा सात्वि ( त्त्वि ) कं । तद्वद्भूपयति स्म यं प्र ( प्रि ) यतमा सौभाग्यसौंदर्यभू राजायीति गुणाश्रया गुणगणाधारं धुरो—

20 .................. .......... ........... ...... .................

. .................दिनकृद्दिनकृद्यु( द्द्यु ) तिं । गुरुमात्मीयमित्येष प्रपच्छ तदनु द्विजम् । जानासि सर्वं भगवंस्ततस्त्वां पृच्छामि पर्युत्सुकतामुपेतः । अगाध संसारपयोधि—

21 ..... ..... ..... ... .... ..... .. .. ... . .. . ..... .....

..... ..... ..... .. पि ( खि )लपारदृश्वा ॥ शय्यापालकुलाधीश निबोधेदं वचो मम । संसारसागरोत्तारकारणं न हरेः परं । अवतारा दशाप्यस्य रामस्ते [ षां ? ]

22 ...... ..... ..... .. .. ..... ..... ..... ..... ... ..... .....

................................वायुपुत्रयुक्तो वसत्युत्तमयोगिचिन्त्यः । महीधरस्यास्य तपंगिरेस्तं प्रभावमग्र्यं किमुदाहरामि । विहाय मे . . ..

---

[1] य = फलेग्रहि असें वाचावें

23 ..............................................................................................
.............................................................साध्य रघूद्वहस्य ॥ प्रागत्रदेवो नृहरिः सुरारेर्वि( वि )भेद वक्षः करजैः शितोग्रैः । तद्वक्तपूरारुणितस्ततो यं.. ...

24 ..............................................................................................
..............................................................................[ गु ] ण-कथां सौंदर्यसारैः पुनस्तद्वद्द्वक्तमखुं वृ( बृ )हस्पतिसमोऽप्यन्यो हि जानाति कः । पपौ समुद्रं चुलुकेन यस्तं मुनी [ श ? ]

25 ..............................................................................................
..............................................................................................
मनो मृदु......[ रा ] मेश्वर इतीह कीर्त्यते । श्रीरामाय मुनीश्वरः कलशभूर्मध्येसभं ब ( ब्र )ह्मणः । श्रुत्वैतस्य गिरेः प्र [ भाव- ]

26 ..............................................................................................
............विलोक्य सादरं जन्तुर्मुच्यते ब ( ब्र )ह्महत्यया । गोविप्रबा-( ब्रा )लप्रमदावधादिपापौघपूर्णा अ.........

27 ..............................................................................................
...............लयपर्वतेंद्रे । कृतोपवासा हरिवासरे ये कुर्वन्ति रात्रौ रघुनन्दनाग्रे तपगिरौ§जागर [ णं ]......

28 ..............................................................................................
............मराधिकाभैः ॥ घंटेश्वरं चैव सुभेश्वरंच केदारमीशं च तथांजनेयं । द्वारेश्वर......

29 ..............................................................................................
............[ म ] जनेन दुरितं निर्धूय वं ( बं )धच्छिदा स्वाच्छंदं मनुजा भजंति भवने सर्गस्य यत्तत्पदं ॥ म......

30 ..............................................................................................
.........................प्रभावं । शक्नोति वक्तुं न गुरुः सुराणामन्यस्य तत्कस्य............

31 ..............................................................................................
....................श्रीशेष ( ख ) नास्ति ७ ७ ७ त्रु ( त्रि ) भुवनजनतापूज्यपादारविंदं स्नात्वा श्री......

§ 'तपोगिरौ' असें वाचावें. मि. भा. च्या छापील पोथींतहि तपगिरि असेंच नांव दिसतें. पण दुसऱ्या हस्तलिखित दुर्दरसिंदूरगिरिमाहात्म्यात तपोगिरि असें शुद्ध नाव दिलें आहे.

32 ...............................................................................

......ऽ ऽ ऽ लत्य (?) नलां समयमभयः शंखपाण्यंतिकस्थः ॥ त्राममितीर्थप्रभवां विभूतिं

33 ...............................................................................

.......................... ......म्य (म्ब) तीर्थे नरः स्नात्वा पूजयित्वां-वि(वि)कापतिं। अंवि(वि)कानाथसदने याति भोगैकभूमितां ॥ अधिगम्य वरुणतीर्थं

34 ...............................................................................

ऽ ऽ वरुणादि लोकपालैर्व्वदितचर[ण].. स्व (?) रिशरणं। यत्शुक्रतीर्थेऽप्यभिषेकभाजां जायेत पुन्यं (ण्यं) नरपुंगवानां। तदश्वमेधादिमहामपा (खा) नामोघैर्न लभ्यं न तपोभि—

35 ऽ रुग्रैः ॥ ती [र्थं] नृसिंहस्य कथं [चि*] दाद्यैः पु [ण्यैः*] समासाद्य विशुद्धमूर्त्तेः। नरस्य लोकत्र (त्रि)तये करस्थं किमीप्सितं नास्ति दुरापमन्यैः ॥ अष्टमे च कुरुक्षेत्रनाम्नि तीर्थवरे नरः। निमज्य ब्र (ब्र)-ह्महत्यादिमृजा शुद्धो दिवं ब्र—

36 जेत् ॥ तीर्थपंचकमिहाचलराजेयत्रिलोकविदिते विदि [ता]ख्यं। तत्प्रभावकथने न समर्थो देवसार्थगुरुरस्ति न सोऽपि ॥ लक्ष्मीतीर्थं तेषु मुख्यं दुरापा लक्ष्मीर्न स्यान्मज्जतां यत्र तूर्णं। यावज्जीवं पातकोद्भूतिहेतुप्रोद्य[द्दु]ष्पो (:खो) द्रेकदारिद्र्यभाजां ॥

37 किं हंसतीर्थस्य तथा प्रभावः प्रभूतपुण्योज्य(ज्ज्व)लकेतनस्य। द्या [ख्या] यते यज्जलपानतोऽपि हंसो हृदिस्थो विमलत्वमेति। श्रीचक्रतीर्थ-महिमानममानमुर्व्यां गुर्व्यां प्रवक्तुमपि कस्य नरस्य शक्तिः। यस्य स्वयं भगवता हरिणा स्वचक्रं रक्षार्थमुद्यतमकल्पि

38 सुदर्शनाख्यं ॥ स्नात्वा धनुस्तीर्थजलं धनुश्च प्रदाय हेमाद्रिकृतं स्वशक्त्या। नरो विदूरीकृतपापराशिः श्रीशार्ङ्गपाणेः सदनं प्रयाति ॥ तीर्थे पितृणां पितृतीर्थनाम्नि स्नात्वा च कृत्वा पितृतर्पणादि। कोटिं पितृणां नियतः (तं) पवित्रीकुर्व्ये (र्व्ये) ति दिव्यं हि पदं पितृ—

39 णां ॥ गिरेरपाच्यां दिशि वाजिमेधतीर्थे समर्थेऽखिलतीर्थसार्थात्। नरो निमज्ज्यांगनया समेतस्तनूभवानाशुलभेत धन्यान्। या ररक्ष कलिकालतो बलाद्धर्ममूर्मिकरपंकजैर्नदी। सा तथास्य कलिपेति विश्रुता संनिधौ कलिमलं हरत्यलं ॥ सुरनदी च सुरौघ—

40 समाश्रिता निकटतोऽस्यवहत्यचलस्य सा । सुरनिकेतनभोगसमृद्धिदा
सकृदिवाचमनादिकृतां नृणां ॥ कलिपासुरनद्यंबु ( बु )संगाद्‌गार्कजांवु-
( बु )नोः । संगं न गणयंत्युच्चैर्मनुल्य ( ष्य ) मुनिदेवताः ॥ नाश्चर्यमस्मि
न्माणिकालकुंडं तीर्थोत्तमं प्राप्य समस्तसिद्धीः ।
41 प्राप्नोतिमर्त्यःखलु मुक्तिरस्य प्रसादतः साऽपि न दूरसंस्था ॥ मोक्षकुंड
समासाद्य दक्ष ( क्षि ) णस्यां महीभृत । दुर्लभोऽपि भवेन्मोक्षः सुलभ
प्राणिनां क्षणात् ॥ श्रीरामतीर्थं यदिहास्ति तीर्थं साक्षात्सदर्थप्रथितप्रभावं।
तस्याप्लुतिप्रोज्ज्वपुन्य ( ण्य ) राशे§फ्फलमवाता दशकंधरा—
42 रिः । एकादशीवासरवासभाजां तीर्थे शुभार्थे दशकंठशत्रो । मुक्तिर्व
राकी करपंजरस्था करोति सेवां गृहसारिकेव । यत्कार्तिके मासि नरं
निमज्य श्रीरामतीर्थे दशकंधरारिं । भक्त्या प्रपश्येन्न शरीरकोशे कीटत्व
मायाति तदन्तरात्मा ॥ सकृद्रामगयाश्राद्ध गिराविह क—
43 रोति यः । लभन्ते पितरस्तस्य मुक्तिमत्यंतदुर्लभां ॥ श्रीरामचंद्रस्य
समीपतोऽहि सिंदूरवापी सुकृतप्रपा सा । यस्या विशुद्धेन विलोकनेन
विजित्यनाकं सुमुपैतिमुक्ति ॥ कर्पूरवापी सुकृतप्रवाहपूरेणपूर्णा किमु
वर्णनीया । देवस्य सीतादयितस्य पार्श्वे दास्यं हि यस्याः कुरुतेऽपि
44 मुक्तिः ॥ काशो नोज्जयिनी न चापि मथुरा नो द्वारका नो पुरी तद्वत्पुण्य-
भरं प्रयच्छतिनृणां वासेन नित्यायुषा । यद्वद्वासरमेकम(?) क्षितिकृतां
सिंदूरभूमीधरः श्रीरामस्य पदारविंदयुगलस्पर्शेन सर्वोत्तमः ॥ जगन्मंगल
माधत्ते यस्य कुंभद्वयी स्मृता । गजेन्द्रवदनः
45 साक्षादत्रास्ते रामकांक्षया ॥ [ आस्ते? ] धर्म्मेश्वरो नित्यं स रामस्य
गिराविह । पीडितं कलिना धर्मं य कृपालुरपालयत् ॥ श्रीरामचंद्रस्य
करेण चंद्रहासाद्धतः प्राप्य पदं मुरारेः । स शम्बु(म्बु) कः शूद्रमुनिर्महीभ
राजेऽत्र धूम्राक्ष इति प्रसिद्धः ॥ पश्यन्ति मुक्तीश्वरनामधेयं शिवं शिवा—
46 नाथमिहाचलेन्द्रे । शिवव्रतस्थाः शिववासरे ये शिवत्वमायांति शिवालये
ते ॥ गोपीजनानंदसमुद्रपूर्णचंद्रो विनिद्रोज्य(ज्ज्व) लपद्मनेत्रः । गोपाल-
मूर्तिर्जगदेकमूर्त्तिर्वसत्यसावत्र धराधरेन्द्रे ॥ अतीवतेजः प्रसरप्रततं जग-
त्समग्रं कृपया ररक्ष । योऽयं चतुर्थोऽवतरोऽच्युतस्य श्री—
47 मान्नृसिंहोऽपि वसत्यमुष्मिन् ॥ सप्तांभोनिधिपूरदूरपिहितं वि( वि )भ्रद्धरां
दंष्ट्रया योऽयं भाति सरोजिनीदलनिभो दन्तेन यद्वऽ§न्मयन्। यंरोमान्तर-

§ पुण्यराशेः-फलप्रदाता—असे वाचावें

§ कदाचित् 'उन्मनयन्' असा पाठ विवक्षित असेल.

गुतयासह्वखिनो देवर्षयस्तुष्टुवुर्कल्पान्ते दशकंधरारिसद्ने सोऽत्रादिकोल: प्रभु: ॥ अनन्यलभ्यामतुलां सपर्यां नित्यं

48 परित्यज्य महेन्द्रदत्तां । श्रीमान्नृपंप्पंक्तिरथोपि पुत्रप्रीत्या वसत्यत्र गिरीन्द्रसानौ ॥ सुतौ श्रीरामचंद्रस्य गिरौ कुशलवाविह । दधाते कल्पवृक्षत्वं भक्तिभाजां जगत्प्रभू ॥ मातरोष्टा महासिद्धिनामधेयोपलक्षिता: । अत्र तिष्ठंति भक्तानामणिमाद्यष्टकप्रदा: ॥ कल्पान्ते कवली-

49 करोति सकलं त्रैलोक्यमल्पेतरज्वालाजालकरालकालवदनो यर्ष्कालि कार्कलिभू: । सिन्दूराचलमीक्षणं क्षणमपि क्षीणास्य (?) वासस्पृह: श्रीरामस्पृहया करोति भगवान्किं वा महाभैरव: ॥ पंचास्यं चंद्रमौलिं दशभुजमुदयत्कोटिभानू—

50 दयश्री: ..वरशरधनु: शूलप (ख) ट्वांगहस्तं [।] हृत्पद्मे भक्तलोकाभयवरदकरं चिन्तयन्यं नर: स्यात्रैलोक्ये सिद्धिसम्राड्वसति पवनज: सोऽत्र रामैकभृत्य: ॥ मालां पुष्पमयीमिव क्षितिमिमां वि (बि) भ्रच्छिरोभिर्विभु: श्रीरामावतरे हरे: सहचर: शंखोऽप्यशंखात्मक: । आस्ते सोऽ [ त्र ] स—

51 मस्तभक्तजनतातत्तन्मनोवांछितं संयच्छन्जनकाधिराजतनयानाथांतिकेलक्ष्मण: ॥ यन्नामस्मरणात्प्रयाति निपि (खि) ल: पापाद्रिरुच्चै: क्षयं या विश्वैकपतिव्रताध्वनि गुरुर्देवी दयैकापगा [ । ८ ] या शापेन निनाय भस्मकणिकाभूयं न लंकापतिं कर्त्ता मे दयिताऽ [ स्य ]

52 नाशमिति साप्यत्रास्ति रामान्तिके ॥ इहाचलेंद्रे दशकंठशत्रोर्विलोक्य मूर्ती: खलु ..मर्त्य: । [ प्रयाण ? ] काले न करोति भीतिं [ कान्तासमं ? ] संहृतिघोरमूर्त्ते: ॥ भक्त्या महत्या प्रभुमादिरामं जगत्स्तुपा (वा) रामतनुं निरीक्ष्य । नर: सुरेन्द्रादिकरोपनीतपूजाग्र्यपात्रत्वमु [ पैति ] [ नि ? ]

53 त्यं ॥ श्री [ भो ] गराममभिरामतनुं निरीक्ष्य क्षीणापि (खि) लाघसरणि: शरणे मुरारे: । भोगा [ नभंगुररसा ]न्सुचिरं विचित्रान्प्राप्नोति कल्पशतमल्पितदेवराज: ॥ दृष्ट्वा प्रकृष्टमहिमानमनन्तभक्त्या तं गुप्तराममतिगुप्तपदं च किंचित् । प्राप्नोति यत्तदिह किं ननु देवरा [ जो ]........

१ स्तुष्टुवु कल्पान्ते असें वाचावें.

२...श्रीमान्नृपपक्तिरथो—असें वाचावें.

३ ' य ८ कालिका—' असें वाचावें.

४ ' संयच्छन्जनकाधिराज ' असें वाचावें.

54 तद्गुरुस्थगिरस्तोऽपि सोऽपि ॥ श्रीशंखरामं प्रणिपत्य मर्त्यः पदं सम भ्येति हि शंखपाणेः । विशुद्धभावेन हृदा महेंद्रमुख्यादिदेवैरभिवंद्यमानः जगन्महानंदनिदानमीशं श्रीमैथिलीलक्ष्मणदेवयुक्तं । श्रीरामदेवं प्रणिपत्य मूर्ध्ना नमस्कारिष्ये (ष्यै) लपतैर्व्वं ॥

55 देव श्रीरघुनंदन त्र(त्रि)जगतामद्वैतवादप्रभो भास्वद्वंशमहाविभूषणमणे कारुण्यरत्नाकर । त्रैलोक्यारिदशास्यकंठदशकच्छेदोल्लसत्पाणये पा... ...................ते त्रैलोक्यगोप्त्रे नमः ॥ देव [ क्षी ] रसमुद्रसांद्रलहरी......[नि]र्मथ्य हृत्कीर्त्तयेत्ताहग्गुण—......

56 विश्वैकभर्त्रे नमः ॥ श्रीरामाय हनुमदादिवदनांभोज ⏑ — — ⏑—भर्त्रे श्रीजनकक्षितीन्द्रतनयानंदैककंदायच । देवत्वां स्फुरदुग्रशोपण ⏑— — — ⏑ — — ⏑—, — — दारचाद्रुस्तु...

57 ध्वस्ता (?) त्यन्तसुजात्यरत्नचयभाभ्राजिष्णुपादांबु(बु)जं...........देव .................रि......पाद......ल........... जाम्रुप्रिहारो......... .........................................................निपि(खि)लं विलोक्य नाशक्षम धाम्ना येषु सहस्त्रपूर्णरुचिम.........मं नुम ॥.............

58 विस्पंरोगं जगतीनाथ...........भक्तजन.........नामस्मृतेः । गव्यूतिप्र .................................................................................. देवत्वां करुणां...........................सिंदूरजं रेणा शमयन्तम...

59 क्षो भुजा (?) तेजसां । कुर्वाणेन मदिष्टवृष्टिममृतासारा......श्रोन्माथिनीं.........मार्थितदा (?) प्रभाकर.......................................... ........................................................ म्वि (म्वि)कासनु...... सिंदूराचलमौलिकलिप......... ..........................

60 प्रतिष्ठं विभुं कुंभोद्भूतमुनीश्वरेण भगवन्वंदे मुदे नित्यशः.........त्वां पुरुषं पुरातनमजं तत्त........................................................ भगवते भक्त्या नमोऽस्तु प्र [ भो* ]. ..................................

61 रामदेवं य [:] स्तौति मर्त्यः पवित्रधीः । सिंदूराचलमौलि.......................... ..................... काशीमभ्र .... .. ................................ फल्पांतावधिनिर्मलासिलजला वृक्षा.........................................

62 ल' । आस्ते या (बा,लसमुद्र एव विलसद्देवालयाली मिल.......................... ...जलो जलेक्षणकृतां देवा .. ................................ ......... ........ध[?]न्यया समभ्यर्च्य नरोभक्त्यान.........................

63 विद्वान् । दुर्लभां लभेत कां कां न हि सिद्धिं विशुद्ध [ धीः ?¶ ]
............रगणितानि देवश्रिरा. ........... ....... ... ............
............भरणं गरीयः श्रीराघवोऽमंस्त कृतार्थमुच्चैः । ¶

## परिशिष्ट

शिलालेखात उल्लेखिलेल्या देवळांची, नद्यांची व तीर्थांची यादी.

**रामेश्वर** रामटेक गावात रामाळे नावाच्या तळ्याजवळ असलेलें हें शिवलिंग होय. सिं. मा.§ ( अ. ६, श्लो. ४ ) मध्यें ही रामेश्वर नामक शिवलिंगाचा उल्लेख आहे, पण तें नंदिवर्धन गावात आहे असें म्हटलें आहे.

**घंटेश्वर** सिंदूरमाहात्म्यात ( २,१ ) हा रामटेकच्या पूर्वेस आहे असें म्हटलें आहे. अ २ श्लो. १९ वरून हा कल्पिा व सुरनदी यांच्या संगमाजवळ होता. तें देवालय आता खिंडसी तलावात बुडालें आहे.

**सुधेश्वर** सिं. मा. ( २,१ ) मध्यें याला सिद्धेश्वर म्हटले आहे. अ. ३ श्लो. २२ वरून सुधेश्वराचें मंदिर दक्षिणेस होतें असें दिसतें. नंदिवर्धनात पुष्करणीजवळचें मंदिर विवक्षित असावें.

**केदारेश** हें मनसर येथील शिवालय होय.

**आंजनेय** याचें मंदिर उत्तरेस होतें, ( सिं. मा. २,१ ) सध्या जपाळें तीर्थाजवळ हनुमान आहे तोच येथें विवक्षित असावा.

**शंखतीर्थ** हें अंबाळ्याच्या पूर्वेला आहे ( सिं. मा ५,४ ).

**अग्नितीर्थ** हें अंबाळ्याच्या आग्नेयेस आहे ( सिं मा. ५,४ ).

**अंबतीर्थ** हें अंबाळा तळ्याच्या दक्षिणेच्या काठावर आहे ( सिं. मा. ५,४ ).

**वरुणतीर्थ** हें अंबाळा तळ्याचा पश्चिम काठावर आहे ( सिं. मा. ५,५ ).

---

¶ या पुढील बारा ( ६४–७५ ) ओळी अतिशय खंडित झाल्या आहेत त्यामुळें त्या येथें दिल्या नाहींत. ६९ व ७१ व्या ओळींत. माइदेव नामक अधिकाऱ्याचा उल्लेख आहे. ७० व्या ओळींत 'मैथिलि नाथरतुष्यति येन मे कुरु...' असे शब्द स्पष्ट वाचता येतात, त्यावरून श्रीरामचंद्राला संतोष होईल असें एखादें कृत्य गडावर करण्याविषयीं राघवदेवानें माइदेवास आज्ञा केलेली दिसते.

§ श्रीयुत जोशी यांनी काही वर्षांपूर्वी छापलेल्या पोथीचा येथें सिं. मा. असा निर्देश केला आहे. क्रमातील आकड्यांपैकीं पहिला अध्यायाचा व दुसरा श्लोकाचा आहे.

**शुक्लतीर्थ** हें अचाळ्याच्या पश्चिमेस आहे. ( सिं. मा. ५,५ ) येथें यात्रेच्या सहाव्या दिवशीं स्नान करतात ( सिं. मा. ५,२२ ).

**नृसिंहतीर्थ** हें अचाळ्याच्या उत्तरेला आहे ( सिं. मा. ५.५,२५ ).

**कुरुक्षेत्र** हे अचाळ्याच्या उत्तरेस आहे ( सि मा. ५,६ ).

**लक्ष्मीतीर्थ**
**हंसतीर्थ** } यांचीं स्थानें सध्या निश्चितपणें समजत नाहींत.

**चक्रतीर्थ** याला सिं मा. (७,२६ )त चक्रालय म्हटलें आह येथें चक्रेश्वर नामक शिवालय होतें. ( सिं. मा. ७,२६ ) सध्या याला चाकोरडे म्हणतात. हें रामगिरीच्या दक्षिणेस एक मैलावर आहे.

**धनुस्तीर्थ** हें चक्रतीर्थाजवळ आहे. ( सिं मा. ७,२८ ) याच्याजवळ धन्वीशाचे मंदिर आहे. (सिं. मा. ७,३४) याच्याजवळ पिप्पल नामक तळें होतें (सिं. मा ७,३५)

**पितृतीर्थ** सिं. मा. ( ४,५ ) त हें तीर्थ पर्वतामध्ये ( शैलस्याभ्यन्तरे ) आहे असें म्हटलें आहे याला रामगया असें नतर म्हणू लागले ( सि. मा. ४,१५ ) सध्या अचाळ्यापासून खिंडसी तलावाला जाण्याचा जुना मार्ग आहे त्या मार्गावर हें तीर्थ आहे. सध्या त्याला गायखुरी म्हणतात कारण सिंदूरगिरिमाहात्म्यात वर्णिलेल्या पादुका खडकावर उमटलेल्या गाईच्या पावलासारख्या दिसतात.

**वाजिमेध** हें गडाच्या पश्चिमेस आहे असें प्रस्तुत शिलालेखात ( ओ. ३९ ) म्हटलें आह नंदिवर्धनास राज्य करणाऱ्या राजानें येथें अश्वमेध केला, त्याचा यूप व विहीर जवळ दिसतात असें सिंदूरमाहात्म्यात ( ८–७,१४ ) म्हटलें आहे. हें रामटकहून नंदिवर्धनास जाण्याच्या वाटवर लागतें

**कलिपा नदी** रामटकच्या उत्तरेस वाहणारी नदी–प्रस्तुत लेखात कलीपासून धर्मानें रक्षण केलें म्हणून तिला हें नाव प्राप्त झालें असें म्हटलें आहे. याच्या उलट सि मा ( ३,२–१६ ) मध्यें धर्माचा पाठलाग करणारा कलि रामाच्या हुंकारानें नदी झाला. त्यामुळें सुरनदीशीं संगम होईपर्यंत कलिपेचे जल अपेय आहे असें म्हटलें आहे.

**सुरनदी** हिला सिं. मा मध्यें एके ठिकाणीं सूर्यनदी ( २,२ ) व इतरत्र सुरनदी (२,१६) म्हटलें आहे. हिचा पुढें कलिपेशीं संगम होतो.

**मणिकालकुंड** मणिकालात स्नान करून हिडिंबेची पूजा करावी असें सिंदूरमाहात्म्यात (२,६) म्हटलें आहे. सध्या याला मनसर म्हणतात. सध्या येथें हिडिंबेचें मंदिर नाहीं, पण या तीर्थाला हिडिंबातीर्थ असेंहि म्हणतात

**मोक्षकुंड** हें दक्षिणेस आहे असें प्रस्तुत शिलालेखात म्हटलें आहे (ओ. ४१). हें दक्षिणद्वाराजवळ आहे. त्याजवळच्या देवीला मोक्षजा म्हणतात ( सिं. मा. २,४ ). हें नगरधनच्या किल्ल्यामध्यें असावें.

**रामतीर्थ** याचें प्रथम ईशाल असें नाव होतें. यालाच पुढें पुष्कर व शेवटीं रामतीर्थ म्हणू लागल. ( सिं. मा. १५,४० ) कार्तिक महिन्यात विशेषत: शुक्लपक्षात येथील स्नानाचें विशेष महत्त्व आहे ( सिं. मा. १५,५१ ). सध्या याला रामतळें किंवा रामपुष्कर म्हणतात.

**सिंदूरवापी** ही गडावर नृसिंहमंदिराच्या ईशान्येस आहे ( सिं. मा. ५,२ ). सध्या हिला सेंदूरवानली म्हणतात व येथून पूजेचें व पिण्याचें पाणी नेतात. हिला स्थानपोथींत सिंदुर्वापी म्हटलें आहे.

**कर्पूरवावी** ही गडाच्या खालीं जैनमंदिराहून घटेश्वरास जाण्याच्या रस्त्यावर आहे. हिला स्थानपोथींत कापूरवावी म्हटलें आहे.

**गजेंद्रवदन** याचें मंदिर शेवटच्या प्राकारात मारुतीच्या मंदिरासमोर आहे.

**धर्मेश्वर** याचें मंदिर लक्ष्मण–मंदिराच्या दक्षिणेस आहे.

**धूम्राक्ष** याला सिं. मा. ( ५,८ ) मध्यें धूम्रपकेश्वर म्हटलें आहे. प्राकाराबाहेर दक्षिणेच्या पटारावर याचें मंदिर आहे.

**मुक्तीश्वर** रामलक्ष्मणाच्या देवळाला प्रदक्षिणा घालताना पश्चिमेस याचें मंदिर लागतें.

**गोपाल** नगारखान्याजवळ याचें मंदिर आहे.

**आदिकोल ( वराह )** याचें मंदिर पूर्वदिशेस आहे ( सिं. मा. १६,६५ ). गडावर पूर्वेकडून जाताना तें उजव्या बाजूस लागतें.

**दशरथ** याचें मंदिर सध्या गडावर नाहीं. सध्या दशरथाचें म्हणून जें मंदिर दाखवितात त्यात हरिहराच्या मूर्ति आहेत.

**कुशलव** ह्याचें मंदिर सध्या गडावर नाहीं. सध्या याचें म्हणून दाखवितात त्या मंदिरात गरुडारूढ नारायण आहे.

**महाभैरव** याचें मंदिर उत्तरेस होतें ( सिं. मा. १६,६५ ). भैरवदरवाज्याजवळ याची मूर्ति आहे. भैरवाचें मंदिर भोगरामाच्या मंदिराजवळ होतें असें स्थानपोथींत म्हटलें आहे.

**चंद्रमौलि** अंबाळ्याचे पश्चिमेस सूर्यनारायणाच्या देवळाजवळ पचमुखी महादेवाचें देऊळ आहे.

**भोगराम** अंबाळ्याकडून गडावर जाणाऱ्या रस्त्यावर डाव्या बाजूस लागणारें हें मंदिर होय. याच्याजवळ महानुभावाचें देवालय आहे. ' भोगरामाच्या मंदिराजवळ

श्रीचक्रधरानीं दहा महिने वास्तव्य केलें. भोगरामाचें देऊळ पूर्वाभिमुख आहे' असें स्थानपोथींत म्हटलें आहे.

**गुप्तराम** याचें मदिर पुष्करतीर्थाजवळ आहे ( सि. भा, १०-११ ). सध्या याला कपटराम म्हणतात. धूम्रेश्वराच्या मदिराला गावातून गेलेल्या वाटेवर हें मदिर लागतें. स्थानपोथींत याचा उल्लेख आहे. पण तेथें गुप्तरामाचें मदिर भोगरामाच्या ईशान्येस आहे असें म्हटलें आहे तें बरोबर दिसत नाहीं

**शंखराम** याचें निश्चित स्थान सापडत नाहीं. कदाचित् शखतीर्थाजवळ असावें?

# मराठशाही लष्कर

## ( इ. स. १७९५ )

## [ खड्यांच्या मोहिमेवर हजर असलेल्या मराठी लष्कराबाबत मॅलेटनें सादर केलेला रिपोर्ट ]

[ लेखक—वि. गो. दिघे, M. A., पुणें ]

[ "मराठशाही लष्कराची उभारणी, घटना, त्याची शिस्त, व्यवस्था ही पाश्चात्य पद्धतीपक्षा अगदीं निराळी आहे, मी स्वत जातीनें मराठी सैन्याबरोबर हजर राहून प्रत्येक गाष्ट पाहिली आहे, याचें विस्मरण हाऊ नये म्हणून हें टिपण तयार करतों." अशी सुरुवात करून पुणें दरबारीं अकरा वर्षे ( १७८६–१७९७ ) वकिलीवर असलेल्या सर **चार्लस मॅलेट** यानें एक अत्यत महत्त्वाचा, माहितीपूर्ण रिपोर्ट आपल्या वरिष्ठाना सादर केला. पेशव्याच्या निशाणाखालीं एकत्र होऊन सर्व मराठी फौजा ल्ढल्याचा खर्ड्यांचा रणसग्राम हा शेवटचा प्रसग हाय. यानतर आठच वर्षांत **वसईचा** तह मान्य करून बाजीराव आपलें स्वातत्र्य गमावून बसला व **असई, लासवारी, आडगांव** या ठिकाणीं शिंदे भोसल्याचा पाडाव करून इग्रजानीं मराठी सयुक्त साम्राज्याचा निकाल लावला. साहजिकच इग्रजापुढें मराठ इतके निष्प्रभ का ठरले असा मनात विचार येतो मराठ्याचे गुणदोष, त्याच्या लष्कराचें स्वरूप, त्याची शिस्त याचा अभ्यास चिकित्सापूर्वक, शास्त्रशुद्ध, झाल्याशिवाय या प्रश्नाचें समाधानपूर्वक उत्तर मिळणार नाहीं. राष्ट्राचा उत्कर्षापकर्ष व्यक्तींवर फार थाड्या प्रमाणात अवलबून असतो. मराठी लष्करासबधतचा हा महत्त्वाचा खलिता सर **जदुनाथ सरकार** यानीं इडिया ऑफिसच्या दप्तरातून मिळविला व ता पुणें रेसिडन्सीच्या निवडक पत्रव्यवहाराच्या चौथ्या भागात प्रसिद्ध झाला आह. वाचकाच्या सोयीसाठीं त्याचा अनुवाद येथें दिला आहे. सुरुवातीस मॅलेटनें दिलेली पागा पथक्याची याद गाळली आहे. ]

प्रथमच या लष्कराचें सख्याबल किती असावें हा प्रश्न उद्भवतो. या वेळीं पेशव्याच्या निशाणाखालीं गायकवाड व बुदेले सोडून मराठशाहींतील बहुतेक प्रमुख सरदार जमा झाले आहेत. माझ्या माहितीप्रमाणे हुजरात व पथकें मिळून खुद्द पेशव्याचे सत्तर हजार, हिंदुस्थानातील फौज सोडून शिंद्याचे पचवीस हजार, होळकर दहा हजार, भोसले पधरा हजार,

व परशुरामभाऊ पटवर्धन सात हजार म्हणजे सर्व मिळून एक लाख सत्तावीस हजार सैनिकांचा तळ येथें पडला आहे.

ही सर्व फौज एका सेनानीच्या हाताखालीं नाहीं. शिंदे, होळकर, भोसले, पटवर्धन यांची आपापल्या विभागावर पूर्ण हुकमत चालत असून, कित्येक पथक्येहि आपल्या पथकापुरते स्वतंत्रच आहेत. राहिलेली पेशव्याची सरजामी व नकदी किंवा इतलाखी फौज या फौजला खर्चाकरिता सरजाम तरी लावून दिलेला आहे किंवा सरकारी तिजोरींतून पैसा मिळता ज्या धर्तीवर पेशव्याची फौज उभारली आहे त्याच पद्धतीवर सरदाराच्या सैन्याची उभारणी झाली आहे उदाहरणार्थ, मराठी लष्करात शिंदे होळकरासारखे, मोठाले सरजाम जहागिरी मिळालेल्या सरदाराच्या फौजा आहेत, परगण्याचें उत्पन्न खर्चाकरिता लावून दिलेल्या पाग्याच्या पागा आहेत आणि शाह मीरखान, मसिअ नेहोना, बाबा घिरोळकर यांची इतलाखी किंवा नकदी फौजहि आहे हाच प्रकार खुद्द शिंदे–होळकर यांच्या फौजात दृष्टीस पडतो. सरदाराच्या फौजात छोट्या जहागिरदारांचीं पथकें, सरजामी पागा व इतलाखी फौज हे सर्व प्रकार आढळून येतात जहागीर देताना ठरलेली संख्या पथकात नेहमीं आढळेल असा मात्र नेम नाहीं बहुश ही संख्या कमीच भरते. पथक्यात नकदी व इतलाखी फौज ही सरजामी फौजेपेक्षा कमी दर्जाची समजतात पण त्यामुळे नकदी फौजेच्या सरदाराच्या अधिकारास बाध येत नाहीं, त्याची आपल्या पथकावर इतर सरदाराप्रमाणें पूर्ण सत्ता असते त्याच्या मार्फतच पथकातील लोकाना पगार मिळतो. दर माणसीं ठराविक मासिक वेतन व सरदाराना सालीना तैनात अशी योजना असते देखरेख राहावी म्हणून सरकारातून प्रत्येक पथकाला दिवाण, फडणीस इत्यादि अधिकारी नेमलले असतात पण सरकारातून पैसा नियमितपणें मिळण्याची मारामार असल्यामुळे इतलाखी फौजचे सरदारसुद्धा, सरकारी तपासणी चुकविण्याकरता अनेक युक्त्या लढवितात. लाचलुचपत सर्व अधिकाऱ्यात सर्हास चालू असल्यानें १०० चे पथकात जेमतेम निम्मे लोक असावयाच बिचाऱ्या शिपायाच्या हातात पगाराची पुरती रक्कम कधींच पडावयाची नाहीं

पथकात शिपायाची संख्या ठराविक असावी असा सुद्धा निर्बंध नाहीं एका पथकात पन्नास स्वार असतील तर दुसऱ्यात पाचशें ! प्रत्येक पथक्या आपल्या मगदुराप्रमाणें आपलें पथक तयार करील दरमाही शिरस्ता वाटतानादेखील ता एकाला वीसच रुपये देईल तर दुसऱ्याला दोनशें ! वास्तविक पाहिलें असता पागाची उभारणी करताना जनावर व हत्यार, सरदाराचें वा सरकारी असावें असा सामान्य नियम, पण तो नहमींच पाळला जातो असे नाहीं. प्रत्येक पथकात स्वतःच्या मालकीचा घोडा व हत्यार असलल किती तरी शिलेदार असतात, आणि मराठी सैन्यातील प्रत्येक शिपाई जरी आपल्याला सरदाराच्या तालाचा समजतो, तरी बारगिरापेक्षा § शिलदाराचा दर्जा मोठा समजतात इतलाखी फौजप्रमाणें देख रेख ठेवण्यासाठीं प्रत्येक सरजामी पागवर दिवाण, फडणीस इत्यादि सरकारी अधिकारी असतात पण देखरेख करण्याएवजी हे अधिकारी लाचलुचपतीला इतके सोकावलेले असतात कीं,

§ सरकारी जनावर व हत्यार वापरणारा सैनिक

घाड्याच्या दाणाचदीमध्यें नहमींच गफ्लत हाते. सागीरभरतीपुरती घाडीं हजर करणें, घोडीं मस्यात खान्त दाखल दणें, इत्यादि प्रकार हमेशा उघड उघड चाल्तात सरसारहि हें मर्व जाणून असतें आणि काहीं वेळेला पागच्या तैनातीची रकम दण्याचें नाकारतें पैसा न पाहाच त्यामुळें सैन्यात वारवार दंगेधाप हातात त्राच पैसा फमडून हानाआड केला असल्यामुळ पथकयासुद्धा प्रसग सहमा निस्तरावर यऊ दत नाहीं तरें, सरकारातून पैसा नियमित न आल्या मुळें त्याला शिपायाना वाटल त्या सरनी सागता यतात गरीब बिचारा शिपाई, एक पथक साडून दुसरीकड नाकरी पाहाता व अशा रीतीनें त्याची सर्वस्वी नागवणूक हात, शिवा खर्च भागविण्याकरिता आपल्या पथकाच्या जमादाराकडून किंवा कारकुनाकडून भारी दराने कर्ज काढता

बारगीर शिलदाराशिवाय मराठी सैन्यात एकाड्याचा आणखी एक वर्ग आहे एकाडा म्हणज एकटा हे एकाडे मात्या खानदानीच्या घराण्यातील असून आपल्या तैनातीकरिता दान चार पागे बरावर घऊन चाकरीकरिता बाहेर पडतात मोठाले पगार, व बसावयाला आपल्या पागेतील निवडक घाडीं दऊन, जिवास जीव दणार खाडीं म्हणून या एकाड्यास मातबर सरदार आपल्याजवळ चाकरीस ठेवतात

मराठी राउतांचीं हत्यारें म्हणज तलवार, भाला, ताड्याची बदुक आणि क्वचित् धनुष्य बाण तलवार ही प्रत्यकाजवळ असावयाचीच भाल्याची जागा आता ताड्याच्या बंदुकीने पटकावली आहे प्रत्येक जण बहुतेक बदुक बाळगता पण जातिवत एकाडा किंवा शिलदार फार झालें तर दान पल्लदार तलवारीशिवाय दुसरें हत्यार जवळ ठवणार नाहीं शिलपास व हत्यार स्वाराच्या मालकीचें असल्यामुळे त्याच्यात एक तऱ्हा कधीं आढळावयाची नाहीं प्रत्यक जण आपल्या आवडीप्रमाणें व मगदुराप्रमाणें आपला जामानिमा तयार करील

प्रत्यक पथकाबरोबर फक्त एक राहुटी, शामियाना याशिवाय डेरे तबू दिसावयाच नाहींत राउताच घाडे समारासमार बाधून जा रस्ता तयार हाता त्या रस्त्याच्या टोकाला राहुटी उभी करतात या राहुटीचा उपयाग राऊत फक्त पाऊस वाऱ्याच वळीं करील इतर वळेला सकाळ सध्याकाळ ही राहुटी म्हणज शिलदाराची बसण्याउठण्याची जागा राउताचा मुक्काम नहमी आपल्या घाड्याजवळ तथेच ता आपलीं हत्यारें, जामानिमा ठेवील, तथेंच जवणखाण उरकल व तथेच ता रात्रीची विश्रांति घेईल पथकाबरोबर कणखर तट्टें असतात कूच करून दुसरा मुक्काम सैन्य गाठतें तों मातदार ही तट्टें आसपास फिरवून कडबाकाड, घासदाणा जमा करून आणतात किंवा स्वाराचें सामानसुमान मुक्कामाला पोंचतें करून घासदाण्याच्या शोधाथ बाहेर पडतात इतकेंहि करून जनावराच्या चाऱ्यापाण्याची सोय झाली नाहीं तर स्वत राऊत बाहेर पडून आपल्या जनावराची साय लावील आणि नतर स्वत च्या सोइकड पाहील

आतापर्यंत मराठी फौजेचें म्हणज घाडदळाच वणन झालें अलीकड मराठ्यांनीं पायदळ व तोफखाना उभारण्यास सुरुवात केली आहे, पण या बाबतींत त्यांनीं सवस्वी पाश्चात्याच्या पद्धतीचें अनुकरण केलें आहे एथें त्याचें वेगळें वर्णन करण्याची जरुरी नाहीं

## सैन्याचें कूच

आदल्या दिवशीं चिठ्या पाठवून सरदाराना कूच करण्याचा हुकूम कळविण्यात येतो व रात्रीं फौजेंत दवडी पिटून सर्वांना तो जाहीर करतात. दुसऱ्या दिवशीं पहाटे चार वाजता माठी नौबत वाजते व सर्वांना सूचना मिळत. थोड्या वेळानें दुसऱ्यानें नौबत झडताच बिनीवाला पेशव्याचें निशाण घेऊन बिनीच्या पथकासहित कूच करतो. शत्रूपासून धाका असल्यास बिनीच्या पथकास दुसऱ्या पथकाचें साह्य मिळतें. बिनीच्या पथकाबरोबर सरदाराच्या बिनीहि बाहेर पडतात व त्यांच्याबरोबर लष्करचा बाजार, बाज लाक, प्याद, तोफखाना व बहिरखुणगे मुक्काम हालवितात. पेशव्याचा बिनीवाला पुढें जाऊन पाण्याची सोय पाहून निशाण रोवून नवीन मुक्कामाची जागा कायम करतो. त्याच्या पाठोपाठ बाजारबुणगे येऊन पोहचतात. कूच करताना शिस्तीचा अभाव असल्यामुळें बुणग्यात एकच गर्दी होत. पेशव्याच्या डाल्याच्या रोखानें प्रत्येक सरदार आपले डेरे तंबू उभारतो. तळावर डेरे तंबू उभारताना शिस्त किंवा व्यवस्थितपणा कसा तो बिलकूल दिसावयाचा नाहीं. घाडी, तट्टे, गाड, उंट, तोफखाना यांचा एकच खच पडतो. नाहीं म्हणावयास मुख्याच्या तंबूसमोरील बाजारचा रस्ता मात्र याला अपवाद असता प्रत्येक सरदारानें मुख्याच्या डाव्या किंवा उजव्या बाजूस आपल्या दर्जाप्रमाणें ठराविक अंतरावर डेरे द्यावे हे ठरलेलें असतें व प्रत्येक जण आपल्या मानाप्रमाणें आपला मुक्काम 'हेड क्वॉर्टर्स' नजीक राखण्यास जागरूक असतो. सरदाराची मुक्कामाची जागा कोठें असावी हे ठरलेलें असलें तरी डेरे उभारताना ती कायम करून अंतर आखलेलें नसतें, तसेंच कोणाची फौज किती आहे हेसुद्धा निश्चित नसल्यामुळें एकच बजबजपुरी माजते नदीकाठीं उताराच्या ठिकाणावर मुक्काम झाल्यास दोन्ही तीरावर फौजा उतरून आघाडी व पिछाडीकड पसरल्या असतात. उजवी किंवा डावी सांभाळली जात आहे किंवा नाहीं इकडच फक्त सर्वांचें लक्ष असतें.

डाला देऊन मुख्याची जागा निश्चित झाली म्हणजे सरदाराचीं निशाणें त्याच्या त्याच्या जागेवर उभारलीं जाऊन त्याच्या अनुरोधानें सरदाराच तंबू ठोकतात व त्याचे बहिरखुणगे त्याच्या आसपास उतरतात. इतके होत तरी सरदाराचा मुक्काम अद्याप पहिल्या तळावरच असता आणि एरॅच तो स्नान, पूजा व सकाळची न्याहारी एक लढानशा राहुटींत आटपता सामान सुमान, राहुट्या सर्व कांहीं बिनिवाल्याबरोबर पाठवून, फौज सरदाराच्या निघण्याची वाट पाहात तयारीनें राहते स्नान, न्याहारी आटपून सुमारें ९-९॥ च सुमारास सरदाराची स्वारी गजारूढ होऊन मोठ्या थाटानें आपल्या फौजेसहित निघत व दुपारीं आपल्या नवीन मुक्कामास पोहांचते ही वेळ सरदाराना सोईची पडत, त्याना मुक्कामावर स्नान, न्याहारी करता येत व वाट चालताना हत्ती किंवा पालखीसारख्या वाहनाची साथ असत. फौजेची याविरुद्ध मोठी आरड आहे एक तर सामानसुमान पुढें गेल्यामुळें राबताना आडाशाला कांहीं राहात नाहीं व भर उन्हाच्या तापात कूच कराव लागतें. यामुळें वैराण मुलखातून कूच होताना माणसाचा फारच गळाटा होता.

वि. गो. दिघे

# लष्कराची छावणी

पेशव्याच्या किंवा मुख्याच्या ढाला नवीन मुक्कामावर दाखल झाल्या की पाठोपाठ लहान मोठ्या सरदारांचे विनीवाले आपापल्या मुख्याच्या ढाला घेऊन हजर होतात व आपली नवी जागा कायम करतात. या नवीन जागा ठरताना दग्धेपणे ठरलेले. गोटातील एका भागामध्ये मात्र व्यवस्थितपणा दृष्टीस पडतो, तो म्हणजे लष्करचा बाजार. मुख्य सेनानी व सरदार यांच्या डेऱ्यासमोर रुंद रस्ता असून त्याच्या दोहों बाजूस पाल उभारून वाणी, उदमी आपली दुकानें मांडतात. या बाजारात हरएक जिन्नस खरेदी करता येतो. हा भाग सोडला तर मात्र बाकीच्या तळास विस्कळित पसरलेल्या जत्रेच्या बाजाराचें स्वरूप येतें. व गर्दीतून मुक्कामाच्या मध्यभागीं पोहोचणें मोठें मुष्किलीचें होतें. शत्रूची जर का एकाकी आवई आली तर गोंधळ विचारायला नको! तोफांचे गाडे या गर्दीतच कोठे तरी मिसळलेले असल्यामुळे तोफा बाहेर काढताना अपघात होण्याचा फार संभव असतो.

डेरे तंबू उभारले गेले कीं, भारदारीचीं तट्टें, उंट, घासदाणा जमा करण्याकरिता बाहेर पडतात. सरदाराची स्वारी मुक्कामावर दाखल होते तो घासदाणा सैन्यात येऊन पोहोचतो. घासदाणा जमा करणाऱ्या टोळ्या मोठ्या धटाईनें गावावर, खेड्यावर, हल्ला करून टोळधाडी-प्रमाणें वाटेवरील मुलुख लुटून फस्त करतात. या वेळीं शत्रूचा मुलुख लुटावयाचा, आपल्या मुलखाला हात लावावयाचा नाहीं असा काहीं निर्बंध राहात नाहीं. दिसेल तेथून लाकूड, सर्पण, गवत, गोळा करावयाचें हें तंत्रदेच कहीचे लोक जाणतात. या मोहिमेंत पेशव्यांच्या तळाच्या १०-१५ मैलांच्या परिघात फौजेच्या पायमल्लीखालीं कित्येक खेडीं उध्वस्त झालीं असून एक तसूभर लाकूड किंवा गवताची काडी या लोकांनीं शिल्लक ठेविली नाहीं असें मला वाटतें. बहुतक कारभार फौजेचा म्हणजे राउताचा. हा असंख्य राउतांचा जमाव कित्येक कोसावर पसरला असल्यामुळें मार्गाच्या ( *Line of communications* ) संरक्षणाची काळजी राहात नाहीं. तसेंच लमाणांचे तांड्याच्या तांडे हजारों बैल घेऊन सैन्याबरोबर हिंडत असल्यामुळे मार्ग चालताना पाण्याशिवाय दुसरी सोय पाहण्याचें कारण नसतें. माघार घेण्याची वेळ आल्यास पिछाडीस वाटेवर तटबंदीच्या जागा, धान्यसामुग्रीचे साठे तयार ठेवण्याची त्याना या कारणानें जरूर भासत नाहीं. गोटाच्या सुरक्षितपणामुळें सैन्याबरोबरील बाजारात सर्व प्रकारचे व्यापार-उदीम, धंदे चालतात. तेथें हरएक जिन्नस मिळतो. त्यामुळे इतर राष्ट्राप्रमाणें मराठ्यांना शिपाईगिरी खडतर, कष्टाची वाटत नाहीं आणि वर्षेच्या वर्षे मराठा शिलेदार घरीं आपल्या गावीं जितक्या सुखानें राहातो तितक्याच मजेत तो सैन्यात असतो. मराठ्यांची राहाणी साधी, त्यांच्या गरजा किती तरी थोड्या व फौजेबरोबर मोठाले बाजार असल्यामुळें लष्करपेशा पत्कर णाऱ्या शिलेदाराच्या रोजच्या राहाणींत काहीं विशेष फरक पडत नाहीं, परप्रांतात सुद्धा तो देशावर असल्याप्रमाणें सुखी असतो. याचा परिणाम म्हणजे इतर राष्ट्रांत दिसून न येणारी अशी शिलेदारीची आवड मराठ्यांत सर्वत्र दिसून येते. या बाबतींत मराठी लष्कर आपल्या रमजी लष्करपेशा वरचढच म्हटलें पाहिजे. मरहट्टीच्या प्रांतातील आपल्या लष्करी छावण्या

ऐषआरामाच्या जागा बनल्या आहेत. सैनिकांना जादा भत्ता चालू असल्यामुळें कामगिरी करून दाखवावी अशी ईर्ष्या राहिली नाहीं. स्वारी शिकारी न करता चैनबाजीकडे सर्वांची प्रवृत्ति आहे. डी बॉयननें शिपायांकरिता उभारलेली ब्रिगेड सुरवातीपासून कामगिरीवर दाखल आहे. आमच्या शिपायांना ज्या सुखसोई आहेत त्या डी बॉईनच्या पलटणांना नाहींत, असें असूनसुद्धा आमच्या पलटणात ज्या सारख्या तक्रारी, कुरकुरी चालू असतात त्या मराठी पलटणात ऐकू येत नाहींत. §

राउताची ही अफाट फौज समुद्राप्रमाणें चोंहोकडे पसरलेली असल्यामुळें गोटाच्या सरक्षणाकरिता आपल्या इंग्रजी लष्करांभोंवती ज्याप्रमाणें खदक, चौक्या, नाकीं दृष्टीस पडतात तशी मराठ्यांच्या छावणीभोंवती दिसत नाहींत. नाहीं म्हणावयास रात्रीच्या वेळीं छत्रिन्याच्या तुकड्या चोंहोंकडे हिंडून गस्त घालतात. शिवाय फौजेचा जथ दाडगा असल्यामुळें एक भाग नेहमींच हरोल म्हणून आघाडीस कूच करतो. जसजशी शत्रूशीं समीपता होते तसतशी या हरोलाची पुन विभागणी करून नुसत्या सड्या फौजेच्या तुकड्या आघाडीस राहातात. हत्याराशिवाय सर्व सामानसुमान कांहीं अतरावर पिछाडीस ठेवून ही जरिदी म्हणजे सडी फौज नावाप्रमाणें अगदीं सुटसुटीत राहाते. ११ मार्चला निजामाशीं जे युद्ध झालें त्या वेळीं मराठी सैन्याच तीन गोट (कँप) होते. सड्या फौजेच्या पिछाडीस २० मैल पाठीमागें मुख्य सैन्याची छावणी होती व या दोहोंमध्यें आघाडीस असलेल्या विभागाचे बाजारबुणगे होते. या सैन्यविभागणीचा फायदा मराठ्यांप्रमाणें घोडदळ वरचढ असलेल्या शत्रूला मिळेल. पण ज्या सैन्यात पायदळ मुख्य आहे किंवा घोडदळ असूनसुद्धा तें मराठ्यांपेक्षा हलकें आहे त्याला त्याचा कांहीं उपयोग नाहीं. इंग्रजी पलटणाची पायदळाची छावणी वेरून वेढा घालणें मराठी फौजांना सहजासहजपणामुळें सुलभ आहे. आधींच मराठी फौज म्हणजे स्वारांचा भरभार आणि त्यांत पेंढाऱ्यांची भर पडते. या पेंढाऱ्यांना पगार तर नसतोच, उलट लुटालूट करण्याला मुभा मिळावी म्हणून लुटीचा भाग ते सरदारांना नजर म्हणून कबूल करतात. शत्रुमुलखातून मिळणारी लूट हीच या लुटारूंच्या प्राप्तीचें मुख्य साधन असल्यामुळें मुख्य सैन्यापेक्षा याचाच उपद्रव मुलखाला फार होतो. हे पेंढार, मातच्या प्रांत जाळून लुटून फस्त करतें. लूटमार करण्यामध्यें पेंढार मोठे वाकबगार, पण शिपाइगिरीचें शौर्य त्याच्या अगान जेमतेमच. लूट मिळविण्याकडे त्याचें लक्ष असल्यामुळें जीव धोक्यात पडेल असे प्रसंग ते टाळून टाळतात. छावणींत याचा विभाग वेगळा असून ते आपापल्या सरदारांच्या गोटाशेजार राहातात. माझ्या दृष्टीस जे पेंढारी पडले ते बहुतेक मुसलमान होते. पण सर्वच पेंढारी मुसलमान असतात असें नाहीं. लूटमारीची ज्यांना आवड आहे असे सर्व जातींचे व सर्व धर्माचे लोक त्यांच्यात आढळतात. बहुतेक पेंढारी माळव्याचे रहिवासी असून ते शिंदेशाही व होळकरशाही म्हणून ओळखले जातात. दिसायला तर ते शुद्ध भणंग दिसतात. त्यांची जनावरें लहान पण काटक, हत्यारें हलक्या दर्जाचीं

§ हे मॅलेटचें विधान वस्तुस्थितीला सोडून आहे. मराठी पलटणांत दिरंगाई झाली. दर्जाची व पगार जास्त अशी सारी परिस्थिति होती.

असल्यामुळें कोणत्याहि सुमज्ज फौजेसरोबर सामना देण्याची त्यांची ताकद नसते. लोकांना या लुटारूंची इतकी धास्ती बसली आहे कीं, ज्या मुलखांत मराठ्यांच्या स्वाऱ्या नेहमीं होतात तिकडील बहुतेक गावांना तटबंदी घातली आहे. कांहीं ठिकाणीं कमकुवत्या गांवीं तटबंदी शिवाय मध्यभागीं गढ्या बांधल्या आहेत.

## युद्धाच्या वेळची सैन्यरचना

मराठी सैन्यानीं समोरासमोर शत्रूशीं सामना केल्याचीं आतापर्यंत फक्त दोन उदाहरणें आहेत. पहिलें म्हणजे पानपतचें युद्ध. अर्दुल अफगाण व मोगल घोडेस्वारानीं मराठ्यांना घेरून त्याची रसद बंद करून उपासमारीची वेळ आणली तेव्हा बाहेर पडण्याकरिता जिवावर उदार होऊन मराठे लढले. या लढाईत त्याचा अयन नाश झाला. दुसरा प्रसंग म्हणजे मोतीतलाव एथें निंबकराव मामानें हैदराचा पराभव केला तो. या दोन्ही वेळेला मराठी सैन्याची मांडणी कशी होती याची मला माहिती नाहीं. § अलीकडे मराठ्यानीं पायदळ व तोफखाना मोठ्या प्रमाणावर उभारण्यास सुरवात केली असल्यामुळें सैन्याच्या मांडणींत पूर्वीपेक्षा बराच फेरफार झाला असल्याचा संभव आहे. आता मराठी फौजेला एक प्रकारचा पाया अगर मध्यबिंदु निर्माण झाला आहे. साहजिकच त्यांच्या धावपळीच्या व लुटालुटीच्या लढाईच्या पद्धतींत आमूलाग्र फरक झाला आहे. त्यानीं तोफखाना उभारून जे नवीन फेरफार केले आहेत, त्यामुळें एतद्देशीय लहानमहान राजेरजवाड्याविरुद्ध त्याचें सामर्थ्य वाढलें, पण **माझें असें ठाम मत आहे कीं, पायदळ, तोफखाना जवळ बाळगल्यामुळें त्यांच्या हालचाली पूर्वीच्या चपळाईनें होणे शक्य नाहीं अवजड तोफखाना व मंदगति पायदळ यामुळें चपळाईच्या भराऱ्या आता गेल्या, आणि जर कां आपल्या राष्ट्रासारख्या सुधारलेल्या राष्ट्रांशीं त्यांची गांठ पडली तर तोफखाना व पायदळें हीं मराठ्यांना मारकच होतील** ज्या वेळीं कंपनीचें मराठ्यांशीं युद्ध जुंपेल त्या वेळीं हा मुद्दा निकालात निघेल. हा समय मोठा आणीबाणीचा ठरून याच्या निकालावर आपल्या पूर्वेकडील साम्राज्याचें भवितव्य अवलंबून राहील. मराठ्यांची साधी राहणी, कपडलत्त्याच्या बाबतची काटकसर, सारखे स्वारींत राहिल्यानें अंगात आलेला साहसिकपणा हे त्याचे गुण पाहिले, आपली कवायती पलटणाची छोटीं सैन्यें व त्याचा घोडेस्वाराचा अफाट सेनासमुद्र यातील विषमता ध्यानात आली कीं कांहीं काळ या निकालाबद्दल चित्त साशंक होतें.

पण ११ मार्चला युद्धप्रसंगीं या सैन्याची मांडणी कशी होती हा आपला प्रस्तुत विषय पुरा करतों. वास्तविक पाहिलें असता या वेळीं दोन्ही पक्षाचे विशेष नुकसान न होता निजामाच्या केवळ भित्रेपणामुळें मराठ्यांना अकल्पित यश मिळालें. माझ्या माहितीवरून असें दिसतें कीं ११ तारखेला मराठ्यांचा हरोल निजामापासून ६ मैलावर होता. निजामाचें § सैन्य

---

§ ही माहिती अभ्यासकास काशीराजाची पानपतची बखर व भाऊसाहेबाची बखर यांत मिळेल

§ परिंडा किल्ल्याचा आश्रय घ्यावा हा निजामाचा विचार. त्या रोखानें तो चालला होता

मार्गे चालू लागलें अशी बातमी येतांच आघाडीवरील ही मराठी फौज ¶ पुढें सरसावून तिनें निजामाच्या फौजेला सतावून सोडण्यास सुरुवात केली. मराठ्यांची आघाडी ज्या प्रदेशातून पुढें सरकली तो खडकाळ, ल्हान मोठ्या टेकड्या व खाचखळग्यांनीं भरलेला, फौजेच्या कुचाला अत्यंत गैरसोईचा होता. आघाडीच्या फौजेची संख्याहि कांहीं ल्हान नव्हती. यामुळें या सर्व फौजेच्या हालचाली सारख्या व्हाव्या व ती एकाच वेळीं मोगल फौजेनजीक पोचावी हें संभवनीय नव्हतें. मध्यभागची तुकडी परशुरामभाऊ पटवर्धनाच्या हाताखालीं होती, तिच्यात भरणा निव्वळ राउताचा होता, पायदळ किंवा तोफा मुळींच नव्हत्या. यामुळें साहजिक ही तुकडी सर्वांआधीं निजामाच्या फौजेजवळ जाऊन धडकली आणि मार खाऊन परत फिरली या अनपेक्षित प्रकाराचा परिणाम मात्र मराठ्यांना अनिष्ट न होता फायदेशीर झाला. कारण परशुरामभाऊची मोडलेली फौज मागें फिरते तों दुसऱ्या तुकड्या मोगलानजीक जाऊन पोहोंचल्या. भाऊच्या पाठीवर असलेली मोगली फौज थोडकी असल्यामुळें तिला परतावें लागलें. या वेळीं हुजरातची पागा एकदम उठून तिनें शत्रूवर हल्ला चढविला असता तर या मोगली टोळीची केव्हांच धूळधाण झाली असती. पण भाऊनें माघार घेतल्यावर मराठ्यांनीं आपलीं घोडीं कांहीं रणात घातलीं नाहींत. पुढें चालून आलेली मोगलाची फौज मागें फिरली ती शिंद्याच्या तोफांच्या व भोसल्याच्या बाणाच्या माऱ्यानें. एक विचारानें योजना ठरून लढाई करावयाची असा बेत आखलेला दिसत नाहीं. कूच झाल्यानंतर प्रत्येक सरदाराला योग्य वाटलें त्याप्रमाणें त्यानें लढाई केली. बाजार व बहिरजुणग्याच्या संरक्षणार्थ ठवलेल्या ल्हान चौक्या व वीस मैल पिछाडीस पेशव्यासरेसर असलेली फौज सोडली तर राखीव फौज म्हणून विभाग वेगळा काढला नव्हता, माघार घ्यावी लागल्यास सैन्यानें कोणत्या मार्गानें कसें परतावें, पराभव झाल्यास पुनः कोणत्या ठिकाणीं एकत्र व्हावें, यासंबंधीं कांहीं एक योजना तयार नव्हती. सर्व फौजेकरिता लढण्याची शिस्त व विशिष्ट योजना नव्हती, तरी शिंद्याच्या विभागातील योग्य ती लष्करी टापटीप व बंदोबस्त मात्र नजरेंत भरण्यासारखा होता. पेरॉनची ब्रिगेड आणि मायकेल व जॉनच्या हाताखालील भरभक्कम तोफखाना यांच्या कुचाच्या व लढाईच्या वेळीं हालचाली पद्धतशीर झाल्या. कवायती पलटणांना शत्रूनें घेरा घालून पिछाडीकडून शत्रूनें हल्ला चढवू नये म्हणून दोन्ही बाजू व पिछाडी यांचें संरक्षण करण्यास शिंद्याचीं क्लिष्ट पथकें तेथें तयार ठेविलीं होतीं.

असो. मराठ्यांच्या स्वभावाची विशिष्ट ठेवण, त्यांच्यातील शिस्तीचा पूर्ण अभाव, विशिष्ट हेतु नजरेपुढें ठेवून आधीं लढाईची योजना आखून त्याप्रमाणें वागण्याचें त्यांना अमलांत यावेंटें, या गोष्टी मी पाहिल्या असल्यामुळें माझा असा अदाज आहे कीं, जर का या मराठ्यांची एखाद्या वजनदार शत्रूशीं गांठ पडली आणि त्याच्याजवळ मराठ्यांच्या घोडदौडीला अटकाव करील इतकें सरस घोडदळ असलें तर त्यांची कांहीं धडगत नाहीं.

¶ दावीकडे दौलतराव शिंदे, उजव्या बाजूस भोसले व मध्यभागीं परशुरामभाऊ, तुकोजी होळकर वगैरे.

# देवाजीपंत चोरघोडे यांचें एक वाङ्मयस्मारक

[ लेखक—सदाशिव लक्ष्मीधर कात्रे, एम्. ए., उज्जयिनी ]

## प्रास्ताविक

इसवी सनाच्या अठराव्या शतकाचा उत्तरार्ध बृहन्महाराष्ट्रास अनेक भाग्योदयांचा व आणीबाणीचा असा गेला. या काळांत मराठेशाहींत व संबद्ध प्रदेशांत दिग्विजयाच्या अनेक प्रयत्नांबरोबरच उलट-सुलट राजकीय डावपेच, हल्ले-परहल्ले, जय-पराजय, संधि-विग्रह, फितुरी-बनावी, धरसोड-निवाडी, देवाण-घेवाण, इत्यादि प्रकार अनावर झाले. त्या आघातें मुत्सद्दिगिरीचें म्हणजे राजकीय शहाणपणाचें मनस्वी पीक येणें अपरिहार्यच होतें. त्या पिकाचा मुख्य यशाचा बहर बहुतेक प्रसंगीं अर्थात्‌च पुण्याच्या वाट्यास येई. तरी पण आड राहून मुख्य व्यक्तींच्या नांवानें सूत्रें हालविणाऱ्या मुत्सद्दी शहाण्यांनीहि या काळांत सर्वत्र गर्दी होऊन त्यांपैकीं 'साडेतीन शहाणे' म्हणून ख्यात झालेल्या चार व्यक्तींस अतिशय महत्त्व आलें. या साडेतीन शहाण्यांपैकीं **सखाराम बापू** व **नाना फडणीस** या दीड शहाण्यांचा वाटा पुण्यास मिळाला आणि **विठ्ठल सुंदर** व **देवाजीपंत** असा एकएक संबंध शहाणा अनुक्रमें निजामाच्या व नागपूरकर भोसल्यांच्या भागास आला. या चारहि इसमांमुळें वरील काळांत बृहन्महाराष्ट्राच्या इतिहासांत फार महत्त्वाच्या घडामोडी झाल्या असल्यानें दाखले सापडतात.

## पूर्वपीठिका व उदय

नागपूरकर भोसल्यांच्या भागास आलेला संबंध शहाणा देवाजीपंत यांचें संपूर्ण नांव **दिवाकर पुरुषोत्तम चोरघोडे.** तत्कालीन ऐतिहासिक वाङ्मयांत किंवा पत्रव्यवहारांत यांचा निर्देश 'दिवाकरपंत,' 'दिवाकर पंडित,' 'देवाजी पंडित' 'दिवाकर पुरुषोत्तम' 'देवाजी पुरुषोत्तम,' इत्यादि संकेतानें केलेलाहि आढळतो. हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण असून नागपूर जिल्ह्यांतील नरखेडचा राहणारा. याचा जन्म इ. स. १७०० च्या जवळपास झाला असावा, पण इ. स. १७५५ सालापूर्वीच्या त्याच्या हालचालींचा मागमूस फारसा लागत नाहीं. नागपूरकर भोसल्यांचा सरदार **त्रिंबकजी राजे भोसले** [illegible] यांच्या **कोन्हेरराम उमरेडकर** या कारकुनाकडे देवाजीपंत हा प्रथम शागिर्द म्हणून होता इतकीच माहिती नागपूरकर भोसल्यांच्या बखरींत सापडते. इ. स. १७५५ सालीं पहिला **रघूजी भोंसले**

मरण पावल्यानंतर त्याच्या मुलांपैकीं जानोजी व मुधोजी यांचीं सेनासाहेबसुभा-पदासाठीं भांडणें चालू असतां जानोजीच्या पक्षाचे दिवाकर राजे व बापूराव कोन्हेर हे जानोजीसाठीं रीतसर वस्त्रें मिळविण्यास पुण्यास गेले होते. त्या वेळीं वस्त्रांबद्दल पेशव्याचा नजराणा किती ठरावा यासंबंधीं वाटाघाट चालू असतां देवाजीपंतानें मध्यें पडून उभय पक्षास संमत आणि सोईस्कर अशी रकम ठरवून दिली. या कामगिरीमुळें देवाजीपंतावर जानोजी व नानासाहेब पेशवे या दोघांचाहि लोभ जडून येथूनच त्याच्या उदयास प्रारंभ झाला. ¶

इतिहासकार श्री० यादवराव काळे यांनीं देवाजीपंताच्या भाऊबंदाच्या नागपूर व नरखेड येथील विद्यमान वंशजाकडे देवाजीपंतासंबंधीं जुनें कागदपत्र मुळींच सांपडत नसल्या बद्दल निराशेचे उद्गार काढले आहेत.§ पण आणखी प्रयत्न झाल्यास किंवा यागायोगानें नागपुरांतील इतर प्राचीन घराण्यांच्या दप्तरांतून देवाजीपंतविषयक जुनें वाङ्मय अजूनहि मिळणें शक्य आहे याचें प्रत्यंतर देतांना आज मला आनंद वाटत आहे. नागपूर येथील ऐतिहासिक महत्त्वाच्या 'जामदार' † घराण्याच्या दुय्यम शाखेंतील सुप्रसिद्ध कै. श्री मोरेश्वर आत्माराम ऊर्फ मोतीबाबासाहेब जामदार याजकडील प्राचीन पोथ्यांचें निरीक्षण त्यांचे पौत्र श्री. आत्माराम बळवंत ऊर्फ बाबासाहेब जामदार, ॲड्व्होकेट, यांच्या परवानगीनें ऑक्टोबर १९३६ च्या सुमारास मी करीत असतां त्यांत 'पुरञ्जनचरित' नामक एका पंचाकी संस्कृत नाटकाची हस्तलिखित प्रत मला आढळली. नाटक अप्रसिद्ध दिसल्यावरून तें बारकाईनें वाचू,

---

¶ नागपूरकर भोसल्यांच्या इ. स. १७५५-१७८१ च्या इतिहासांतील महत्त्वाच्या बहुतेक सर्व घडामोडींत देवाजीपंताचें अग्र प्रामुख्यानें असलेलें दिसतें. या लेखांत त्या सर्व घडामोडींचा परामर्श घेणें शक्य नाहीं व आवश्यकहि नाहीं. देवाजीपंताच्या कामगिरीची सदर्भासह माहिती करून घेण्यासाठीं जिज्ञासूंनी 'नागपूरकर भोसल्यांची बखर,' 'नागपूरकर भोसल्यांचा ऐतिहासिक पत्रव्यवहार,' 'कॅलेंडर ऑफ पर्शियन करेस्पॉन्डन्स,' बंगालचे जुने इमआ रेकार्ड, 'पेशवे दप्तर' भाग २०, तसेंच राजवाडे व खरे यांनीं संपादिलेले मराठ्यांच्या इतिहासाचें साधनग्रंथ किंवा सरदेसाई यांच्या रियासतींचे विविध भाग, राखालदास बानर्जी यांच्या ओरिसाच्या इतिहासाचा द्वितीय भाग, या मा काळे यांचा 'नागपूर प्रांताचा इतिहास' इत्यादि उत्कृष्ट इतिहास ग्रंथच वाचले पाहिजेत.

§ 'नागपूर प्रांताचा इतिहास' प्रस्तावना, पृ ४

† हें 'जामदार' घराणें कऱ्हाडे ब्राह्मणाचें असून याचें मूळ आडनांव 'बखले' असें आहे. या घराण्याचा नागपुरांतील मुख्य शाखेचा मूळ पुरुष नारो शंकर बखले यास पहिल्या रघूजीनें ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकरांच्या शिफारसीवरून अर्काटच्या एका मुसलमानाच्या अटकेंतून सोडवून नागपूरास आणलें व काहीं काळानंतर त्याजकडे भोसल्यांच्या जामदारखान्याचा मुख्य अधिकार देण्यात आला. श्री. यादवराव काळे यांनीं 'नागपूर प्रांताचा इतिहास,' पृ ५७३, येथें या 'जामदार' घराण्याची वंशावळ दिली आहे, पण तिच्यांतील कांहीं तपशील चुकीचे व अपुरे असावेत असें वाटतें.

लागलीं तीं त्याच्या प्रस्तावनेंत व अन्तिम प्रशस्तींत भोसल्यांच्या नागपुरातील कांहीं निर्देश आढळले व योग्य विचारानंतर तें नाटक देवाजीपंत चोरघोडे यांच्याच एका आश्रितानें रचिलेलें असल्याबद्दल पूर्ण निश्चय करतां आला.

## 'पुरञ्जनचरित' नाटकाची पोथी

'पुरञ्जनचरित' नाटकाची ही 'जामदार' प्रत बाळबोध (देवनागरी) लिपींत लिहिलेली असून दिसण्यात १००–१२५ वर्षांइतकी प्राचीन वाटते. तिचीं अदमासें ९३/४×५१/२ इंच आकाराचीं प्रारंभींचीं वीस पत्रें विद्यमान आहेत. तेवढ्या भागात नाटक संपूर्ण लिहिलें गेलें आहे, पण अन्तिम प्रशस्तिपद्याचे दोनच चरण विसाव्या पत्रावर दिसत असल्या-वरून त्यानंतरचें एक पत्र गहाळ झालें असावें असें वाटतें. पोथींत वापरलेली शाई काजळी रंगाची असून हस्ताक्षरादिकाच्या दृष्टीनें पोथीचे दोन भाग पडतात. पहिल्या पत्राच्या द्वितीय पृष्ठाच्या प्रारंभापासून पंधराव्या पत्राच्या प्रथम पृष्ठाच्या अखेरपर्यंतच्या भागांत नाटकाचे प्रारंभींचे चार अंक आले असून पहिल्या पत्राचें प्रथम पृष्ठ व पंधराव्या पत्राचें द्वितीय पृष्ठ कोरींच सोडलेलीं आहेत. या भागात पत्रांच्या प्रत्येक लिखित पृष्ठावर प्रत्येकीं सुमारें तीस अक्षरें असलेल्या चौदा ते सतरा ओळी आहेत व लेखकाचें हस्ताक्षर सुवाच्य असून लिहिण्या-तील अशुद्धें अगदीं स्वल्प आहेत. या भागात पृष्ठाच्या चारहि बाजूस सोडलेल्या सुमारें एक इंचाच्या मर्यादेच्या जागेत लेखकानें नाटकांतील प्राकृत स्थळांची संस्कृत छाया व इतर कांही संस्कृत टिपणेंहि दिलेली आढळतात. सोळाव्या पत्राच्या प्रारंभापासून विसाव्या पत्राच्या अखेर-पर्यंतच्या भागात नाटकाचा शेवटचा पाचवा अंक अन्तिम प्रशस्तिपद्याच्या दोन ओळींसह आलेला आहे. या भागांत पत्राच्या प्रत्येक पृष्ठावर प्रत्येकीं सुमारें अठ्ठावीस अक्षरें असलेल्या अकरा ते तेरा ओळी आहेत. लेखकाचें हस्ताक्षर वाईट असून लेखनप्रमाद अतोनात आढळतात. या भागांतहि पृष्ठाच्या चारहि बाजूस सुमारें एक इंचाची मर्यादा सोडलेली आहे, पण त्या जागेंत लेखकाचीं टिपणें मुळींच दिसत नाहींत व पाचव्या अंकात प्राकृत स्थळेंच नसल्यामुळें संस्कृत छाया देण्यास मुळातच अवसरहि नाहीं. पोथीचें शेवटचें पत्र गहाळ असल्यामुळें ही प्रत कोणीं, कोणत्या काळीं व कोणत्या स्थळीं लिहिली तें समजत नाहीं. मात्र दोनहि भागाचे लेखक महाराष्ट्रीय असावेत असें वाटतें. पोथी दिसण्यात बरीच प्राचीन असली तरी अद्याप साधारण बऱ्या अवस्थेंत आहे.

## 'पुरञ्जनचरित' नाटकाची रूपरेखा

भागवतपुराणाच्या स्कंध ४, अध्याय २५ ते २९ या भागात मूळ पुरञ्जनो-पाख्यान संवादरूपानें सविस्तर दिलेलें आहे व त्यातच अध्याय २९ मध्यें त्या समग्र आख्यानाचें तत्त्वज्ञानपर निरूपणहि केलेलें आहे. त्याच आख्यानाच्या आधारावर कृष्णदत्त नामक मैथिल कवीनें प्रस्तुत नाटक रचिलें आहे. पुरञ्जन राजा

नागांच्या ‡ नगरांत जाऊन तेथील राजकन्या पुरञ्जनीशीं गांधर्वविवाह करतो व त्यानंतर तिजबरोबर अंतःपुरांतच सर्व काळ घालवितो. ही संधि साधून गंधर्व, यवन, इत्यादि शत्रु चढाई करून पुरञ्जनाचें राज्य हस्तगत करतात व पुरञ्जन स्त्रीवेष घेऊन पळून जातो. त्या वेषात त्यास खरोखरच 'वैदर्भी' नांवाखालीं स्त्रीत्व प्राप्त होऊन त्याचें मलयध्वज राजाशीं लग्न होतें! नंतर वैदर्भीरूपधारी पुरञ्जन मलयध्वजाच्या विरहामुळें अत्यंत व्याकुळ झाला असतां त्याचा प्राचीन मित्र योगिराज अविज्ञातलक्षण यास त्याची कींव येते व तो नवलक्षणा' नामक कामधेनूच्या द्वारें वैदर्भीरूपधारी पुरञ्जनास कृष्णभक्ति करावयास लावतो. पुरञ्जनाची इतकी तयारी झाल्यानंतर अविज्ञातलक्षण त्यास योगबळानें सत्यपरमात्मज्ञान म्हणजे अद्वैतज्ञान प्राप्त करून देतो. अशा प्रकारचें हें कथानक असून त्याची 'अविज्ञातलक्षण म्हणजे परमात्मा,' 'पुरञ्जन म्हणजे जीवात्मा,' इत्यादि वेदांतपर उपपत्ति लावण्यात आली आहे. त्यावरून प्रस्तुत 'पुरञ्जनचरित' साधारणपणें कृष्णमिश्राच्या 'प्रबोधचन्द्रोदय' नाटकाच्या धर्तीचें एक दार्शनिक नाटक आहे असें म्हणतां येईल. नाटकाचें कथानक भागवतांतील मूळ आख्यानास धरूनच असून त्यात प्रायः कांहीं फेरफार केलेले दिसत नाहींत. तरी पण कवीनें त्यांतच मधून मधून स्वतःच्या प्रतिभेची चुणूक दाखविणारे व स्वतःच्या विद्वत्तेचें आणि बहुश्रुतपणाचें प्रदर्शन करणारे प्रसंग निर्माण केलेले आढळतात. दर्शनें, व्याकरण, § अलंकारशास्त्र, इत्यादि विषयांचा हा कवि चांगला पंडित असून त्यानें विविध प्रांतांतून बराच प्रवासहि केला असावा असें दिसतें. त्याची गद्यपद्यरचनाशक्ति उत्तम असून नाटकांत इतस्ततः विखुरलेल्या एकंदर १२९ पद्यांत त्यानें बरेच अलंकारहि साधलेले दिसतात. यापैकीं बहुसंख्य पद्यें संस्कृत भाषेंत असून कांहीं प्राकृत भाषेंतहि आहेत.

नाटकारंभीचा प्रस्तावनेचा भाग ऐतिहासिक महत्त्वाचा असल्यामुळें तो व पाचव्या अंकांतील शेवटच्या भरतवाक्यादिकाचा भाग खालीं उद्धृत करीत आहें.

## नाटकाचा प्रास्ताविक भाग

**श्रीगणेशाय नमः ॥**

नित्यानन्दचिदात्मकस्य कलया यस्याच्युतस्याखिलं
विश्वं चेतितमप्यचेतनमिव द्राग्भ्राम्यति भ्राम्यति ॥
यो गृह्णात्यकरश्चलत्यचरणः पश्यत्यचक्षुः शृणो—
त्यश्रोत्रो मनसो गिरोऽप्यविषयो भक्तेर्वशोऽव्यात्स वः ॥ १ ॥

---

‡ मुख्यतः या 'नागपुरा'शीं संबद्ध असल्यामुळेंच पुरञ्जनोपाख्यानाचा विषय भोसल्यांच्या नागपुरांत तयार झालेल्या प्रस्तुत नाटकास घेण्यांत आला असावा असें वाटतें.

§ "मा शङ्कीः" इत्यादि अपाणिनीय प्रयोग प्रस्तुत नाटकांत क्वचित् दिसतात. पण त्यांसहि इतर व्याकरणकाराचा आधार असणें संभवनीय वाटतें. बंगाल, मिथिला, इत्यादि भागांत पाणिनीतर प्राचीन व्याकरणकारांच्या ग्रंथांचें आजमितीसहि अध्ययन केलें जातें व प्रामाण्य मानलें जातें.

अपि च ।

एकं वृक्षमधिश्रितौ सहचरौ दिव्यौ सुपर्णौ भवे
पक्वं पिप्पलमत्यदन्निह ययोरेको गुणैर्बध्यते ॥
नाश्नन्नप्यतिदीप्तिमश्नुते परो बुध्वा ततः तमेव श्रितो
बद्धोऽसावपि मुक्तिमेति न परो मोक्षाय पन्था मतः ॥ २ ॥

( नान्यन्ते ) **सूत्रधारः**—अलमतिविस्तरेण । भक्तिभावनाविभाकरविभाविभासित शुद्धमानसमारमणारमणानीतरमारमणपदचरणस्य क्षणक्षणाविलक्षणविनयविवेकदयादानदाक्षिण्यादि गुणगणस्य निरवधिपरोपकारजागरूकयशोभारघनसारप्रसारसुरभीकृतमभारस्य परमरमणीयाकारस्य **श्रीदिवाकरपुरुषोत्तमस्य** सभायां मङ्गलमयमूर्तिश्रीव्यङ्कटेशकेशवमनिवेशनद्वारसन्निधाने विवादपदरदम्भडम्बरसंवलितसंस्कृतप्राकृतमयनिरवद्यगद्यपद्यप्रबन्धसमुदायेन वेदान्तसिद्धान्त सारसम्बन्धप्रायेण भार्गवरामीय हरिदासवितन्यमान लक्ष्मीनिवासकीर्तनामृतमतिनिभृतमापीय मुदितानां विविधोपधानान्यवलम्ब्य सुखोपविष्टानां विशिष्टानां शिष्टानां देशविदेशवास्तव्यानां शास्त्रिब्राह्मणानां राजकार्यभारिणां व्यापारिणां च मण्डली समुल्लसति । तदत्र किमपि नवीनं नाटकमभिनेतव्यमिति ( नेपथ्याभिमुखः ) आर्ये । इतस्तावत् ।

( प्रविश्य ) **नटी**—अज्ज ! एसह्मि । आणवेदु अज्जो को णिओआ अणुचिट्ठीअदुत्ति,
आर्य ! एषास्मि, आज्ञापयत्वार्यः को नियोगोऽनुष्ठीयतामिति । )

**सूत्रधार**—आर्ये ! साधुसमाजमेतमाराधयितुमिच्छामि ।

**नटी**—कदर उण पओअ समस्सिअ एदस्स आराहण करिस्सदि अज्जो । ( कतर पुन: प्रयोग समाश्रित्यैतस्याराधन करिष्यत्यार्य: । )

**सूत्रधारः**—यत्किल कृष्णदत्तकविना मैथिलेन पुरञ्जनचरित नाम नाटकमस्मासु समर्पित तदभिनयेनाराधनमस्य सम्भविष्यति ।

**नटी**—विविहविमलविज्जाविलास ( विस्स ) विदितपवित्तकित्तीण बह्ममुत्तीण एदाण इध कध सवणसमुस्सुअ हिअअ हविस्सदि । ( विविधविमलविद्याविलासविश्वविदितपवित्रकीर्तीनां ब्रह्ममूर्तीनामेनेषामिह कथ श्रवणसमुत्सुक हृदय भविष्यति । )

**सूत्रधारः**—हरिभक्तिकथैवान शुश्रूषामुत्पादयिष्यति । उक्त च तेन कविना ।

हरिपदभजनात्तशुद्धिमेतां लघुमपि मद्गिरमाद्रियेत सभ्यः ॥
शिरसि शशिकलां त्रिमार्गगां च त्रिदशनुतोऽपि बिभर्ति हि त्रिनेत्रः ॥ ३ ॥

देवाजीपुरुषोत्तमो गुणवतां वाणीरसास्वादवि—
त्तत्सभ्याः सदसद्विवेकपटवः सर्वे गुणग्राहिणः ॥
लोके हारि पुरञ्जनस्य चरितं प्रौढः कविर्मैथिलो
नाट्ये दक्षतमा वयं च तदयं स्वर्णेन योगो मणे ॥ ४ ॥

नटी—अज्ज ! को एसो देआजीपण्डिओ जस्स पसंसा सव्वदा सुणिअदि । ( आर्य ! क एष देवाजीपण्डितो यस्य प्रशंसा सर्वत्र श्रूयते । )

सूत्रधार—नाम्नैव दत्तमुत्तरम् ।

देवोऽत्र परमेश्वरः परहितोऽस्त्यस्मिन्स्वभक्ते यतो
यद्विश्रावनबुद्धिमत्युदयते देहोऽवजेश्चान्वयः ॥
अर्थी यत्स्फुटमाह देहि हयमित्यर्थे प्रकृत्युक्तिभि
र्देवाजीति यथार्थमेव वलते नामास्य तत्सर्वथा ॥ ५ ॥

किं च, योऽसावुद्धव इव यदुवीरस्य, सुमन्त्र इव रघुवीरस्य, बृहस्पतिरिव सुनाशीरस्य, बीरबल इवाकब्बरसाहस्य, अमर इव साहसाङ्कस्य, चाणक्य इव चन्द्रगुप्तस्य नागनगरनाथस्य भोसलावंशसिन्धुसम्भवराजन्यचन्द्रस्य साचिव्यमवलम्ब्य नरपतिजनपदहितमिव नार्यकारितयामयारपि प्रीतिप्रतीतिपात्रमतिमानमुद्भासत ।

नटी—तं आरम्भीअदु पआओ । उस्सुअहिअआ विअ सअलो समाजो दीसई । ( तदारभ्यतां प्रयोगः । उत्सुकहृदय इव सकलः समाजो दृश्यते । )

सूत्रधार—

यद्यपि जगति सन्तः शीलयन्तः सुशील
परगुणपरमाणूनप्यमी शीलयन्ति ॥
तदपि मनसि शङ्का वर्तते मे किमेषा—
मभिमतमभिनेयं दुर्विदं हन्यचेत ॥ ६ ॥

नटी—ता सअलसिद्धिमूलं हिसीकेस पसादेदु अज्जो । ( तत्सकलसिद्धिमूलं हृषीकेशं प्रसादयत्वार्यः )।

सूत्रधार—( सानन्द ) सम्यगभिहितम् ।

वैकुण्ठे व्रजवरभाजनहृतस्वान्तस्य वृन्दाटवी—
सवासं कमलागृहीतमनसो हन्मात्रदैन्यं तव ॥
वेदं शास्त्रमिह प्रमाणमिति तं श्रीनाथ ! किं दीयता—
मव्याजप्रिय ! दीयते वत मया चेतस्तदादीयताम् ॥ ७ ॥

अपि च ।

अघटितघटनापटीयसीयं नटयति ते जगदेव देव ! माया ॥
भ्रमणशतपरिश्रमेण तत्र क्वचिदपि कस्यचिदेपि तोषमप ॥ ८ ॥

नटी—अज्ज ! अदो वर किं विलम्बीअदि । ( आर्य ! अत परं किं विलम्ब्यते । )

सूत्रधार—सखा मम गुणाकरो नाम मामनाप्रच्छ्य व्यापारानुरागतो नन्दिवर्धननगर मागतो दर्शितकामरूपगुणप्रकारया कयापि कामकन्दल्या वशीकृतो वशीभूय किमपि न प्रति सन्दधातीति चिन्तामापन्नोऽस्मि ।

**नटी**—अज्जस्स आण्णाए मये तुह समीव सो आणीअदि। अज्जेण उण प्प...
(आर्यस्याज्ञया मया तव समीप स आनीयत। आर्येण पुन. प्रतिवेश्यनीय इ...

**सूत्रधार**—( सहर्ष ) तर्हि सर्वं सम्पन्नम्।

पुरञ्जनीसङ्गविपाकजां रुजं
पुरञ्जनो भक्तिरसायनामृतैः॥
भवेकचेष्टोपहतैर्यथा जहौ
चिन्तामिमां त्वद्वचनैरहं तथा॥ ९॥ ( इति निष्क्रान्तौ। )

आमुखम्॥

( तत. प्रविशति पुरञ्जनो राजा सचिवश्च इ० ).

..... ——. ...

## नाटकाचा अन्तिम भाग

. . . ..... ..... ..... .........

**पुरञ्जनः**—

सखे! सत्यप्यस्मिन्मम तव च भेदव्यपगमे
त्वदीयोऽहं नाथ! त्वमसि न मदीयः क्वचिदपि॥
तरङ्गः सामुद्रो भवति न च तारङ्ग उदधिः
स्फुलिङ्गश्चाग्नेयो दहनकणकीयो न दहनः॥ ३७॥

**अविज्ञातलक्षणः**—सखे! किं ते भूय प्रियमुपकरोमि?

**पुरञ्जन**—अत. परमपि किं प्रियमस्ति? यत,

भवानेतावन्तं समयमुपकुर्वन्नपि सुहृ—
न्ममान्धस्येवासीद्गृहमणिरविज्ञातचरित.॥
अथ श्रुत्वा मत्वा किमपि सुनिदध्यास्य सुरस—
स्पृशि प्रोन्मीलन्त्यां दृशि सपदि साक्षात्पुत इति॥

तथापीदमस्तु।

श्रीतनुच्छविसुवर्णरेखितस्वांशुकात्तसतडिद्घनश्रियि॥
कृष्णरूपनिकषे निवेशितं प्रेमहेम सुपरीक्ष्यतां मम॥ ३९॥

अपि च।

काले काले तडित्वानमृतरसमयीं वृष्टिमिष्टां विधत्ता-
मुर्वीं सस्योघगुर्वीं सचिवजनहितं भूमिपा पालयन्तु॥
सर्वः सर्वत्र नन्दत्वखिलगुणगुरौ विन्दतु प्रेमभक्तिं
देवे श्रीव्यङ्कटेशे प्रचरतु परितः कृष्णदत्तस्य सूक्तिः॥ ४०॥

अविज्ञातलक्षण.—एवमस्तु ।

( इति निष्क्रान्ता सर्वे । )

इति श्रीपुरञ्जनदु रभञ्जनोऽङ्क नाम पञ्चमोऽङ्कः ॥ ५ ॥

शाके नन्दनगावनीपतिमिते शुक्लद्वितीयाबुधे

चैत्रे नागपुरे ..रघुनृपावासादयोध्यामभे ॥

( यानंतरचा भाग गहाळ )

## उद्धृत स्थळाचा निष्कर्ष

वर उद्धरिलेल्या भागातील महत्त्वाच्या माहितीचा निष्कर्ष खालीं दिल्याप्रमाणे काढता येईल. प्रस्तुत नाटक मिथिलेच्या कृष्णदत्त कवीनें रचिलें असून त्याचा रंगभूमीवरील प्रथमच प्रयोग नागपुरात देवाजीपंताकडे व्यंकटेशकेशवाच्या † देवघरापुढील मंडपात झालेल्या महोत्सवाच्या प्रसंगीं करण्यात आला. हा महोत्सव नऊ दिवसाचा असून त्यात अगोदरच्या सुमारीं कोणा तरी उत्कृष्ट हरदासाचें विष्णूच्या आख्यानावर अद्वैतब्रह्मनिरूपणपर संस्कृत व प्राकृत मजकुरानें भरलेलें, विद्वत्ताप्रचुर व मनोरंजक असें संगीत कीर्तन झालें होतें. महोत्सवातील सभासदात निरनिराळ्या देशातून आलेले प्रतिष्ठित व महत्त्वाचे असे विद्वद्धुरीण शास्त्री, ब्राह्मण ( वैदिक ? ), राज्याधिकारी व व्यापारी आहेत व ते सर्व गुणग्राहक व सरसनीरसाचे परीक्षक असून या नाट्यप्रयोगाच्या वेळीं निरनिराळ्या लोडास टेकून ऐटींत बसले आहेत असा देखावा वर्णिला आहे ! स्वत देवाजीपंताविषयीं, तो अत्यंत देखणा व भव्य असून विष्णूचा परमभक्त आहे, त्याचे विनय, विवेक, दया, दानदाक्षिण्य, इत्यादि गुण अद्भुत असून तो निष्कपट परोपकार करण्यास नेहमीं सिद्ध असतो, त्याच्या कीर्तीचा डंका सर्व जगात दुमदुमत असून सर्वत्र त्याची प्रशंसा ऐकू येते, त्याची वाङ्मय रसज्ञता उत्कृष्ट असून त्यास त्याच्या कार्यांत परमेश्वरी साहाय्य मिळतें, तो ब्राह्मणाच्या रक्षणात तत्पर व पराक्रमी असून पराकाष्ठेचा उदार आहे तो नागपूरकर भोसल्याच्या क्षत्रिय राजकुलातील विद्यमान राजाचा दिवाण असून राजा व प्रजा या दोघासहि प्रिय आणि हितकर अशीं कामें करण्यामुळे दोघाच्याहि प्रेमास आणि विश्वासास पात्र होऊन अतिशय महत्त्वास चढला आहे, इत्यादि माहिती सापडते. 'देवाजी' या मराठी नामाच्या तीन संस्कृत

§ 'पुरञ्जनचरित' नाटकाच्या पाच अकाचीं नावें अनुक्रमें पुरञ्जनप्रलम्भन, पुरञ्जनरञ्जन, पुरञ्जनपुरञ्जन, पुरञ्जनसमञ्जन व पुरञ्जनदु रभञ्जन अशीं असून मुख्य पात्रें सूत्रधार, नटी, पुरञ्जन ( राजा किंवा वैदर्भी ), पुरञ्जनी, सचिव, प्रज्ञागर, चेटी, वृत्तिमंचिका, रक्षक, श्रुमान्, अवधूत, श्रुतधर, चर, सितपक्ष, सेनापति, विलक्षण, अविज्ञातलक्षण, नवलक्षणा, अभिनलक्षणा, सुरोचन, हीं आहेत

† व्यंकटेशकेशव म्हणजे गिरीचा बालाजी संस्कृतातील शुद्ध रूप 'वेङ्कटेशकेशव' असें आहे, पण पोथींत 'व्यंकटेशकेशव' असें मराठी रूपच लिहिलेलें आढळतें

व्युत्पत्त्याहि दिल्या असून देवाजीपंतांची उद्धव, सुमन्त, बृहस्पति, बीरबल, अमर व चाणक्य या प्रख्यात प्राचीन राजमंत्र्यांशीं तुलना केलेलीहि आढळते भरतवाक्यात इतर मागण्या बरोबर "राजे लोकांनीं सचिवमंडळीच्या हितास जपावें" अशी मागणीहि केलेली आढळते तिच्या द्वारें कवीनें "भोसल्यांनीं देवाजीपंताचा उत्तम सन्मान ठेवावा" अशी स्वत:ची इच्छा ध्वनित केली असल्याचा भास होतो !

## महोत्सवास ऐतिहासिक पुरावा

नाटकाच्या प्रस्तावनेंत निर्दिष्टिलेला प्रसंग काल्पनिक नसून तसा महोत्सव देवाजीपंताकडे मोठ्या प्रमाणावर बरींच वर्षें होत असे असें दाखविण्यास ऐतिहासिक आधार आहे जानाजीनें स्वत:च्या कारकीर्दीच्या अखेरीस देवाजीपंतास कैद करून व त्याचें सर्व घर लुटून त्यास फार त्रास दिला. तो प्रसंग माधवराव पेशव्यास कळवितांना पेशव्याचा नागपूरचा वकील **विठ्ठल शामराज** हा आपल्या सविस्तर पत्रांत लिहितो§—

"...... दिवाकरपंताचा मजकूर, कांहीं नग जडावाचे व सोनें, रुपें, राहिलें होतें तेंहि घेऊन गेले. **नवरात्रांत उछाहासाठीं पांच हजार रुपये ठेविले होते तेंहि नेले उछाहास त्यांचे घरीं कोण जातो म्हणाले तमाम ब्राह्मण ज्यास गाव स्वास्ती वृत्ती ज्यास आहेत व आपले चाकर जितके आहेत तितके कोणीं देवाजी पंताचे येथें न जावें, गोसावी कोणी न जावें अशी परिछिन्न ताकीद केली आहे** "

या प्रसंगीं देवाजीपंतानेंहि स्वत:चें वृत्त वरील विठ्ठल शामराजामार्फतच माधवरावास कळविलें. त्यात तो म्हणतो †—

"... येथवर केल्यास धैर्याधिष्टित चित करोन श्रीहरीसेवेत सादर आहे. **पुढ विजेयादशमीचा उत्साह आहे प्रतिवर्षीं पंडित आदीकरोन येत असता त्यास सहा हजार रु मात्र ठेविले हेंहि त्या दिवसपर्यंत राहून उपेगी पडतील येसे निश्चये करणियात येत नाहीं अर्थहरण तो जाला** पुढे प्राणाचाहि संकल्प केला परंतु आत पर याचा कारभार नको. येविषईंची प्रतिज्ञा समर्थाचे पायाशी ती खरीखुरी आहे दारीर्यहि सूळ निर्माण जाला. श्रेम होत आहेत. **मोहत्साह मात्र जाला पाहिजे येवढी वासना हे सिध्धीस गेल्यावर मग कांहीं आस्था राहिली नाहीं** "

या दोन उतार्‍यावरून देवाजीपंताकडे नवरात्राचा उत्सव किती मोठ्या प्रमाणावर दरसाल साजरा होत असे व त्यासाठीं किती दूरदूरचे पंडित व इतर लोक नागपुरास येत असत, तसेंच अत्यन्त बिकट परिस्थितींत असताहि देवाजीपंतास स्वत:च्या घरीं तो उत्सव साजरा होण्याबद्दल किती तळमळ लागली होती तें स्पष्टपणें दिसून येतें. मुधोजीच्या कारकीर्दीत

§ पेशवे दप्तर, भाग २०, लेखांक १९८, पृष्ठ १९१

† किता, लेखांक १९७, पृष्ठ १८४

देवाजीपंताचा पुनरुदय झाल्यावर त्याजकडे हा उत्सव पुन्हा होऊं लागला असावा. या लेखांत वर निर्देशिल्याप्रमाणें इ. स. १७७९ च्या ऑगस्ट महिन्यांत देवाजीपंत दसऱ्याचें निमित्त काढून तांतडीनें पुण्याहून निघून नागपुरास परत आला तो मुख्यतः त्याजकडील या उत्सवासाठींच आला असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं. देवाजीपंताकडील नवरात्र देवीचें नसून बालाजीचें असावें व बालाजी हेंच त्याचें कुलदैवत असावें असें प्रस्तुत 'पुरञ्जनचरित' नाटकांतील वर्णनावरून दिसतें. देवाजीपंताची वपुष्मत्ता, त्याची ईश्वरभक्ति, त्याची रसिकता, त्याचें संस्कृत वाङ्मय व वेदान्तशास्त्र यांजवरील प्रेम, इत्यादि गोष्टींवरहि हे नाटक चांगला प्रकाश पाडतें.

## नाटकाविषयीं जुनी चुकीची माहिती

'पुरञ्जनचरित' नाटकांत आढळणाऱ्या देवाजीपंतविषयक माहितीकडे यापूर्वी कोणाचें लक्ष गेलें असल्याचें दिसत नाहीं. पण हें नाटक अगदींच अज्ञात असें मात्र नाहीं. दोन पिढ्यापूर्वींचे प्रख्यात विद्वान् व संशोधक **बाबू राजेन्द्रलाल मित्र** यांनीं संपादिलेल्या वर्णनात्मक विस्तृत संस्कृत ग्रंथ-सूचींत या 'पुरञ्जनचरित' नाटकाची संक्षिप्त माहिती दिलेली आढळते.§ ही माहिती दरभंगा जिल्ह्यातील त्या वेळचे प्रसिद्ध मैथिल पंडित **हर्षनाथ झा** यांच्या संग्रहांत असलेल्या या नाटकाच्या एका मैथिल लिपींतील प्रतीवरून दिली आहे. पण बाबू राजेन्द्रलाल मित्रांच्या हाताखालील ज्या इसमानें प्रस्तुत नाटकाच्या माहितीचें हें टिप तयार केलें त्यानें नाटकाची प्रस्तावना समग्र वाचली नसावी किंवा त्यास महाराष्ट्राच्या इतिहासा ज्ञान अगदीं नसावें असें वाटतें. कारण त्यानें "या नाटकाचा प्रथम प्रयोग **ओरिसाच राजा पुरुषोत्तम देव** याच्या दरबारात प्रथम करण्यांत आला होता," अशी माहिती सद टिपणांत दिली आहे! या लेखांत नाटकाच्या वर उद्धृत केलेल्या समग्र प्रस्तावनेवरून नाटक **नागपूरकर भोसल्यांचा दिवाण देवाजीपंत चोरघोडे** याजकडील बालाजीच्य नवरात्राच्या महोत्सवप्रसंगींच कोणत्या तरी वर्षी रंगभूमीवर प्रथम आणलें गेलें व तें ओरिसाच राजा पुरुषोत्तमदेव याच्याशीं कोणत्याहि प्रकारें संबद्ध नाहीं याबद्दल शंकाच राहात नाहीं.

## नाटकरचनेचा किंवा प्रतलेखनाचा काळ

नाटकाच्या 'जामदार' प्रतींतील अंतिम प्रशस्तिपद्याच्या विद्यमान दोन ओळींत "रघुराजाच्या (=दुसरा रघूजी भोसले याच्या) वास्तव्यामुळें अयोध्येशीं सादृश्य पावलेल्या नागपूर शहरांत चैत्र शुक्ल द्वितीया शके १६९९ बुधवार या दिवशीं..." इतकाच वाक्याश समाविष्ट झाला आहे. नंतरचा वाक्यांश "......कृष्णदत्तकवीनें प्रस्तुत नाटकाची रचना पूर्ण केली" किंवा "......अमुक लेखकानें कृष्णदत्तकवीच्या प्रस्तुत नाटकाच्या प्रस्तुत प्रतीचें

§ *Notices of Sanskrit Manuscripts*, Vol. VI (Calcutta, 1882), Pages 20—22., No. 2000. येथें दिलेल्या स्वरूप उताऱ्यांवरून या प्रतीत कांहीं पाठभेदहि असावेत असें दिसतें.

लेखन पूर्ण केलें " या दोहोंपैकीं कोणत्या तरी आशयाचा असावा. पण तो निर्देश नाटकरचना किंवा प्रतलेखन या दोहोंपैकीं नक्की कशाचा असावा तें या नाटकाची नागपुरातील दुसरी एखादी प्रत उपलब्ध होईपावेतों सांगता येणार नाहीं. निर्देशिलेला काल इ. स. १७७७ च्या एप्रिल महिन्याच्या सुमारास असून देवाजीपंत त्यानंतर पुढें चार साडेचार वर्षें हयात होता. त्यावरून हा नाटकरचनेच्या समाप्तीचा निर्देश असणें जास्त संभवनीय वाटतें. कदाचित् हा प्रतलेखनाचाच निर्देश असला तर तो प्रस्तुत 'जामदार' प्रतीचा नसून 'जामदार' प्रतीस आधारभूत असलेल्या मूळ प्रतीचा असावा असें वाटतें. कारण 'जामदार' प्रतीच्या अन्तिम भागात अशुद्धें अतोनात दिसत असल्यामुळें त्या लेखकाकडून संस्कृत प्रशस्तिपद्याची मौलिक रचना होणें अगदीं अशक्य दिसतें. तथे पण 'जामदार' प्रत बरीच प्राचीन आहे यात संशय नाहीं.

बाबू राजेन्द्रलाल मित्र याच्या सूचींत उपयोगिलेल्या प्रस्तुत नाटकाच्या 'मिथिला' प्रतींत तिचा लेखनकाळ इत्यादि निर्देशिणारी प्रशस्ति आढळते ती अशी—

> शाकेऽब्दे धरणीवियन्मुनिधरासम्भासमाने शुभे
> माघे मासि दिवामणौ मकरगे विष्णोस्तिथौ सादरम् ॥
> श्रीमन्मैथिलकृष्णदत्तकृतिना यन्निर्मितं नाटकं
> प्रालेखीत्तदिदं मुदा द्रुततरं श्रीहेमनाथद्विजः ॥ शुभमस्तु ॥

"शके १७०१ सालीं माघ शुद्ध एकादशीस सूर्य मकरराशींत असल्या वेळीं हेमनाथनामक ब्राह्मणानें कृष्णदत्तमैथिलाचें हें नाटक घाईनें व उत्साहानें लिहून काढलें" अशा आशयाचा हा निर्देश आहे. हा काळ म्हणजे इ. स. १७८० सालाच्या जानेवारीअखेरचा सुमार. त्यावरून प्रस्तुत 'मिथिला' प्रत आमच्या 'जामदार' प्रतींत निर्देशिलेल्या काळानंतर पावणेतीन वर्षांनीं लिहिली गेली असल्याचें उघड होतें.

## नाटककाराविषयीं माहिती

याप्रकारें हें संस्कृत पुरञ्जनचरितनाटक देवाजीपंत चोरघोडे याचें एक समकालीन उत्कृष्ट वाङ्मयस्मारकच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. नाटककारानें या ग्रंथात स्वतः विषयीं विशेष कांहींच माहिती दिली नाहीं. "त्याचें नाव कृष्णदत्त व देश मिथिला असून तो एक प्रौढ कवि आहे" इतकीच माहिती प्रस्तावनेंत असून भरतवाक्यात "कृष्णदत्ताच्या वाङ्मयाचा सर्वत्र प्रसार होवो" अशी इच्छा प्रकट केलेली आढळते. कृष्णदत्ताचे देवाजी-पंताशीं संबद्ध नसलेले तीन इतर ग्रंथ हस्तलिखित उपलब्ध असून त्यापैकीं दोन ग्रंथातून त्यानें स्वतःविषयीं अधिक तपशील दिलेले आढळतात.

जयदेवाच्या '**गीतगोविन्द**' काव्याचे कृष्णपर आणि शिवपर असे दोन अर्थ लावणारी 'गङ्गा' नावाची संस्कृत टीका या कृष्णदत्त मैथिलानें रचिलेली असून तिची एक

प्रत लंडनच्या इंडिया ऑफिस लायब्ररींत आहे.‡ तिजमधील काही स्थळांत कवीने स्वतःच्या मातापितरांची व वडील भावाची नावें दिलीं आहेत. त्यापैकीं दोन पद्यें—

"तामम्बां पतिदेवतां भगवतीदेवीं भवेशं गुरुं
भक्त्यानम्य पुरन्दरं कुलपतिं श्रीमालिकं चाग्रजान्॥
गङ्गाख्यां जयदेवदिव्यकविताव्याख्यामिमां मैथिलो
बह्वर्थप्रतिपादनाय तनुते श्रीकृष्णदत्तः कविः॥" (प्रारंभींचा द्वितीय श्लोक)

आणि

"माता पुण्ययशस्वती भगवती–देवी भवेशः पिता
सन्तो यस्य पुरन्दरः कुलपतिः श्रीमालिकश्चाग्रजाः॥
तेने मैथिलकृष्णदत्तकविना तेनेह गङ्गाभिधा
टीकाया लहरी समाप्तिमगमत्तस्यामियं द्वादशी॥

इति भगवतीभवेशसम्भव श्रीकृष्णदत्तकृतायां श्रीगीतगोविन्दव्याख्यायां द्वादशी लहरी" (अन्तिम भाग)

अशीं आहेत. त्यावरून कृष्णदत्त मैथिलीच्या बापाचें नाव 'भवेश,' आईचें नाव 'भगवतीदेवी' व विद्यमान ज्येष्ठ भावाचीं नावें अनुक्रमें 'पुरन्दर', 'कुलपति' व 'श्रीमालिक' अशीं असल्याची माहिती मिळते. या टीकेंत प्रारंभींच्या चतुर्थ श्लोकांत इसवी सनाच्या सतराव्या शतकांतील मधुसूदनसरस्वतीचा उल्लेखहि आलेला दिसतो.

कृष्णदत्त मैथिलच्या इतर दोन ग्रंथांच्या मैथिल लिपींतील प्रती मिथिलेंतच कै. प. हर्षनाथ झा यांच्या संग्रहांत असल्याबद्दल माहिती बाबू राजेन्द्रलाल मित्र यांच्या वर निर्दिष्टिलेल्या वर्णनात्मक संस्कृत-ग्रंथ-सूचींतून मिळते.§ त्यापैकीं प्रथम ग्रंथ म्हणजे मार्कंडेय पुराणांतील दुर्गासप्तशतीच्या आधारानें रचिलेलें देवीचरित्रवर्णनपर 'चण्डिकाचरितचन्द्रिका' नावाचें अठरा सर्गांचें व ७३४ पद्यांचें एक संस्कृत काव्य होय. पण त्यांत कवीनें स्वतःविषयीं विशेष तपशील दिलेले दिसत नाहींत. दुसरा ग्रंथ म्हणजे कुवलयाश्व व मदालसा यांच्या प्रसिद्ध प्रेमकथेवर रचिलेलें 'कुवलयाश्वीय' नावाचें सहाकी संस्कृत नाटक होय. त्यांतहि कवीनें स्वतःविषयीं विशेष माहिती दिली नाहीं. पण नाटकाच्या प्रस्तावनेंतील

"कृष्णदत्त इति मैथिलः कविर्बालभावसुलभात्कुतूहलात्॥
नाटकं यदभिनव्यमातनोत्कोऽत्र सम्प्रति गुणागुणग्रहः॥"

‡ J Eggeling Catalogue of Sanskrit Manuscripts in the Library of the India Office Volume VII (London, 1904) p 1458, Ms No 197

§ *Notices of Sanskrit Manuscripts*, Vol VI, (Calcutta, 1882,) Nos 2005 (p 30) and 2035 (p 64–66)

या श्लोकावरून कृष्णदत्त मैथिलानें हें नाटक तो स्वत " प्रौढ " झाल्यानतर रचिलेल्या ' पुरञ्जनचरित ' नाटकाच्या अगोदर रचिलें असलें पाहिजे असें दिसतें. या ' कुवलयाश्वीय ' नाटकातील शेवटचें

" काले काले तडित्वानमृतरसमयीं वृष्टिमिष्टां विधत्तां
पृथ्वी सम्पन्नशस्या भवतु विजयिनः पान्तु लोकं नरेन्द्राः ॥
सर्वः सर्वत्र नन्दत्वखिलगुणगुरो विन्दतु प्रेमभक्तिं
तद्विश्वेशे दयार्द्रे प्रसरतु परितः सत्कवेः सूक्तिरत्नम् ॥ "

हें भरतवाक्यहि महत्त्वाचें आहे. त्यात कृष्णदत्त मैथिलानें स्वत ची शिवभक्ति प्रकट केली आहे. त्याच्या या इतर तीनहि ग्रथातील प्रारभींच्या मङ्गलाचरणातून शिव आणि पार्वती यानाच वदन केलेलें दिसत असल्यामुळे ' पुरञ्जनचरित ' नाटकात आढळणारी विष्णूची किंवा व्यकटेशाची भक्ति वस्तुत ग्रथकाराची नसून ती त्याचा आश्रयदाता दवाजीपत चोरघाड याचीच असावी हें नि.सशय सिद्ध होतें. कृष्णदत्त हा वस्तुत इतर मैथिल ब्राह्मणाप्रमाणें शैव किंवा शाक्त असून त्यानें देवाजीपताच्या तोंडपुजपणा करण्याच्या उद्देशानेंच ' पुरञ्जनचरित ' नाटकात व्यकटेशनेशसाविषयीं उसना किंवा भाडोत्री जिव्हाळा दाखविला असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं !

कृष्णदत्त मैथिलाच्या तीन ग्रथाच्या मैथिल लिपींतील वर निर्देशिलेल्या हस्तलिखित प्रतींचा मध्याचा ठावठिकाण माहीत करून घण्यासाठीं व त्याविषयीं इतर माहिती मिळविण्या साठीं म्हणून काहीं दिवसापूर्वी मी आमच्या अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे माजी व्हाइसचॅन्सलर व कै. पडित हर्षनाथ झा याचे जामात परमपूज्य विद्वद्वर्य महामहोपाध्याय **डॉ गंगानाथ झा** याची प्रयाग येथे मुदाम भेट घेतली. कृष्णदत्त मैथिलाचें प्रचारातलें नाव ' कृष्णदत्त झा ' असें होतें, तो कै. प. हर्षनाथ झा याच्या पूर्वजापैकींच असून त्या काळातील नामांकित विद्वान् होता, तो नागपुरास काहीं वर्षें राजाश्रयानें राहिला असल्याची परपरागत माहिती मिथिलेंत त्याच्या घराण्यात अद्याप रूढ आहे तसेंच कै प हर्षनाथ झा याच्या मालकीचे वर निर्देशिलेले कृष्णदत्ताचे ग्रथ त्याच्या मालकीच्या इतर अनेक ग्रथासह मिथिलेंतच त्याच्या विद्वान् चिरजीवानीं सुरक्षित ठेविले आहेत, इत्यादि माहिती त्या भेटींत त्याजकडून मिळाली पुढें मागें ' पुरञ्जनचरित ' नाटक छापून काढण्याचें जुळल्यास त्या वेळीं त्याची ' मिथिला ' प्रत पाठभदाच्या तुलनेसाठीं म्हणून मिळविता येईल.

# राजपूत-मराठे युद्ध

( इ. स. १७५४-इ. स. १७६६ )

[ लेखक— मा. वि. गुजर, बी. ए. ]

औरंगजेब बादशहानें दक्षिणेंत स्वारी करून, मराठ्यांचें स्वातंत्र्य नष्ट करण्याकरिता अव्याहत वीस वर्षे मोठ्या निकरानें लढा चालू ठेविला होता. या प्रसंगीं अनेक रजपूत संस्थानिक आपआपल्या फौजनिशीं, मुसलमानांबरोबर खांद्याशीं खांदा देऊन लढले. रजपुतांचा पराक्रम स्वधर्मीयांचें यवनापासून संरक्षण करण्याचे कामीं उपयोगी न पडता स्वधर्मीयांचें खंडण करून यवनांचें साम्राज्य वाढविण्यासाठीं गाजला. पुढें इ. स. १७१४ मध्यें शाहूमहाराजांनीं स्वराज्याच्या मतलबाची यादी बाळाजी विश्वनाथ पेशवे यांना करून दिली त्या यादीबरहुकूम मोगलांच ताब्यातील गुजराथ व माळवा ह्या दोन प्रांतांत मराठ्यांचा अमल जेथवर रमविता येईल तेथवर बसवावा, असा मराठ्यांचा मनसुबा ठरला. मराठ्यांनीं दिल्ली दरबारांत माजलेल्या अराजकतेचा फायदा घेऊन आपला हात दिल्लीचे राजकारणांत शिरकविला, आणि वरील मनसुबा पार पाडण्यासाठीं इ. स. १७१९ मध्यें अनुरूप भूमिका तयार केली. बाजीराव बल्लाळ पेशवे यांनीं नर्मदा नदी आलांडून गुजराथ व माळवा या प्रांतांवर स्वाऱ्या करण्यास सुरवात केली. या प्रसंगीं पश्चात्याना मराठ्यांचा अमल या प्रांतांत बसविण्यासाठीं निजामाशीं, मोगल सुभेदाराशीं व प्रसंगोपात्त रजपुतांशीं, अनेक वेळा राजकारणें लढवावीं लागलीं, परंतु हीं सर्व राजकारणें, मराठ्यांनीं राज्यवृद्धीसाठीं आरंभिलेले प्रयत्न केवळ यशस्वी होण्यासाठीं म्हणून होतीं, त्यांचें अधिष्ठान धर्म नव्हे.

जयपुरचा राणा सवाई जयसिंग यानें मराठ्यांशीं राजकारण करून त्यांना माळव्यावर स्वाऱ्या करण्यास प्रोत्साहन दिलें. ह्या राजकारणाचे बुडाशीं रजपूत मराठे एक होऊन यवनांस्तात मुलुख जिंकावा व हिंदूंचा अमल जारी करावा हें नव्हतें. सवाई जयसिंगास आपला मुलुख यमुना व नर्मदा नद्यांस भिडवून, मोगल दरबारांत स्वतःची प्रतिष्ठा वाढवावयाची होती. पुढें त्या प्रतिष्ठेच्या जोरावर सर्व रजपूत राजांचें धुरीणत्व संपादावें ही सवाईजीची जबर मनीषा होती. परंतु मोगल बादशाही मसनदपरंपरेत सापडून मेटाकुटीस आल्याशिवाय ती कशी साध्य होणार? तेव्हा सवाई जयसिंगानें ह्या स्वार्थीबुद्धीनें बादशहास सतावून सोडण्याचे कामीं मराठ्यांचेंहि साह्य घेण्याचें ठरविलें.

सन १७२९ मध्यें बादशहानें जोधपुरचा महाराजा राजराजेश्वर अभयसिंग यास गुजराथचा सुभेदार नेमलें, आणि त्या प्रांतात मराठ्यांचा उच्छेद करण्याचें कार्य त्याच्यावर सोपविलें. सन १७३० च्या ऑक्टोबरात त्यानें या प्रांताचा अधिकार स्वीकारिला. पुढें दोन वर्षांच्या कारभारानंतर सुद्धा त्याला मराठ्यास पायबंद घालता येईना. तेव्हा शेवटीं मराठ्यांना चौथाई देणें कबूल करून तो कारभार सोडून परत गेला.

प्रांतिक सुभेदाराकडून मराठ्यांच्या गुजराथ–माळव्यावरील स्वाऱ्यास प्रतिबंध होत नाहीं हें उमजल्यावर बादशहानें मराठ्यांचा प्रतिकार करण्यासाठीं वजीर कमरुद्दिनखान व सवाई जयसिंग यांना फौज देऊन सन १७३२–३३ त मराठ्यांवर चाल करून पाठविलें. त्या वेळीं मराठ्यांना सवाई जयसिंग व त्याचे राजपूत शिपाई यांच्याबरोबर लढणें भाग पडलें. या लढाईंत राजपुतांचा पराभव होऊन सवाई जयसिंगानें मराठ्यांस सहा लक्ष रुपये रोख व सुरत शहाजवळील वसूल देण्याचें कबूल केलें. ६

सन १७३४ मध्यें मराठ्यांनीं बुंदी संस्थानचा पूर्वीचा राजा बुधसिंग याची बुंदीचे गादीवर स्थापना करण्याचें कार्य हातीं घेतलें व त्यांनीं राजपूत राजकारणात प्रथम प्रवेश केला. त्यामुळें राजपूत राजांचे डोळे उघडले. मराठ्यांचा वेळींच बंदोबस्त करण्यासाठीं काय धोरण योजावें, ह्याचा विचार करण्याकरिता सवाई जयसिंगानें पुढाकार घेऊन सर्व राजपूत राज मंडळाची बैठक मेवाडातील हुर्डा गावीं तारीख १७ जुलै १७३४ रोजीं भरविली. तींत सर्व राजपूत राजांनीं एकी करून पावसाळ्यानंतर मराठ्यांना नर्मदेपार घालवून देण्यासाठीं स्वारीवर निघण्याचा करार केला. करारप्रमाणें सर्व राजपूत राजांनीं फौजेसह स्वारीच्या सिद्धतेनें रामपुरा येथें जमा होण्याचा बेत केला होता. परंतु या योजनेंत सवाई जयसिंगाचा स्वार्थी हेतु आहे असें दिसताच इतर राजपूत राजांनीं त्याला मदत करण्याचें नाकारिलें. सवाई जयसिंगानें निरुपाय होऊन फिरून मराठ्यांशीं तडजोडीचें बोलणें सुरू केलें. सवाईजींचा असा डाव होता कीं, सर्व राजपूत राजेरजवाड्यांची एकी करून मराठ्यांना विरोध करावा आणि त्यांनें माळव्यांतून उच्चाटन करावें. पुढें सर्व माळवा आपल्या हाताखालीं आणावा. हा डाव सिद्धीस नेण्यासाठीं सवाई जयसिंगानें सर्व राजपूत राजांच्यानी एकी करण्याचा पुन्हा प्रयत्न केला, परंतु त्याला यश आलें नाहीं. ५

चालू असल्या मोहीम मोडून त मर्व आपआपल्या मुलखाचा बंदोबस्त करण्यासाठी [illegible]
पुढे मीर बक्षीखान डौराननें सवाईजींच मध्यस्थीनें मराठ्यास माळव्याची चौथाईबद्दल
रक्कम देण्याचें कबूल केलें. ‡

त्यानंतर अयोध्येचा नबाब सादतखान व वजीर कमरुद्दिनखान यांनीं सवाई जयसिंग
बादशहाजवळ या अपनयाबाबत नाराजी केली तेव्हा आग्रा व माळवा प्रांत बादशहा
आपल्याकडून घेणार ह्या भीतीनें सवाईंनीनें सादतखान व कमरुद्दिनखान यांच्या खरपटी
हाणून पाडण्यासाठीं, आपल्या दरबारी असलेल्या मराठ्यांच्या वकिलामार्फत बाजीराव
पेशव्याकडे राजकारण लिहिलें कीं "आम्हीं ( सवाईजी ) रायाचा ( बाजीराव पेशवे ) उत्कर्ष
रक्षण करत कीं तुर्कांचा ( बादशहाचा ) भरवसा नाहीं तर ( मोगल ) दक्षिणी फौजावर
( मराठ्यावर ) स्वार झाले, तर आम्हासही न मानत यामुळें सरस्वी रायाचा बाल
उपर केला " § —

पुढें १७३० साल्च्या आक्टोबरात बाजीराव पेशवे उत्तर हिंदुस्थानचे स्वारीवर निघाले
या स्वारींत सन १७३६ मध्यें मराठ्यांनीं उदयपुरच्या राण्यावर खंडणी बसविली बाजीराव
पेशव्यानें ३ मार्च १७३६ रोजीं सवाई जयसिंगाची भेट घेतली, आणि त्याच्याकडून
माळव्याच चौथाईबद्दल त्या वर्षाचे २२ लाख रुपये घेतले या समयीं सवाईजीनें मराठ्यास
माळव्याच सुभेदारीचें फर्मान ६ महिन्यात बादशहाकडून मिळवून देण्याचें कबूल केलें त्यानंतर
मारवाडचा राणा अभयसिंग मराठ्यांविरुद्ध मोगल दरबारातील तुराणीपक्षास सामील झाला होता
सबब सन १७३६ च्या एप्रिल महिन्यात मराठ्यांनीं मारवाडचा प्रदेश उध्वस्त केला सवाई
जयसिंगाशीं केलेल्या राजकारणानें मतलब साध्य होत नाहीं हें उमजल्यावर बाजीरावानें मन
१७३६ च्या नोव्हेंबरात फौजेच्या जोरावर मोगल दरबारातून आपले कार्य करून घेण्याचें
ठरविलें त्या प्रसंगीं बादशहानें मराठ्यांचे प्रतिकारार्थ जी तमाम फौज जमा केली, तींत सवाई
जयसिंग तारखाना व पधरा हजार फौजेनिशीं आणि राणा अभयसिंग दहा पधरा हजार
फौजेनिशीं डेरे दाखल होऊन, मराठ्यांशीं टक्कर देण्यासाठीं आल्यानजीक येऊन, खान डौरान
व नबाब सादतखान यांना सामील झाले पुढें मराठ्यांना नर्मदेपार काढून लावण्याचें कार्य
निजामानें शिरावर घेतलें तेव्हा मराठे व निजाम यांच्यामध्ये भोपाळ येथें १६ १२ १७३७
रोजीं लढाईस सुरवात झाली ह्या लढाईंत राजपूत राजवाड्यांनीं मराठ्यांविरुद्ध निजामाचा
उपराळा केला तेव्हा निजामाचा पराभव केल्यानंतर मराठ्यांनीं निजामास सामील झाल्या
राजपूत राजाचा सूड घेण्याचें काम आरंभिलें त्याप्रमाणे बाजीरावानें कोट्याचा राणा दुर्जनसाल
याच्यावर चाल करून त्याचा पराभव केला राण्यानें १० लक्ष रुपये खंडणी देण्याचा
करार केला †

---

‡ पे द, भा १४, ल २४ २६, २७
§ पे द, भा १४, ल ४७ ३१
† पे द, भा १५, ल ६५, ६८, ६९

इ. स. १७४१ मध्ये मराठे उत्तर हिंदुस्थानात गेले. तेव्हा मराठी फौज अतरवेदींत उतरून बादशाही मुलुख उध्वस्त करणार ही बातमी बादशहास पोहोंचली. त्याने ह्या मुलुखाचें सरक्षण करण्यासाठीं, प्रयागचा सुभा, अयोध्येचा सुभा व सवाई जयसिंग या तिघाना मराठ्यावर चाल करून जाण्यास सागितलें. परतु प्रयागचा सुभा व अयोध्येचा सुभा सवाईजीच्या मदतीस न आल्यामुळें, सवाईजीस मराठ्याचा प्रतिकार करणें अशक्य झालें. तेव्हा निरुपाय होऊन त्यानें नानासाहेब पेशव्यास सलुखासाठीं भटीस बोलावून भेट दिली.¶

मराठे गुजराथेंत मुलुख जिंकीत. त्या मराठ्याना पायबद देण्यासाठीं बादशहानें मारवाडच्या राण्याचा भाऊ बख्तसिंग यास तारीख २९ जून १७४८ रोजीं गुजराथचा सुभेदार नेमलें. पुढे मारवाडचा राजा अभयसिंग २१ जून १७४९ रोजीं वारला. तेव्हा बख्तसिंगानें आग्रा व अजमीर सुभ्याचें मराठ्याच्या स्वाऱ्यापासून सरक्षण करून, त्या सुभ्यात राज्यकारभार सुरळीत चालण्यासाठीं बादशहाचे अधिकाऱ्यास मदत करावी म्हणून, बादशहानें बख्तसिंगास मारवाडचें राज्य मिळवून देण्यासाठीं, मीर बक्षी सलाबतखान यास १८००० फौजेनिशीं बख्तसिंगाचे मदतीस पाठविलें. $

अशा प्रकारें मराठ्याच्या राज्यवृद्धीच्या कार्यात, राजपूत आरभापासून मोगलाचे वतीनें मराठ्यास कसून विरोध करत होते, हे स्पष्ट निदर्शनास येतें सवाई जयसिंग मराठ्याशीं सलूख राखण्याचा प्रयत्न करी, याचा भावार्थ इतकाच कीं मराठ्याच्या मदतीनें, दिल्ली दरबारात स्वत चें वर्चस्व प्रस्थापित करून, आपला मुलुख यमुनेपासून नर्मदेपर्यंत वाढवावा आणि मराठ्यास खडणीरुजा रोख रक्कम देऊन त्याना ठिकाणीं बसवावें. त्याप्रमाणें मराठ्यानीं सवाई जयसिंगाशीं राजकारण राखिलें तें एवढ्याच उद्देशानें कीं आपली बाजू उचलून धरणारा एक पक्ष दरबारात असावा. नाही तरी शेवटीं ही मध्यस्थी सोडून, स्वत चे सैन्याचे जोरावरच आपले हेतु त्याना पार पाडणें भाग पडलें.

बादशाही सत्ता क्षीण करून स्वत में राजकीय वर्चस्व प्रस्थापित करावयाचें हें मराठे व राजपूत या दोघाचें उद्दिष्ट, दोघाचा शत्रु जरी एक असला तरी धोरण परस्पर विरोधी. राजपुतान्या साह्यानें मोगल बादशाहीचे वाभाडे काढण्यास मराठे तयार झालेले, तर मराठ्याच्या मदतीनें माळवा, आग्रा, राजपुताना या भागात आपली स्वतत्र सत्ता उभारावयाची अशी राजपुतान्ची इच्छा. अशा परिस्थितींत राजपूत राजेरजवाड्यात एकी राखून टेवून त्याचें सामर्थ्य वाढविणें म्हणजे मराठ्यानीं स्वत स पेंच निर्माण करण्यासारखें होतें. राजपुतास देखील, मोगल दरबारात आपलें वर्चस्व प्रस्थापित करण्याची हाव होती तेव्हा अठराव्या शतकात मारवाडचे राठोड, जयपुरचे कछवा आणि बुदींचे हाडा या तीन प्रमुख पराक्रमी राजपूत घराण्यात, भाऊबंदकी मानून जो भेदभाव उत्पन्न झाला होता, त्या सर्वांचा फायदा घेऊन, नानासाहेब पेशव्यानें राजपुताना

¶ पुर. द, भा १, ले १४९

$ *Fall of the Mughal Empire*, Vol I p 307

नेस्तनाबूद करण्याचा प्रयत्न केला त्यांनी सन १७४२ च्या एप्रिल महिन्यात, राणोजी शिंदे व मल्हारराव होळकर या उभयतांना मारवाडचा राजा अभयसिंग याबाबत जें पत्र लिहिलें त्यात पेशव्यांचे धोरण स्पष्ट होतें

"अभयसिंगाचे मैत्रिकीची ममता सर्वार्थी न धरता, जातपुरावर स्नेह देऊन, दान च्यार जाग मानवर जरबेखाली आणून, द्रव्य साध्य होये तो अर्थ करणें तुम्ही ( शिंदे, होळकर ) त्यांसी ( अभयसिंगासी ) निष्ठुरता केल्याखेरीज ते राजकारणावर येऊन, पत्र्याचे व मध्याचे मार्ग करून देत नाहींत त्याजकडील वकील येथें आले आहेत परंतु ते कामावर येत नाहींत तुम्हाकडील अनल्प धरतात तरी शठाई बेइमान, त्याची माया किमपि न धरता साफ उत्तर लिहिणें "

त्यावर शिंदे व होळकर या उभयतां सरदारांनी पेशव्यास समजाविलें कीं " स्वामीनें नाव आमचे पदरीं राजमुलेंच या रजपुतांसी स्नेह अगर कान्हासी विरुध त्यास हे रजपुत ज्याजपासून निर्मान जाले अथवा साध्यान वधू ते परस्पर येकाच येक नव्हेत, तव आमचे कोहून होणार ? आम्ही याचा भरवसा केठें धरणार ? अभयसिंगानें आपणावर कधीं कुतोपकारहि केला नाहीं अथवा लाल्चेचा प्रसंगही आहे नाहीं त्यास कायावाचामनेंकरून येकनिष्ठा स्वामींचे पायीं आहे "§ यावरून नानासाहेब पेशवे व मराठे सरदार यांचे राजपुतांविषयीं काय मत होतें आणि त्यांनीं काय धोरण स्वीकारिलें हें पूर्णपणें निदर्शनास येतें

राजपूत राजेरजवाडे दखील जेर करून, उत्तर हिंदुस्थानातून मराठ्यांचा अमल उठविण्याचा वारवार कसा प्रयत्न करीत हें शिंद्याचा कारभारी रामचंद्रबाबा याने लिहिलेल्या पत्रांतील मजकुरावरून तात्काळ समजून येतें

" येथील ( सवाई जयपुर ) वर्तमान—तरी गुलाबसिंग याजला शिरपाऊ देऊन, च्यार हजार फौज देऊन, तुम्हास ( मराठ्यास ) तवी पाहोंचाऊन, भदावर व कछवा घारेत अमल करावा, व किल्ले जातीचा बंदोबस्त करून, बुंदेल्यासी सामील व्हावे त्यांनीं यानीं ( गुलाबसिंग व बुंदेले ) मिलोन, तमाम बुंदेलखंड व दतिया, वोडस, भदावर, व कछवा धार, मालवेसुधा सर्वांमाचा ( मराठ्यांचा ) नीर काढावा येैसा करार करून, सर दरबारात विडा घेऊन आला आहे "—¶

तेव्हां मराठे व राजपूत यांचे परस्पर हितसंबंध एकरूप घडवून आणण्यास अनुकूल असे नव्हते प्रयत्न त्यात चें हित ल्हूनच साध्य होणें शक्य होतें तेव्हां मराठ्यांनीं राजपुतांतील एकीचे अभावाचा फायदा घेऊन, अवघ्या राजपूत राजांकडून आपलीं राजकारणें नेमस्त करून, त्या राजांना पदरीं पाडून, शिवाय द्रव्य आणि मुलुख साधून, आपल्या हातानीं त्यांना स्थापित केलें राजपुताना आपले अंकित बनवून मराठ्यांनीं उत्तर हिंदुस्थानात मराठेशाहीची सत्ता वाढविण्याचें काय असें साधलें ह्या राजपूत प्रकरणात मराठ्यांनीं एका गोसावी महल्ल देऊन,

§ पे द, भा २७ ले २

¶ पे द, भा २१, ले ८

ती त्यानीं पूर्णपणें अमलात आणिली. ती म्हणजे खुद्द बादशहाशीं, किंवा मोगल दरबारात अधिकारावर असलेल्या उमरावाशीं ज्या राजकारणानें विरोध येणार नाहीं तेंच राजकारण स्वीकारावयाचें.

जयपुरचा राणा ईश्वरसिंग याचा धाकटा भाऊ माधोसिंग याचें राजकारण मल्हारराव होळकरामार्फत, जेव्हा नानासाहेब पेशव्याकडे आलें, तेव्हा पेशव्यानें केवळ द्रव्यलाभाकडे दृष्टि देऊन, पूर्वीचा ईश्वरसिंगाचा पक्ष सोडून, माधोसिंगाची बाजू पतकरली, असें म्हणता येत नाहीं माधोसिंगाचे राजकारणात, नानासाहेबांनें आखलेल्या धोरणास पोषक अशा अनेक गोष्टी साध्य होत होत्या होळकरानें माधोसिंगाचेबाबत पेशव्यास येणेंप्रमाणे कळविलें—

" राणाजीनें आम्हासी करार केला आहे कीं पचवीस लक्षाचा माधोसिंगाचा पक्ष करून द्यावा, वीस लक्ष नजर घ्यावी, येविसी तिळतुल्य असत्य नाहीं. आणखीही एक अर्धा साधन तेथवर साधूनच, परंतु हा निश्चये व्यर्थ जालिया उपरीं. हाडे व राठोड येर ( अहित जर ) त्यांनी आम्ही सामील जाल्या. तेव्हा ईश्वरसिंग सहजच सत्ता करून, दिल्ही लावतील. वाईचा कल्ह होत नाहीं जाला तर आपला नफाच आहे. दिल्लीकडील अनुसधान तर मर्द अमीर ( तुम्हासी नाहीमात्र दुसरा अर्थ धरीत नाहींत. आपल ) आगरून मनसुर अलीखान व अमीरखान, माधोसिंगाच साहित्यावरच आहेत. येविसी त्याची पर्ने आम्हास येतात. ईश्वरसिंगाचे कल्हामुळें दोणी अमीर आदीकरून पातशाहा बिघाड करिता येत नाहीं. हा निश्चये असा द्यावा. बुदीचा मनसूर सुदस्ता जाला जो करार केला त्याप्रमाणे आपला पैका न आला, आणि कलहही न तुटीला. बुधसिंगाचा पुत्र उमेदसिंग बुदीप्रातें धामधूम करून कजिया करीत आहे त्यांनी त्यांनी ( उमेदसिंगानी ) समजाविस करावी येणे ईश्वरसिंगाचे मानस आहे. येवरून हेहि राजकारण आपलें ( मराठ्यांचें ) होतें. दिल्ही लावलियानें कार्यसिधी चांगलीच होईल. अथवा राज ( मराठ्याच्या ) पदरीं पडून, द्रव्य साध्य होऊन, लौकिक उत्तम होतो. मर्दो ( राजपूत ) आपआपल्यामध्ये समजून राजकारणें सिध्द लावतील, परंतु आपले ( मराठ्यानें ) कार्ये ये गोष्टीनें साधत नाहीं. यास्तव आपल्या हात स्थापित करीता आपली कार्यसिधी होऊन

" उदेपुरकर व कोटेकर हे पहिल्यापासून सरकार लक्षात. त्यांस व जयपुरकर, जोधपुरकर, यांचे विरुध होते ते सरकार उपयोगी होते. परस्परें राजेरजवाडे यात फूट असल्यिानें यात सरकार उपयोग असें आहे. हल्ली उदेपुरकराचे व उभयेताचे ऐक्य करून दिले. त्यात सारे राजे एक, ठीक नाहीं. दिल्लीचा बदोबस्त जो करील, त्यास हे सारे एक असल्यानें ठीक पडणार नाहीं, कोणे समयी काय करतील हा भरवसा नाहीं. यात फूट असल्यानें चागले असे आहे. आपण पहिल्यापासून याच ( रजपुताचे ) रीतीस व चालीस माहीतच आहत. त्या होणे असें नाहीं. व आपण असें करणारही नाहीत. तर कोटेकर यास उपद्रव लागू नये. व उदपूरकर व कोटेकर यांची व जोधपुरकर व जयपुरकर याची एकी असू नय, असे करावे. कोणास दुखावू नये " †

मराठ्याचे मुख्य धोरण बादशाही कारभाराचा बदोबस्त करण्याचे होते. त्या कार्यात राजपूत राजेरजवाडे अडथळे उत्पन्न करीत, सबब मराठ्यानीं त्याच्यात बेकी राखून, त्याना निर्माल्यवत् करून, शरणीं अकित करण्याचे धोरण स्वीकारिलें या धोरणानुसार जयाप्पा शिंदे यानीं मारवाडचा राणा विजेसिंग याच्याबरोबर युद्ध आरभिलें ते युद्ध जुलै १७५४ ते फेब्रुवारी १७५६ पर्यंत चालू राहिलें. या युद्धाचा वृत्तात येणेंप्रमाणे आहे.

## युद्धाचा वृत्तान्त

जोधपूरचा राणा अभयसिंग ता. २१ जून १७४९ रोजीं वारला, व त्याचा मुलगा रामसिंग गादीवर बसला पुढें रामसिंग व चुलता बख्तसिंग याच्यामध्ये गादीबद्दल तटा उत्पन्न झाला बख्तसिंगानें ता ८ जुलै १७५१ रोजीं जोधपुरचें राज्य मिळविले. तेव्हा रामसिंग स्वमरक्षणासाठीं आपला सासरा ईश्वरसिंग याच्याकडे जयपुरास पळून गेला. ता २३.९.१७५२ रोजीं बख्तसिंग महामारीचे उपद्रानें मेला नतर त्याचा मुलगा विजेसिंग गादीवर बसला मग रामसिंगानें बापाचें राज्य मिळविण्यासाठीं मराठ्याची मदत मागितली आरभीं स १७५२ च्या जून महिन्यात जयाप्पा शिंदे यानीं साबाजी शिंदे व राणोजी भोइटे याच्याबरोबर स्वत ची पाच हजार फौज व होळकराची एक हजार फौज देऊन रामसिंगास मदत करण्यासाठीं मारवाडात रवाना केलें. त्यानीं रामसिंगाचे वकिलासह दिल्लीहून अजमीरकडे कूच केलें. मराठ्यानीं अजमिरास वेढा दिला, त्या शहरातील घरेंदारें जाळलीं आणि शत्रूचे जे लोक आडवे आले त्याना कापून काढिले, आसपासचा मुलुख लुटून उजाड केला. तेव्हा बख्तसिंग अजमीरच्या सरक्षणासाठीं मराठ्यावर चाल करून गेला. राजपुताच्या तोफाच्या आगीपुढें मराठ्याचा टाव टिकेना मराठ्यानीं राठोडाच्या मुलुखातून पाय काढून दक्षिणकडे मोर्चा फिरविला. ‡

† पे दि, भा १, ले ३

‡ शि मु प ८१, ले २०४, F M L, Vol II, p 173

पण रामसिंगाचा राज्याचा हव्यास सुटला नव्हता. तो पुन: १७ डिसेंबर १७५३ रोजीं पुनः दादास भेटला आणि आपलें राज्य परत मिळविण्यासाठीं त्यानें साह्याची याचना केली. दादानें रामसिंगाचा पक्ष उचलला. ता. २३ जून १७५४ रोजीं जयाप्पा शिंद्यास दहा हजार फौज बरोबर देऊन त्यास त्यानें मारवाडांत रवाना केलें, व रामसिंगास जोधपुरच्या गादीवर बसविण्यास सांगितलें. जयाप्पाजवळ एकंदर चाळीस हजार फौज जमली. विजेसिंगास गांठून त्याचा निकाल लावण्याकरितां मराठे सांभरच्या मार्गानें कूच करून निघाले. मराठ्यांच्या थोरल्या फौजेशीं तोंड देण्याची तयारी नसल्यामुळें विजेसिंगानें मेडत्याचा आश्रय केला, तेव्हां जयाप्पानेंहि मेडत्याकडे आपला मोर्चा वळविला. वाटेंत विजेसिंगाचा कुणागड (किल्ला) मराठ्यांनीं ऑगस्टांत सर केला. मेडत्याजवळ मराठे येऊन पोहोंचतात तों तेथे ६ ऑगस्ट रोजीं रामसिंग बारा पंधरा हजार राठोड फौजेनिशीं त्यास सामील झाला. रजपूत मराठ्यांच्या संयुक्त फौजांनीं ठाण्यास वेढा दिला, तेव्हां विजेसिंग आतून बारा पंधरा हजार फौजेनिशीं चालून आला. ता. १५ सप्टेंबर रोजीं दोन्ही सैन्यांत तुंबळ युद्ध झालें. मराठे विजेसिंगावर चाळून जाऊन नीट घोडे घालून त्यानीं त्यास मोडिलें. विजेसिंगाची फौज लुटली गेली आणि त्यास नागोरला पळून जाणें भाग पडलें. मेडतें शहर काबीज केल्यावर जयाप्पा व रामसिंग यानीं १७ सप्टेंबर १७५४ रोजीं शहरात प्रवेश करून तें तीन तास लुटलें. त्यानंतर या विजयी फौजांनीं नागोरकडे कूच करून त्या शहरास वेढा दिला.§

या मारवाडच्या मोहिमेसंबंधीं एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन, राठोडांशीं लढण्याच्या ईर्ष्येत न पडतां आपलें हित साधावें असें नानासाहेब पेशव्यानें लिहिलें होतें. नानासाहेबानें जयाप्पास इशारा दिला कीं,

"मारवाडी रजपुत अत्याप गर्विष्ठ (आहेत) तरी त्यास तजविजीनें दमवून, युक्तीनें समय पाहून, जरब देऊन, स्वकार्यसिद्धि करावी. श्रीकृपेनें सरदारी व शिपायगिरी व दाब उपाय जाणणें सर्व गुण तुम्हांस आहेत. तदनुरूप साध्य असाध्य विचार करून कार्य करणें. जर जोधपूर निम्मे राज्य यानेसें (विजेसिंगाचा) विचार जहाल्यास उत्तम आहे. दाटून अगदीं घ्यावयासाठीं कलहवृद्धी न करावी, हा थोराचा संप्रदाय आहे. जर युद्धावाचून साम न होयेसेंच असल्या सावधतेनें आपले रीतीनें त्यास (विजेसिंगास) आयास आणून नम्र करून कार्य संपादावें."

पुढें विजेसिंगाचा मेडतें येथें पराजय झाल्याचें वर्तमान पेशव्यास कळल्यावर, त्यानें जयाप्पास सुचविलें कीं, पूर्वी बख्तसिंग व राजे अभयसिंग यानी वाटणी झाली आहे, त्यास अनुसरून बख्तसिंगाचा वाटा त्याचा पुत्र विजेसिंग यास द्यावा आणि अभयसिंगाचा वाटा त्याचा पुत्र रामसिंग यास द्यावा. या दाव्याचा एक विचार परस्परें करून देऊन, विजेसिंगा पासून आपलें स्वकार्य होईल तें करून घ्यावें, व रामसिंगापासून करारप्रमाणें कार्य करून घेऊन

§ रि. सु. प. व्य., भा. २, ले. १५२, ४७, ५५

माफळ द्वारें मारण विजसिंगाची यानू उखडून टाकणें हा दीर्घ प्रयत्न असून त्यास फार दिवस लागल असते शिवाय पराभ्याची अशा इच्छा हानी की जयाप्पान मारवाडात गुन्तून न राहाता थार मनसुब शिवार घऊन विशेष फलप्राप्ती करून दारजावी या वेळीं गोहदकर राणा ग्वाल्हरस आपल्या मुलखात मळावला हाता त्याचें पारिपत्य मरणें जरूर होतें अतरवेदींतील राहिले शिरजोर झाल हाते त्याचा पाडाव करण्यानें काम मराठ्यांना हातात घ्यावयाचें हातें तसन्त अयोध्यचा सुभेदार वजीर मनदरजग हा नुकताच वारला होता आणि याचा पुत्र सुजाउद्दौला हा अयोध्या अलहाबाद प्रांताचा सुभेदार झाला हाता तव्हा सुजाउद्दौल्याकडून मळी मागी रकम व प्रयाग, बनारस, अलहाबाद वगैरे हिंदूंची पवित्र भत्रें मिळविण्याची ही संधि होती ह उमदे मनसुबे साधण्यासाठीं दिल्लीकड राघोबाच्या मदतीस जयाप्पा शिंद व त्याच्या हाताखालील मराठी फौज याची जरूर हाती पण नागाराम अडकून पडल्यामुळें दिल्लीकडील कार्यास शिंद्यास हातभार लावता येईना §

मारवाडच्या माहिमेंत काम लाबणीवर पडू नये, व तें स १७५० च्या जानेवारी फेब्रुवारीचे सुमारास सरावें अशी इच्छा राघोबा व मल्हारराव होळकर याच कारभारी सखाराम भगवंत बोकील व गगाधर यशवत चद्रचूड यानी हानी तव्हा या कारभाऱ्यांनी जयाप्पा शिंद्याचा कारभारी रामाजी अनंत दाभाळकर यास लिहिलें की

" आपल्या साहित्यास यऊन कोणेहि प्रकारें तूर्त निकाल काढावा असे असिले तरी सत्वर लिहाव यथून चार मजली तुमच्या छावणीवरी आल्यानें निकाल पडत असला तर तसेच लिहाव जो विचार जयाप्पाचे ध्यानात असेल तोच लिहावा दिल्लीचे कार्यभागाचा निकाल महाप्रयासें होऊन मल्हारराव होळकर जयनगरचे रोखें गले राघोबा दादाहि सत्वरच यतील सुरत गाव जयाप्पास येथें ठेवून श्रीमतानी ( राघोबा दादानीं ) जावे, हें आमच्या ( सखाराम बापूच्या ) चित्तात येत नाहीं त्याहीमध्यें श्रीमत व सुभेदार मिळोन ग्वाल्हेरीच्या रोखें विठ्ठल पंताच ( विंचूरकर ) साहित्यास गलियानें त्याचे काम खामखा होते असं असिलं तरी नाही प्रकार आपण जयाप्पास पुसावा मारवाड ज्याप्रकार करून गातवर सरदार पचावून निघत ते जरूर करू पाहिजे सर्व एकरूप जालिया उत्तम आहे "

पुढें जयाप्पा शिंद्यानें राघोबास समजाविलें की,

" राघोबा दादा धनी आहेत त्यानीं येथें राहावें आणि मारवाडचा कारभार विल्हे लावावा परतु त्यानी मल्हारबास आणू नये व मल्हारबाचा पाय यात नसावा मल्हारबास आणावयाचे चित्तात असल तर श्रीमंतानीही जावें आमचे आम्ही विल्हेस लावू "

त्यावर राघोबानें होळकराच्या कारभारी गगाबा तात्या यास बोलावून खलबत केलें खलबत झाल्यावर सर्वांनीं एकत्र होऊन विचार केला कीं राघोबानें रूपनगरास मार्चे लावून तें स्थळ हस्तगत करावें गगाबा तात्यानें मल्हारबाकड जाऊन त्यास आणावें व जयाप्पाचे चित्तात

§ का स ले १२५ १३५ शि मु प व्य भा ३ ल ५९ ६१

मनसब आहेत त्याप्रमाणें मल्हाररावानें ऐकून विल्हेस लावावें मग सर्वांनीं एकत्र होऊन दह्यास जावें परंतु जयाप्पा शिंद्यानें सखाराम बापूस स्पष्ट लिहून कळविलें कीं, "तुम्ही जिकडे जाणें तिकडे जावें, आमच्या मनसब्यांत चित्त न घालावें" अशा प्रकारें सन १७५५ च्या फेब्रुवारी व मार्चमध्ये मराठे सरदारांत भेदभाव उत्पन्न होऊन गोष्टी ह्या थरास आल्या §

इकडे राघोबा व गंगाधर यशवंत यांनीं अंतरवेदींतील सादुल्ले पठाण यांचा तह कायम केला तसेच मल्हारजी होळकर व सखाराम बापू या उभयतांना रेवाडी व पागादि या ठिकाणीं राहून, सर्वांचा परामर्ष करून जयपुरच्या माधोसिंगाकडे मामलत ठरविली त्यानंतर साभर प्रांतीं येऊन त्यांनीं नागोरच्या रोखें जावयाचा विचार केला राघोबा साभरजवळ येऊन पोहोंचल्यावर राजे विजेसिंगाकडील निजभारती गोसावी सल्लामसलतीकरितां त्यांच्याकडे आला तेव्हां राघोबानें विचार केला कीं विजभारतीचें मानस घेऊन, नागोराकडे जाऊन, जसें बनेल तसें जयाजी शिंदे यांचे व विजेसिंगाचें सख्य करून देऊन, रामसिंगास जोधपुरी स्थापून पुढें जो कर्तव्यार्थ तो करावा यास्तव राघोबानें मल्हाररावास व सखाराम बापूस पत्रें पाठवून पुष्करास येऊन सामील होण्यास सांगितलें पुष्करास येऊन पोंचताच जयाजी शिंदे यांचें पत्र येऊन पावलें कीं,

"अजमेरच्या गडांत तर ठाणें कायम झालें ह्याकरितां विजेसिंगानें इतकी तयारी भागरी त्या स्थळाचें बळहि मोठें होतें विजेसिंगाचें जन्मसचित व त्याचे पित्याचें विचविषय देखील सर्व त्याच ठिकाणीं होतें ह्या स्थळाची मोठी आड पडली होती परंतु तें स्थळ रामसिंगजीच्या राजपुतांच्या हातासीं आलें तो हा नागोर आतां फत्ते झाली म्हणून जाणावें विजेसिंगाकडून पांचजण भले माणूस येऊन सलुखासाठीं रदबदल करीत आहेत मनसबा ठरेल होईल आतां थोडक्यांत दिवसांत इकडील गुंता उरकून तुम्हांस ( राघोबा दादास ) सामील होतों तोंवर तुम्ही रूपनगरची शिस्त देऊन ती जागा कांबीज करावी हेंच उत्तम"

व रदबदलींत घालविले या समयात गासावी व चव्हाण याच्या अगभूते मारेकरी माणसें होतीं त्यानीं मधि पाहून ता २४ जुलै १७०० रात्रीं दगा करून जयाप्पाचा खून केला जयाप्पा स्नानास चौथीवर उघडे बसले त्यासमयीं रजपुत दगयासी आला सुरी घेऊन, अस्तनींत लपवून त्यानें पोटात दोन सुरी चालविली या प्रकारें जयाप्पास दगा झाला राजपूत व त्याबरोबरील दुसर चौघ राजपूत मारकरी मृत्यु पावले मराठ्यांच्या लष्करात एकच हाहा कार झाला जयाप्पाच्या मृत्यूमुळे तमाम जाट, रजपूत, मोगल शेर झाले तेव्हा प्रसगावधान राखून दत्ताजी शिंद्याने मोर्चे कायम केले नागारची फौज नागोरास, जालरची जालोरास व जोधपुरची जोधपुरास कायम केली अजमिरास जावयाचा विचार झाला होता तो रद्द केला, कारण आता फुटून फळी उचलली तर अब्रू जाते तेव्हा दत्ताजी शिंद्यानें असा करार केला कीं, शह न मोडिता रागडे कापून काढवित नाहीं तर तमाम हिंदुस्थानात जोर यईल व सार फितूर करतील त्यानें नानासाहेब पेशव्यास लिहून कळविलें कीं, " विजेसिंगास उत्तम प्रकारे तग केले आहे वरकड कोणाच्यानें काहीं त्याची कुमक करवत नाहीं स्वामींनीं ( पेशव्याने ) त्याच ( विजेसिंगाचे ) वकिलास साफ सागून निराश आला केलासबामी आपानीं जो अभिमान धरिला होता तो शेवटास नेल्यानें लौकिक व स्वामीकार्य, सर्वांस जय आहे " तेव्हा पेशव्यानें दत्ताजीचा परामर्श काळजीपूर्वक घेऊन, जयाप्पाच्या धारणात किंवा वर्तनात काय दोष होते हे गोड शब्दात वर्णन करून, राज्यचालकानें आपला शह कसा ठेवावा याविषयीं मार्मिक पत्र दत्ताजीस लिहिले—

" आप्पानी जे अवलंबिले ते आम्हास ( पेशव्यास ) सर्व प्रकारें करणे परंतु हा राजकाय प्रसंग आहे तुम्ही अवलंबिले काय ते अगत्य आम्हास करणे परंतु होणारानुरूप आपानी ( जयाप्पा ) हातिर वाढिल शिपायगिरीची रीत केली सरदारगिरीचा प्रकार न केला जेव्हा प्रथम भारथी लढाई मारली त्या उपरी नव्या दबावात नूट सोसून, सलूख इत्यप्रकारें, पुढील संकट दूरदर्शीनें जाणून, करून मोकळे जाहले असते तर आज प्रयाग, अतरवेद व अलीकडील रानीचा मुलुख साडेतीन वगैरे कामे सर्वही सरकार किफायतीची होऊन गेली असती परंतु होणारास इलाज नाहीं तुम्हींही आजपावेता शिपायगिरी केली आता सरदारीची रीत धरून तजवीजीनेंच काहीं कामे करावीं जरूर संकट पडेल तयेंच नेटून शिपायगिरी करावी तीन शिंद्याचे एकनिष्ठ सेवक कामाचे असता, तुमचा अभिमान नसावा हे कधींही या घरात घडणार नाहीं सर्व प्रकारें समाधान चित्तानें करून, आपैल्याचे रीतीने जमा ज समयीं प्रसंग पडेल तसा मनसबा करीत जाणे सन्वरच दीढा महिन्यात पाच सहा हजार फौज घेऊन पावल मागाहून त्यामागेही वीस हजार फौजेनिशीं येतच आहे विजेसिंगाच्या वकील पत्राम लक्ष ( रुपय ) नजर, रामसिंगास धाकीही जागा पोटापुरती द्यावी, ऐसे बोलत होता आम्ही ते गोष्ट मान्य केलीच नव्हती मध्ये हा प्रसंग ( जयाप्पाचा खून ) जहाला याजमुळें आम्ही साफच त्यास ( वकिलास ) जबाब दिला कीं याउपर आम्हास तह करणे अनकूल पडत नाहीं तुम्ही ( वकील ) जाणे ऐसें म्हणोन निराश दिला तेथें ते ( विजेसिंग ) आता चढी लागले असतील, व मध्यस्थ मारले गेले त्यामुळें मध्यस्तीनहीं काणी फिरत नसेल अन्याय त्यानीं ( विजेसिंगानीं ) रामसिंगास पत्रा दिमानी

जागा दिली व तुमचा ( दत्ताजीचा ) शिबंदीखर्च मसलतखर्च फिटोन दहा लाख जाजती दिल्हे, तर घेऊन मल्लूख करून त्या संकटातून सुटावें हे राज्यभार अश्वैन्द्रणास उचीत आहे. तेथील प्रसंगानुरूप करणें. "

पुढें पेशव्यानें, दत्ताजी शिंदे यानीं हिंमत धरून मनसुबियास आव घातला होता तो प्रकार सिद्धीस पावावा यासाठीं ग्वाल्हेरहून अंताजी माणकेश्वरास मारवाडातील मराठे फौजेच्या मदतीस पाठविलें. तसेंच यशवंतराव पवार आणि समशेर बहादूर याना दहा हजार फौजेनिशीं कुमकेस रवाना केलें. शिवाय शिंद्यांच्या कारभारी रामाजी अनंत याना पेशव्यानें राठोडाचा पाडाव करण्यासाठीं सुचविलें कीं,

" राजपुतामध्यें जाटाशीं राजकारण राखून, एकाशीं स्नेह तर एकाशीं विघाड, एकदाच सर्वांशीं कजिया करूं नये. तूर्त तोंडानें बरकडाशीं फारच गोड बोलून राजकारण राखावें. दलबाचा स्वभाव शिपायगिरीचा आहे, यास्तव रागें करून असमयीं अस्थानीं निकडीस प्रवर्ततील. त्यास समजावून गोड बोलूनच सागत जाणें. दोन चार मिळून पचवीस चाळीस हजार ( राजपुत ) जमा होऊन आले तर गनिमी तऱ्हेनें तीन महिने सभाळणें. "†

जयाप्पाचा काळ झाल्यानंतर बिजेसिंगानें मराठ्यांना मदत देण्याकरिता जयपुरच्या राणा माधोसिंग यास आपल्या वाजूस वळविलें. माधोसिंगानें आपला वकील दिल्लीस पाठवून, पातशहा व वजीर याना विनंती केली कीं " आपण मराठे याचा खून केला. तुम्हीं बाहेर निघावें. आम्ही सामील होतों. " वजिरानें माधोसिंगास सांगितलें कीं " आपणावर सिबंदीचा पैसा चढला आहे. पेंठास नाहीं. " त्याजवर माधोसिंग वगैरे यानीं सांगितलें कीं " तुम्ही ( वजीर, बादशहा ) बाहेर निघा. आम्हीं ( राजपुत राजे ) खर्च चालवूं. " अशा प्रकारे माधोसिंग, जाट, वजीर व रोहिले, या चौघांची मराठ्याविरुद्ध जूट झाली; आणि बादशहा तोफखाना घेऊन मराठ्यांवर चाल करण्यास बाहेर निघणार असा बेत मुक्रर झाला. मारवाडमध्ये राठोड व राजपुतानीं एकजुटीनें मराठ्यावर सर्वत्र हल्ले करण्यास आरंभ केला. स. १७५५ च्या ऑक्टोबरचे सुमारास बिजेसिंगाने लोकास जेसलमेरकर भाटी व पोखरणकर सामील होऊन जालोर स्थळाकडे गेले. ही सर्व राजपूत फौज एकत्र होऊन,जोधपुरास वेढा दिलेल्या मराठे फौजेवर चालून येणार ही बातमी दत्ताजी शिंदास येताच, त्यानीं जोधपुरास जगन्नाथ पुरोहित, जानराव वाबळे व मल्हारजी बांडे या नियमास जमावासुद्धा ठेवून, सताजी वाबळे, माल्जी शिंदे, हुजरातीचे लोक न जिवाजी पवार व तुकोजी पवाराचे लोक असे त्यांच्यावर रवाना केले. या मराठे फौजेची व राजपुताची गाठ गोदेजेवर पडली. तेथें निकराची लढाई झाली. मराठ्यानीं राजपुताची माणसें मारिलीं व जखमी केलीं. राजपुताना बहुत फजित करून गोदेजेस कोंडिलें आणि गावा-भोंवतीं लोकाच्या चौक्या उभ्या करून, राजपुतांची रसद व वहीं बंद केली. त्यामुळें राजपुताचे लष्करात धारण रुपयास दोन अडीच शेर झाली ! नतर दत्ताजी शिंद्यानें नागोरचा बंदोबस्त

† पे. द., भा. २, ले ४८; भा. २७, ले ११६; रा. सं. ९. ले. १३९, १४१, १४२; शि सु प त्र. भा. २, ले. २२०.

राखून, रागड्यांनीं जागजागा दुल्लड करून डोकीं उचललीं होतीं त्याच्यावर फौज पाठवून, त्याचें पारिपत्य केलें. परतु राणा माधोसिंग यानें अनरूधसिंगाबरोबर फौज देऊन, विजेसिंगाचे मदतीस पाठविलें म्हणून हा कालपावेतों विजेसिंगास दम धरणें शक्य झालें. §

शहापूरवाला उमदसिंग, रूपनगरवाला बहादुरसिंग, करौलीकर गोपालसिंग आणि बुंदीवाला उमेदसिंग याचा भाऊ दीपसिंग हे राजपूत सस्थानिक आपल्या लोकांसह अनरूध सिंगास रामगड येथें सामील झाले. मागाहून बिकानेरचा दिवाण बख्तवरमल व मारवाडच्या विजेसिंगाचे लोक त्याला येऊन मिळाले. अशा प्रकारें अनरूधसिंग पंचवीस तीसहजार फौज भारी जमाव करून स. १७५५ च्या ऑक्टोबर आरंभीं मारवाडच्या सरहद्दीवर येऊन पोहोंचला. अनरूधसिंगाचा मनोदय होता कीं, नागोरास जाऊन विजेसिंगास सामील होऊन, मराठ्यांशीं लढाई करून, त्याना मारवाडांतून उधळून लावावें. परंतु नरसिंगराव शिंदे, खानाजी जाधव, व राणोजी भोईटे आणि दुसरे सरदार यांनीं राजपूत सैन्याचे पिछाडीस गाठ घालून युद्ध केलें. राजपुताची फौज सहा सात हजार व तोफखाना होता. ता. १६ ऑक्टोबर १७५५ रोजीं मराठ्याचें व राजपुताचें युद्ध बहुत उत्तम प्रकारें झालें. राजपुताजवळ तोफाच्या आगीचें बळ फार होतें. परतु मराठ्यांनीं छातीचा मोठा कोट करून, राजपुताच्या तोफखान्यावर चालून जाऊन, पहिलेच उठावणीस तोफखाना ताब्यात घेऊन, तीन चार घटकापर्यंत तरवार चालविली. मराठ्यांनीं राजपुताचे सात आठशें माणूस कापून काढिले, त्याचे हजार बाराशे घोडे व ४०–५० उंट लुटून आपले लष्करात आणिले आणि दोन तोफा व दारूगोळ्यानें भरलेल्या गाड्या घेऊन, त्याना मोडून माघारे घातलें. अशा प्रकारें राजपूत सैन्याचा चडोल बुडविला गेला आणि मराठ्याची फत्ते झाली. चार घटका युद्ध झालें. राजपुताकडील मुडदे देखील काढू दिले नाहींत. त्यानतर अनरूधसिंग जीव वाचविण्यासाठीं दीडवाण्याचे रोखें चालू लागला. वाटेनें मराठे त्याचे आसपास होते. त्यांनीं संधि साधून राजपुताचीं तट्टें, उंट व बैल लुटून आणिले. अनरूधसिंह दिडवाण्यास येऊन पोहोंचला त्या दिवशीं मराठ्यांनीं मार्गातील विहिरी बुजविल्या आणि जागजागचीं तळीं रोखून उभे राहिले. मराठ्यांनीं बहुतच निकड करून, कच्छ्याचे तीन चारशें राजपूत मारिले, शंभर सवाशें घोडे घेतले आणि तीन तोफा आणिल्या. राजपूत लष्करातील माणसें, घोडीं, उंट व बैल वगैरे मार्गामध्यें पाण्यावाचून बहुत मृत्यु पावले. त्यामुळें अनुरूधसिंग जिकीरीस आला. त्याचे लोकांस दीडवाण्याहून पुढें यायाची हिंमत राहिली नाहीं. मराठ्यांनीं दिडवाण्याच्या आसपास रात्रदिवस चौक्या उभ्या करून, राजपुतास जाणारी रसद व वही बद केली. त्यामुळें राजपुताचे लष्करात महर्गता विशेष झाली. तेव्हा अनरूधसिंगानें अगतिक होऊन आश्विन वद्य एकादशीस मराठे सरदाराची भेट घेतली व सलुखाचा संदर्भ लाविला. $

§ [ पे द, भा २१, ले ७३, पे. द, भा ०, ले ४९ ]

$ [ पे. द, भा. २१, ले. ७४, ७७, पे. द, भा. २, ले. ५०; पे. द., भा. २७, ले ११७ ]

२२

बिजेसिंगाने दिल्लीस वकील पाठवून वजीराच्या विद्यमानें पातशहास पाच लाख रुपये नजराणा पाठविला आणि अर्जी केली की, "दिल्लीहून वजीरानें पातशहास अजमीरची यात्रा व बिजेसिंगाची कुमक ऐसा मनसुबा योजून अजमीरच्या सुमारे कूच करून आणावें. दररोज दरकूच दहा हजार रुपये देत जाऊं." बिजेसिंगानें पठाण रोहिले यांच्याकडे राजकारण करून त्यास मदतीस बोलाविलें. याखेरीज त्यानें आपला वकील लाहोरप्रांतीं अबदाली पठाण याच्याकडे पाठविला आणि त्यास खर्चनेचाचें ठरवून मदतीस आणण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यास ह्या राजकारणात यश आलें नाहीं. नानासाहेब पेशव्यांनें दत्ताजी शिंद्याचे कुमकेस रवाना केलेल्या फौजेपैकीं एकटा अंताजी माणकेश्वर दहा हजार फौजेनिशीं नोव्हेंबर ४ तारखेस डीडवाण्यावर मराठ्यांचे लष्करात येऊन सामील झाला. त्यानं मार्गी माधोसिंगाचा जयनगरचा मुलुख मारून जाळून फस्त केला. डिडवाण्यास आल्यावर त्यानें शत्रूस जाणारी रसद मारली. पुढें आठ रोजानें नोव्हेंबर १२ तारखेस नागोराहून बिजेसिंग ३०० प्यादे व १०० स्वार बरोबर घेऊन रात्रीं पळाला आणि अनरुधसिंगाच्या फौजेंत येत होता. परंतु मार्गात मराठ्यांची फौज भोंवतीं असल्यामुळें तो मागें फिरला आणि बिकानेरास गेला. मराठ्यांनीं डिडवाण्यास जी राजपूत फौज घेरली होती तींत बिजेसिंगाचे लोक, बिकानेर वाले व रूपनगरवाले झाडून पचवीस हजार होते. या मराठी फौजेपुढें आपला टिकाव लागणार नाहीं अशी माधोसिंगाची खात्री पटली तेव्हां माधोसिंगानें-डिडवाण्यातून स्वतःचे फौजेची सुटका करण्यासाठीं मराठ्यास पाच लाख रुपये दंड देण्याचें कबूल केलें. अनरुधसिंगानें तहाची वाटाघाट स. १७५६ चे जानेवारींत चालू ठेविली पुढें जनकोजी शिंद्यानें अंताजी माणकेश्वरास जोधपूर प्रांतीं पाठवून राठोड राजपुतांची फौज मारून काढण्यास सांगितलें. अंताजीपंत जोधपूर प्रांतीं कूच करून गेल्यावर, मराठ्यांच्या फौजेची आवई ऐकून बिजेसिंगाचा पुत्र फौजेसुद्धां पळून गेला. मराठ्यांनीं अमल जागोजाग पूर्ववत् बसविला. पुढें जनकोजी शिंद्यानें अंताजी माणकेश्वरास नागोरास भेटीस बोलाविलें. दत्ताजी शिंदे व जनकोजी शिंदे यांची भेट झाली. व फागल्या अखेरीस तह करावा याबाबत मराठे सरदारांत वाटाघाट सुरू झाली. मेंढें पोगारर चालतात या नेपाळिऑच्या वननाला मराठ अपवाद नव्हते. सबंध वर्षभर चाललेल्या मोहिमेंत मुलुख वैराण झालेला, लष्करात एक रुपयास चार शेर दाणा व चार शेर वैरण, तींहि कष्टप्राप्य. एका रुपयाचें गवत एका घोड्यास पुरना. पाणी दीडशें हातावर

पचवीस लक्ष रुपये साल मजकुरी द्यावे, व पचवीस लाख राहिले ते पुढील दोन सालात द्यावे असा करार झाला. निम्मे राज्य व जालोर किल्ला रामसिंगास द्यावा, आणि निम्मे राज्य व जोधपूर, नागोर व मेडता हीं शहरें विजेसिंगाकडे राहावीं. ह्या युद्धात मराठ्यानीं अजमीर प्रांत मात्र मिळविला, परंतु बाकीच्या अटी विजेसिंगाने परिपूर्ण केल्या नाहींत.§

या युद्धात मराठ्याचे शौर्य, हिंमत, व चिकाटी हे गुण पूर्णपणें निदर्शनास आले. विजेसिंग आदिकरून मारवाडच्या राजपुताची तरवार मशहूर. फार करून राजपुतान्यातील मर्द मनुष्य समशेरीचें काम पडल्यास कोणेविषयीं चुकतील हें होणेंच नाहीं. असें असता मराठ्यानीं विजेसिंगाना व राजपूत लोकाचा पराभव करून यश संपादिलें. शिवाय जयाप्पासारखा मोहरा दगा होऊन मृत्यू पावला तरी खचून न जाता, मराठे खळी खणून शत्रूच्या मानगुटी बसले व नेटाने अधिक त्वेषानें लढून त्यानीं शत्रुस नामोहरम केलें. विद्युल्लतेच्या वेगानें होणाऱ्या मराठ्याच्या घोडदौडीपुढें शत्रुचा तोफखाना निरुपयोगी ठरला

अशा प्रकारे या युद्धानें मराठ्याच्या अंगीं असणारे राज्य जिंकण्यास उपयुक्त असे जे गुण, त्याची तावून सुलाखून पारख झाली. त्याचप्रमाणें शिंदे व होळकर याची आपसातील चुरस व वैमनस्यें आणि प्रत्येकाची महत्त्वाकांक्षा यामुळें राष्ट्राची एकी व प्रगति होण्यास अडचण उत्पन्न करणार दुर्गुण देखील पूर्णपणे निदर्शनास आले. परस्पर विश्वास हें राष्ट्रीय नीतिमत्तेचे मुख्य जीवन असतें याची जाणीव दौलतीचे आधारस्तंभ जे शिंदे, होळकर याना पटली नव्हती.

§[पे द, भा २१, ले. ८०, ८२, ८३, पे. द., भा २१ ल ५४, पे द, भा २७, ले. ११९, १२८, हिं मु. प. व्य, भा ३ ले १७५, २१८, २१९ ]

# नानासाहेब पेशवे यांचा द्वितीय विवाह

[ लेखक-श्री. यशवंत खुशाल देशपांडे, एम्. ए., एल्‌एल्. बी., यवतमाळ ]

रा. सा. गोविंदराव सरदेसाई यानीं मराठी रियासतीचे मध्यविभाग भाग २ व ३ लिहिले. त्यानंतर पेशवेकालीन इतिहासाची साधनसामुग्री उत्तरोत्तर जास्तच उपलब्ध होत आहे. पेशवे दप्तराचे अनेक प्रकाशित खंड या गोष्टीची साक्ष देत आहेत. रा. सा. सरदेसाई यानीं तत्कालीं उपलब्ध असलेल्या साधनसामुग्रीवरून जीं अनुमानें काढिलीं होतीं त्यापैकीं काहीं अनुमानें, नवीन सामुग्री व पुरावा उपलब्ध झाल्यामुळें त्याना बदलावीं लागलीं आहेत. यासबधानें मी मालव साहित्याच्या एका विशेषाकात मल्हारराव होळकरावरील एका लेखात समाधानात्मक उल्लेख केला आहे.

आजहि मराठी राज्याच्या इतिहासाची अशी स्थिति आहे कीं अनेक घराण्यातून निरनिराळ्या प्रसगावर नवीन प्रकाश पाडील असा अस्सल पत्रव्यवहार अप्रकाशित पडून आहे. अद्याप त्यास सशोधकाचा हस्तस्पर्शसुद्धा झाला नाहीं. मराठी इतिहासाच्या सशोधनक्षेत्रात कार्य करणाऱ्या ज्या थोड्या बहुत सस्था आणि व्यक्ति महाराष्ट्रात आहेत त्याचे सग्रहातहि इतिहासावर नवीन प्रकाश पाडील असा बराचसा अस्सल पत्रव्यवहार सग्रहित आहे. तथापि तो प्रकाशित न झाल्यामुळें त्याचा इतिहासलेखकास उपयोग होऊ शकत नाहीं. सातारा येथील पारसनीस म्यूझिअममध्ये नागपूरकर भोसल्याच्या राजकारणासबधीं ३००–३५० अस्सल पत्रें आहेत. पण तीं प्रकाशित होऊन त्याचा इतिहासलेखकास उपयोग होईल असा सध्या तरी योग दिसत नाहीं.

यवतमाळच्या शारदाश्रमाच्या ऐतिहासिक पत्रसग्रहाचीहि तीच स्थिति आहे. त्या सग्रहापैकीं एका महत्त्वाच्या अस्सल पत्रासबधानें आज लिहावयाचें योजिलें आहे. प्रस्तुत पत्र नानासाहेब पेशवे याच्या लष्कराचा राक्षसभुवन येथें तळ असताना देवकाते सरदार याचा वकील चिंतोराम यानें आपल्या मालकास वरील मुकामावरून लिहिलें आहे. या देवकाते सरदाराचे वशज निजाम स्टेटमध्यें सैदुरसणी म्हणून एक गाव आहे तेथें असतात. याच्याजवळ पेशवे अमदानींतील आणि इतरहि बराचसा अस्सल पत्रव्यवहार आहे. त्यापैकीं बरींचशीं पत्रें या देवकाते सरदाराच्या वशजानें हैदराबाद येथें कै. केशवराव कोरटकर, माजी न्यायाधीश, निजाम हायकोर्ट याच्या स्वाधीन केलीं होतीं. त्यापैकीं सरासरी २५ पत्रें कै. केशवरावसाहेब यानीं प्रस्तुत लेखकास शारदाश्रमाच्या सग्रहाकरिता दिलीं होतीं. त्यानच हें प्रस्तुतचें पत्र आहे. ( या चिंतोराम वकिलाच्या स्वदस्तुरचीं आणखीहि तीन चार पत्रें आपल्या मालकास

पुण्याहून लिहिलेली अर्शी आहेत व तत्कालीन राजकारणासंबधीं त्या पत्रातून उल्लेख आहे प्रस्तुत पत्राच्या वैशिष्ट्यासंबधीं लिहिण्यापूर्वी तें अस्सल पत्रच पुढें देत आहे त्यानंतर या पत्रानें आपल्या इतिहासज्ञानात काय नवीन भर पडते ती पाहू. ) ते पत्र असें आहे—

श्री

राजश्री सेटियाजी आपा बळवंत राव देवकाते गोसावी यास अखडीत लक्षमी अलकृत राजमान्ये श्रे ॥ चिंतो राम कृतानेक असिर्वाद विनती उपरी येथील क्षेम ता। मार्ग (सीर) व्रो अस्टीमी पर्येत मुक्काम राक्षेस भुवन येथे श्रीमंत राजश्री नानासाहेब याच्या ल्स्करात सनीध असो या नतर साहेबी मेहरबानगी करून सटवाजी उगल याज बरावरी पत्र पाठविले पावोन परम सतोश जाला पत्री कितेक अर्थ लिहिला तयारी करून बाहेर निघाले परतु मळसूरकराची अद्याप तयारी जाली नाही अपणाकडे जावे काये मन (स) बा आहे ते वर्तमान ल्हिून पाठवणे त्या सारखे स्वार होऊन येऊ म्हणून लिहिले तरी येथील मनसबा तरी मार्गस्वर बद्ये सप्तमीस श्रीमताचे लड्न जाले नवरी पैठणची साव कारांची देशस्ताची नवा वरसाची असेप्र धकाल देवप्रतीस्टा जाली दो प्रहरा रात्री लड्न जाले पाहटे साडे जाले नवरी घरास अणीली तमाम लेकाणी लाहाण थोर यानी श्रीमतास अहेर केला त्याम आम्हीं ही अहेर केला यक तीवट उच व सेला उच १ येक पैठणचा शालु १ चोळीउ येसी मीळोन सनगे रु॥ ७० सतरीस घेऊन आहेर केला असे ते समई श्रीमतानी पुसले जे देवकाते गाठें आहेत त्यास आम्हीं विनती केली ज गाव सोडून दो कोसावर जमावमुधा येऊन राहिले आहेत सत्वर दरशनासे यतील या प्रमाणें मनसबा जाला असे याउपरी सरल्स्करचा मजकूर तरी बापुजी नाईक अकालकोटास गेले फिरते समई वैरगास आले सरलस्करची भेटी जाली त्याज बराबरी मुमे पावेतो आले त्याम तेथून निरोप घेऊन माघारे वैरगास गेले. आठा रोजात येऊन दाखल लस्करात श्रीमताचे भेटीस येतों येसा निस्छाये कला असे तेही तयार होऊन येतील तरी तुम्ही अवघे भाऊ बद तयारी करून जमावानसी येणें म्हणजे उत्तम राजश्री नरसींग राव धायेगुडे यास ××× याम पत्र पाठविले अद्यापी आले नाहीत हे विनती"

हें पत्र मोडी लिपींत असून त्याची ही अस्सल बरहुकूम नक्कल येथे दिली आहे.

सदाशिवराव भाऊ पटदुराहून ता. १४-३-१७६० रोजीं उत्तर हिंदुस्थानकडे रवाना झाले. त्यानंतरच्या विजयादशमीनंतर नानासाहेब पेशवेहि पुण्याच्या बाहेर पडून अहमदनगरच्या नाजूक लष्करी तळ देऊन राहिले सरजामी सरदारास आपापले जमान्यासुद्धा स्वारींत हजर राहाण्याबद्दलचीं अनेक आज्ञापत्रे त्या सुमाराचीं उपलब्ध आहेत त्यावाजून सैन्याची जुळवाजुळव करण्यामध्ये दोन हेतु होते एक तर निजामावर जरब बसविण्याचा आणि दुसरा भाऊसाहेब याना उत्तर हिंदुस्थानातील स्वारींत सैन्य, युद्धसामुग्री आणि पैसा याचा पुरवठा करण्याचा तत्कालीन पत्रव्यवहारात या संबधानें अनेक उल्लेख आहेत. यानबरोबरच दुसरी एक गोष्ट पेशवे दफ्तर खंडातील लेखावरून निष्पन्न होते ती ही कीं, मराठ्यांचें लष्कर उत्तर हिंदुस्थानात लढत असताना नानासाहेब पेशवे द्वितीय विवाहासबधानें खटपट करीत होते. पेशवे दफ्तराच्या खंडात

निरनिराळ्या ठिकाणाहून मुली दाखविण्यास आणल्याचा आणि त्यानिमित्त मुलींना पोषाख, प्रवासखर्च इत्यादि दिल्याचा उल्लेख आहे

नानासाहेब पेशव्याचा जन्म ता. १२ १२ १७२१ चा आहे त्यांचें गोपिकाबाईशीं ता १० १ १७३० रोजीं लग्न झालें म्हणजे सन १७६० च्या डिसेंबरमध्यें नानासाहेबांचें ३९ वर्षांचें वय होतें. त्या वेळीं गोपिकाबाईंचें सरासरी ३५ ३६ वर्षांचें वय होतें. त्यांना पाच मुलें झालीं असून त्या वेळीं तीन मुलें हयात होतीं व वडील मुलगा विश्वासराव हा तर उत्तरेकडील स्वारीत भाऊंच्या तालमींत युद्धक्षेत्रावर होता अशा परिस्थितींत नानासाहेब पेशव्यांनीं द्वितीय विवाहाच्या फंदांत कां पडावें आणि लष्करी छावणींत असताना द्वितीय विवाह कां घडून आणावा हें कोडें अद्याप उलगडलें नाहीं व त्यासंबंधानें उपलब्ध पत्रव्यवहारात कोठेंच उल्लेख आढळत नाहीं मराठी रियासत मध्यविभाग ३ मध्यें पान २११ वर " डिसेंबर २१ रोजीं पेशव्याचा मुक्काम राक्षसभुवनवर होता २७ डिसेंबरास त्यानें पैठणास दुसरें लग्न केलें मुलगी नारो नाईक बाखरे देशस्थ सावकाराची केली. नाव राधाबाई पुढें लगेच पेशवा उत्तरेंत निघाला " एवढाच या लग्नासंबंधानें उल्लेख आहे

पुढें २३१ पानावर नानासाहेब पेशव्याच्या मृत्यूचीं कारणें दिलीं आहेत, त्यात ' प्रधानपंत क्षयाची व्यथा होऊन वारले ' ही गोष्ट नमूद करून क्षयाच्या वृद्धीची कारणपरंपरा दिली आहे त्यात " गोपिकाबाईशीं त्यांचें बिनसलें असल्याचा उल्लेख नाना फडणिसाचा आहे सन १७६० च्या डिसेंबरात दुसरी तरुण बायको त्यानें केली आणि लवकरच अस्थि चर्मावर शरीरस्थिति आली, " अशीं वाक्यें आहेत अशा प्रकारच्या वाक्यामुळें द्वितीय विवाह हाहि नानासाहेबाच्या अकालीं मृत्यूचें एक कारण असावें असा वाचकाचा समज होण्याचा संभव आहे नागपूर येथील मध्यप्रान्त संशोधन मंडळाच्या एका वार्षिक समारंभात प्रस्तुत लेखक अध्यक्ष असताना एका वक्त्यानें हें द्वितीय विवाहाचें एक कारण नानासाहेबाच्या मृत्यूच्या कारणपरंपरेंत समाविष्ट केलें होतें परंतु या द्वितीय विवाहाचा नानासाहेबाच्या निधनावर काहीं परिणाम होणें असंभवनीय आहे असें प्रस्तुत पुढें आलेल्या पत्रावरून स्पष्ट होतें

नानासाहेबाचें द्वितीय लग्न पत्राप्रमाणें मार्गशीर्ष वा सप्तमीस आणि भाग ३ मध्यें सांगितल्याप्रमाणें ता २७ १२ १७६० रोजीं झालें आणि नानासाहेबाचा मृत्यु ज्येष्ठ वा॥ ६ शक १६८३ म्हणजे २६ ६ १७६१ ला झाला म्हणजे लग्नानंतर नानासाहेब फक्त सहा महिन्यांनीं वारले प्रस्तुत पत्राप्रमाणें नवऱ्या मुलीचें वय ' नवा वरसाचें ' होते म्हणजे नानासाहेबाच्या मृत्यूच्या वेळीं या दुसऱ्या पत्नीचें वय फार तर जास्तींत जास्त १० वर्षांचें असल अशा स्थितींत या लग्नाचा नानासाहेबाच्या मृत्यूवर काहीं परिणाम झाला असेल असें संभवत नाहीं

सन १७६० मध्यें विजयादशमीस पुणें सोडल्यापासून परत जून १७६१ मध्यें पेशवा परत पुण्यास आला तोंपर्यंत प्रथम पत्नी गोपिकाबाईहि त्यांच्या बरोबर होती असें तत्कालीन लिखाणावरून दिसून येतें तथापि नानासाहेबाचें गोपिकाबाईशीं बिघडलें होतें असा नाना

फडणिसाचा उल्लेख असून उत्तरेकडून परत येताना वाटेवर श्राद्ध झालें त्या वेळीं भोजन प्रसंगीं राधाबाई वाडीत होती असा नाना फडणिसाच्या आत्मचरित्रात उल्लेख आहे. तेव्हा गोपिकाबाईशीं बेबनाव झाला होता कीं काय ? व तसें असल्यास तें द्वितीय विवाहास कारणीभूत झालें असलें पाहिजे असें अनुमान क्रमप्राप्त आहे. तथापि या वयात, पत्नी व मुलेंबाळें असताना आणि शिवाय उत्तर हिंदुस्थानात मराठ्यांचें सैन्य गेलें असता व आणखी मदत पाठविण्याबद्दल विचार सुरू असता नानासाहेबांनीं ९ वर्षांच्या ल्हान मुलीशीं लग्न का केलें हें कोडें अस्सल पुराव्याच्या अभावीं उलगडता येणें अशक्य आहे. नानासाहेबांच्या मृत्यूच्या वेळीं राधाबाईनें वय सरासरी १० वर्षांचें होतें व त्याच्या पाठीमागें ९॥ वर्षें वैधव्य दशेंत काढून शेवटीं ता. १९ ११ १७७० रोजीं राधाबाईचा अंत झाला. गोपिकाबाई मात्र नानासाहेबांच्या मागें २७ वर्षें जिवंत होती. तिनें आपलें उत्तर आयुष्य नाशिक पंचवटी येथे घालविलें

नानासाहेबांच्या द्वितीय विवाहानें समर्थन करणे ही गोष्ट त्याच्या चरित्रकारास फार अवघड आहे. या द्वितीय विवाहापासून खुद्द नानासाहेबास काहीं कौटुंबिक सुख लाभलें असत असें प्रस्तुत पत्रात दिलेल्या मुलीच्या वयावरून समजनीय दिसत नाहीं, उलट एका कोवळ्या वयाच्या मुलीच्या आयुष्याचें मातेरें करण्यास हा विवाह कारणीभूत झाला ही गोष्ट नाना साहेबांच्या चारित्र्यात अपवादास कारण झाली हें निश्चित आहे

# शिवभारतकार ( अनुपुराणकर्ता ) कवीन्द्र परमानन्द आणि त्याचे वंशज

लेखक—श्री. कृ. ना. देशपांडे, बी. ए., एल्एल्. बी., कोल्हापूर

हिन्दुपदपादशाहीसंस्थापक छत्रपति शिवाजी महाराज यांचें महोदात्त, तेजस्वी व स्फूर्तिदायक चरित्र तत्कालीन प्रत्यक्ष पुराव्यावरून समजून घेण्याची इच्छा महाराष्ट्रीयास व इतिहासज्ञास किती आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. शिवाजी महाराजाच्या वेळीं त्यांचीं जीं चरित्रें छापलीं गेलीं त्यामध्यें कवीन्द्र **परमानन्द** यांचे **शिवभारत** अर्थात् अनुपुराण हें श्रेष्ठ मानलें जातें. कारण तें एका संस्कृत पंडितानें शिवाजी महाराजाच्या आज्ञेवरून आणि सर्व इतिवृत्त त्याला प्रत्यक्ष विचारून लिहिलें आहे ( शिवभारत १–२५ ). इतिहाससाधनांत अप्रत्यक्ष किंवा त्या व्यक्तीच्या देहावसानानंतर लिहिलेल्या प्रत्यक्ष अथवा ऐकीव माहितीवर आधारलेल्या कोणत्याहि चरित्रापेक्षा वा बखरीपेक्षा समक्ष भेटून समकालीनानें जेव्हांच्या तेव्हां लिहिलेल्या लेखनास अधिक महत्त्व असतें. हें अनुपुराण कवीन्द्रानें शताध्यायगर्भित लिहिलें होतें, पण त्यापैकीं अवघे बत्तीस अध्यायच उपलब्ध होते. शिवभारतकार वा अनुपुराणकर्ता कवीन्द्र परमानन्द, त्याचे वंशज आणि त्याचें काव्य इत्यादिकांविषयीं, पूर्वीच संशोधित झालेले व मला जे नवीन कागदपत्र मिळाले त्यावरून माहिती द्यावयाची आहे.

कवीन्द्र परमानन्द हा शिवाजी महाराजाचा समकालीन होता आणि तो महाराष्ट्रांत होता असा पुरावा उपलब्ध आहे. स. १६६४ (= वैशाख शके १५८६ ) मध्यें धर्मनिर्णयार्थ राजापूर येथें एक मोठी विद्वत्सभा भरली होती. त्या सभेंतील उपस्थित पंडितांची ¶ नामावली प्रसिद्ध झाली आहे. त्यांत कवीन्द्र परमानन्दाचा उल्लेख आहे. त्याचप्रमाणें शिवभारतांत प्रत्यक्ष कवीन्द्र परमानन्दानें

> " स ( शिवाजी ) एकदात्मनिष्ठं मां प्रसाद्येदमभाषत। १-२५
> यानि यानि चरित्राणि विहितानि मया भुवि।
> विधीयन्ते च सुमते तानि सर्वाणि वर्णय ॥ १-२६ शिवभारत

असें लिहिलें आहे यावरून स्पष्ट आहे. महाभारतासारख्या रचनेनें ग्रंथ निर्माण करणारा कवीन्द्र परमानन्द हा कांहीं सामान्य पंडित नव्हता शिवाजी महाराज जसे मोठे तसा त्याचा चरित्र

¶ शके १८३५ भा. इ. सं. मं. इतिवृत्तांतील " शिवकालीन शास्त्रीपद्धति "

कारहि मोठा. शिवभारतात जे उल्लेख सापडतात त्यावरून त्याची जाडी विद्वत्ता आणि संस्कृत भाषेवरील प्रभुत्व दिसून येतें. त्यावरून त्याचें आत्मचरित्र थोडेंसें कळू शकतें अध्याय समाप्तीच्या वेळीं 'निधिवासकर' किंवा 'निवासकर' असे उल्लेख आलेले असल्यामुळें त्याचें आडनाव निधिवासकर = निवासकर = नेवासकर आहे हें उघड आहे. म्हणजे तो नगर जिल्ह्यातील नेवासें येथील रहिवासी असावा. परमानन्दाच्या वडिलाचें नाव 'गोविन्दभट्ट' होतें असें "**पौराणिकानां प्रवरं भट्टगोविन्दनन्दनम्** । १-६" यावरून कळून येतें. परमानन्द 'गोत्र काश्यप शाखा तैत्तीरीय, सूत्र आपस्तंभ' ब्राह्मण होता. (पेशवे दप्तर, भाग ३१, पत्र क्रमांक ११७, ११८, १२२.) आद्य शंकराचार्य देखील याच शाखेचे ब्राह्मण होते. परमानन्द कवि प्रथारंभीं गोविन्दास (विष्णूस) नमन करतो.

वन्दारुविबुधोदारमौलिमन्दारदामभिः ।
स्विद्यत्पदारविन्दाय गोविन्दाय **नमो नमः** ॥ १ १

हीच प्रथा परमानन्दाच्या पुत्रानीं अनुसरलेली पुढें दिसून येते.

'**एकवीराप्रसादेन लब्धवाक्सिद्धिवैभवम्**' १ ६, त्याचप्रमाणें १-२२, १-३१ इत्यादि श्लोकातील उल्लेखावरून कवीन्द्रास एकवीरा देवीकडून वाणी प्राप्त झाली होती आणि हीच त्या घराण्याची कुलदेवता असावी. तो श्रेष्ठ ब्राह्मण (ब्राह्मणसत्तम, १-२), धर्म जाणणारा (धर्मवित् १-४), मुखातून ब्रह्मवाणी स्फुरणारा, सर्व शास्त्राचा ज्ञाता, अध्यात्म ज्ञानाचा ज्ञाता, पौराणिकामध्यें श्रेष्ठ (१ ५, १ ६), त्याचप्रमाणें उत्कृष्ट काव्यकर्ता जणु काय बृहस्पतीचा अवतार (कर्तार चारुकाव्यानामवतार बृहस्पतेः १-१०), धर्मात्मा कवीमध्यें श्रेष्ठ, वक्त्यामध्यें पहिल्या प्रतीचा (प्रोक्त प्रोवाच धर्मात्मा कवीन्द्रो वदता वर । १-२०), असा होता. याव्यतिरिक्त ब्रह्मन् (१-१६), शासितव्रत (१-१९), स्तुत्याचरणी महाभाग, कवीन्द्र, (८४५, ९११, २३-६), सुमति (१२६, २५ ३१), महामति (२८-१), परमानन्द (८१, १०-४, २५-३१, २७-३), "कवीन्द्र तुझाले ह्यसि" (२८ ११), 'शिववीरयश क्षीरनिधिप्लावितचेतसा, परमानन्द' (२७ ३) अशा प्रकारचीं संबोधनें शिवभारतात ठिकठिकाणीं काशीरथ पंडित आणि शिवाजी महाराज यानीं परमानन्दास लावलेलीं आढळून येतात परमानन्दानें "चरित शिवराजस्य भरतस्येव भारतम् । (१-२२)" असें शिवभारत रचिलें खरें, पण स्वत त्यानें या चरित्रास 'शिवभारत' असें नाव मुळींच दिलें नसून 'अनुपुराण' असें नाव दिल्याचें प्रत्येक अध्याय समाप्तीवरून दिसून येतें. म्हणून मी अनुपुराणकर्ता परमानन्द कवीन्द्र असें म्हटलें आहे.

'शिवभारत' असें नाव तामीळ भाषातरावरून 'शिवभारता'चे संपादक कै. स. म दिवेकर यानीं दिलेलें आहे. 'शिवभारत अथवा अनुपुराण' हें शिवाजी महाराजाचें चरित्र शिवाजी महाराज राजगडाहून राज्यकारभार करीत असता राज्याभिषेकापूर्वी कवीन्द्रानें लिहावयास सुरवात केली असें 'राज राजगिरीश्वर' या उल्लेखावरून दिसून येतें. स्वचरित्र लिहिलें जावें अशी कल्पना राज्याभिषेकाच्या कल्पनेंत शिवाजी महाराजाना सुचली असली पाहिजे.

म्हणजे इ स १६७२ त १६७४ च्या मध्यतरीं लेखनास सुरवात झाली आणि ह्या ग्रंथाचे राज्याभिषेकापर्यंत ३२ अध्याय लिहिले गेले असावेत § लेखन तसेंच चालू ठेवून महाराजाच्या निधनानतर अनुपुराण हा शताध्यायी ग्रंथ पूर्ण झाला असावा असा माझा कयास आहे आन या अनुपुराणाच्या दोन प्रती उपलब्ध आहेत त्यात 'राजोपाध्येप्रत' आनंदाश्रमानें प्रसिद्ध केलेली अधिक ग्राह्य वाटते. प्रस्तुत अनुपुराणाचा चार अध्यायात्मक नवा भाग मला कोल्हापुरचे राजाध्ये याच घरीं उपलब्ध झाला तो सभाजीसबधीं आहे आणि तो अनुपुराणाचा शेवटचा भाग असावा यावरून परमानन्द कवीद्र स १६६४ च्या राजापूर येथील पडित सभेंत उपस्थित होता त्या वेळीं त्याचें वय ३० ३५ धरल्यास सभाजी महाराजाच्या वेळपर्यंत ता जिवत मानल्यास ता कमींत कमी ५० ६० वर्षे जगला असावा असें मानता येईल

अनुपुराणकर्ता परमानन्द यास श्रीधर आणि देवदत्त असे दोघे पुत्र असून तेहि आपल्या पित्याप्रमाणें विद्वान, सुमकृत आणि जाड पडित हाते या दोघापैकीं धाकटा देवदत्त याने सस्कृत ग्रथ, मराठी काव्यें आणि हिंदी कवनें केलीं आहेत त्यावरून त्याचें तिन्ही भाषावरील प्रभुत्व दिसून येतें त्यापैकीं काहीं अपेरीस दिलीं आहेत हा सर्व भाग कोल्हापुरचे राजाध्ये याच्या ग्रथालयात उपलब्ध झाला

पेशवे दप्तराच्या ३० व्या भागामध्यें स २८ १२ १७०८–१७१२ च्या क्रमाक ३०७ मधील पत्रात 'सातार'चे शाहू महाराजानीं ज्या पडिताचा सत्कार केला त्याच्या नामावलीमध्यें कवीद्र श्रीधर आणि देवदत्त याचा उल्लेख आहे तसेंच पेशवे दप्तरच्या ३१ व्या भागामध्यें क्रमाक ११७ चें ता २२४१७१६ चें सनदापत्र कोल्हापुरचा छत्रपति सभाजी यानें श्रीधर कवीन्द्रास दिलें आहे त्यामध्यें सस्थान कोल्हापूर, जहागिर विशाळगडपैकीं "एकोली" हा गाव धारादत्त इनाम करून दिला आहे त्याचप्रमाणें क्रमाक ११८ चे ता १९५१७१८चे पत्रात देवदत्त कवीद्रास वरील जहागिरीपैकीं पेदूर हा गाव कोल्हापुरच्या सभाजीची आई राजसबाई हिनें धारादत्त करून दिला आहे "वेदशास्त्रसपन्न श्रीधर आणि देवदत्त कवीन्द्र हे दोघेहि परपरागत स्वामीचे राज्यातील आश्रित, विद्वान्, भले शिष्ट जाणोन पुत्रपौत्रादि वौशपरपरेनें अनुभवून स्नानसध्यादिक सत्कर्म आचरोन स्वामीच्या राज्यास कल्याण चिंतून सुखरूप राहणें असा समक्ष निदेश" दिला होता आणखी याच ३१ व्या भागातील क्रमाक १२२ ता १६९१७२० च्या पत्रामध्यें सभाजीनें

"तुम्हास श्रीमत मातुश्री (राजसबाई) आईसाहेबी विलब नाम सवत्सरी वैशाख मासवती अमवास्या पर्वकालीं मौजे पेदूर ता मिरजे हा गाव धारादत्त दिल्हा आहे ऐसियासी तुम्ही बहुत भले शिष्ट, विद्यासपन्न, तुमचे चालविल्यानें बहुत श्रेयस्कर जाणून तुम्हास मौजे पेदूर (पेदूर) ता मिरजे प्रा मजकूर हा गाव कुलबाब कुलकानू हालीपटी व पस्तरपटी जलतरुपाषाण निधिनिक्षेपसहित खेरीज हकदार व इनामदार करून मौजे मजकूर पूर्वमर्यादेप्रमाणें

§ १२६ शिवभारत

चतु सीमा करून आपले स्वाधीन करून घेणें आणि इनाम तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंश परंपरेनें अनुभऊन सुखरूप राहणें." §

असा ' निदेश समक्ष ' दिला आहे. राजपत्र पुन्हा देण्याचें एक कारण असें दिसतें कीं, पूर्वी दिलेलें इनाम या राजपत्रानें कायम केलें आणि दुसरें असें कीं, कदाचित् राजसबाईनें दिलेला गाव देवदत्त कवीच्या प्रत्यक्ष ताब्यात न येता कागदावरच इनाम शिल्लक राहिलें असेल म्हणून पुन दोन वर्षांनीं शंभु छत्रपतींनीं देवदत्तास हें पेंदूर गाव इनाम देऊन स्वाधीन करून घेण्यास सांगितलें आहे. कवीन्द्र श्रीधर व देवदत्त यास दान दिलेले एकोली आणि पेंदूर अथवा पेंदूर हे दोन्ही गाव हल्लीं ठेकोली आणि पेरीड या नावानीं ओळखले जात असून त्या ठिकाणीं कवीन्द्र परमानन्दाचे कोणीहि वंशज नाहींत असें शोधाअंतीं कळून आलें आहे. ही दोन्ही गावें विशाळगड जहागिरींत असल्यानें विशाळगड जहागिरीचे पंतप्रतिनिधि यांचीहि कृपा संपादून देवदत्त कवि राहात असे, असें तत्कालीन गंगाधर पंतप्रतिनिधि यांच्यावर कवीनें मराठी काव्य केलें त्यावरून दिसून येत आहे

' गाजी गंगाधरा तूं मिरविसि बहुसा मित्र नाना कवींचा । '<br>
किंवा ' होसी गंगाधरा तूं अतिचतुर भला श्रीकवीन्द्रासि थारा ॥'<br>
अथवा ' आधी भेटीस यावें मग परनगरालागि देशावराला ।<br>
जावें ऐसें विशालाचल सगुणपति जाण घाटे मनाला ॥ ३ ॥<br>
जो कीं भार्गवरामतुल्य विजयी श्रीपर्शुराम§ स्वयें ।<br>
आजा बापहि कृष्ण कृष्णगुणसा वारी कवींचीं भयें ॥<br>
आतां तत्पद राज्यभार अवघा स्वाधीन तूझा असे ।<br>
यावें भेटिस हें लिहा कविसती इच्छा मनीं उल्हसे ॥ ४ ॥<br>
पित्यानें कवीलागि जे अग्रहार* । भले पुत्र ते चालवीती विहारें ॥<br>
करूं शंभु कल्याण नाना रितीनें । स्मरावें कवीलागीं चित्तीं दयेनें ॥५।

त्याचप्रमाणें—

जो भक्तास वरप्रदान करितो जो शुभ्रसा उल्हसे ।<br>
गौरीवल्लभ तो तुम्हासि बहुसा लोकें तपालीतसे ॥<br>
वाढे हे अति धर्मबुद्धि म्हणुनी तुझी कवी वानितो ।<br>
श्रीगंगाधर जी म × × × × × ण आभावितो ॥

---

§ सनदापत्रें

§ परशुरामपंत प्रतिनिधि

* अग्रहार=भूमिदान

या मराठी कवितेमध्यें पन प्रतिनिधींनी कवीद्राम अग्रहार=भूमिदान दिलें असलें पाहिजे म्हणून शंभु छत्रपतिसहित गंगाधर पतप्रतिनिधी आणि त्याचे आज्ञापत्र यांनीहि स्तुति कवीनें केली आहे.

देवदत्त कवीनें संस्कृतमध्यें ' गोमूत्रिका, ' ' पद्म ', 'नाग ' आणि ' शृंखला ' इत्यादि बंध रचले आहेत, आणि त्यावर अर्थस्पष्टीकरणार्थ संस्कृत टीकाहि लिहिल्या आहेत " श्री गोविंदो जयति । श्रीमत्कवीन्द्र परमानन्दतनय कविकुलतिलक परमकारुणिक स्वविरचित गोमूत्रिकाबंधप्रतिपादकपद्यचयं व्युत्पादयति " हा टीकेचा आरंभ

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वा | भु | नं | र | का | नि | सि | म |
| ला | जा | ग | ग | त | द्रा | स | त |
| वा | म्बु | स | भ | व | भ | णि | त |

वालाभुजानगरगेकांतनिद्रासिसमतम् ।
वालाम्बुजासगभगेवतभद्राणिसतत ॥

या गोमूत्रिकाबंधावरील आहे या न अशा संस्कृत बंधावरून कवीच्या बुद्धीची कसरत चांगलीच दिसून येते आणखी असें की, देवदत्त कवीचें संस्कृत भाषेवर उत्तम प्रभुत्व असून त्यानें स्वत स " कविकुलतिलक " ही पदवी लावून घेतल्यानें त्यास स्वत च्या काव्यशक्ती संबंधीं चांगलाच आत्मविश्वास असल्याचें स्पष्ट होतें या संस्कृत लेखनाव्यतिरिक्त देवदत्तानें करवीर राज्यसंस्थापक महाराणी ताराबाई हिजवर मराठी आणि हिंदी भाषेंत कवन केलें आहे त्यावरून त्याची कवित्वशक्ति, हिंदवी स्वराज्य, शिवाजी महाराज, राजाराम, ताराबाई याचे विषयीं आदर, स्वधर्म,—स्वाभिमान इत्यादि उत्तम रीतीनें दृष्टात्पत्तीस येतात या मराठी कवनाचा आरंभ असा —श्रीगोविंदोजयति ।

तुळजा प्रसन्न झाला, पातशाही हातीं आली, जयलक्ष्मी चाली शिवाजीस आदरें ।
उभारिता भुजदंड रुमशा (म) दला दंडत, पतीप्रताप चंड धाके दिल्ली भारें ।
जगीं शिवराज्य नादेश सिंधु यशें कोंदे, द्विजकुलही विनोदे, होती पावें सुस्वरें ॥
(दि)ल्ली झाली दीनवाणी, दिलाशाचें गेलें पाणी, ताराबाई रामराणी भद्रकाली कोपली॥
आणा तुम्ही आजी साची आज्ञा (झा)ली शकार्चा सर्व सेना दिल्लीशाची अतकास चोपली॥
(ता)राबाईच्या बखतें, दिल्लीपतीची तख्तें सचों लागलीं तेंवि मतें कुराण खडिलीं ॥
वजीरास झोडिलें तें, मुगलांस तोडिलें (ते) मशिदीस फोडिजे (ते) म्लेच्छकुलें दडिलीं ॥
किटे हिंदुची शिराणी सु द्विजाची जयवंत रामराणी पहा महीमंडलीं ॥
मानहा(नी)दिल्लींदाची सभा हासतें इंद्राची आजि काळ कवीन्द्राची सर्वचिंता हा(र)ली ॥
बसे रत्नसिंहासनीं भोंसल्याचा शिरोमणी शिवराज चिंतामणी दिनमणि उदयें ॥

इत्यादींवरून रामराणी ताराबाई हिचा अद्वितीय पराक्रम दिसून येतो स १७०० त राजारामाच्या मृत्यूपासून तों औरंगजेबाच्या मृत्यूनंतर साताऱ्याचे शाहू महाराज सुटून येईपर्यंत ( स १७०८)

ताराबाईनें मोगलांशीं लढाई करून त्यांचा पराभव केला, हिंदुपदपातशाही हातीं घेतली, औरंगजेबाच्या कृत्याचा सूड उगविला आणि पुन शिवाजीस सिंहासनावर बसवून राज्यकारभार केला, हा उज्ज्वल इतिहास देवदत्त कवीनें स्फूर्तिदायक आणि अभिमानास्पद असा या काव्यात लिहून ठेवला आहे. त्याचप्रमाणें अमदानगर ( अहमदनगर ) सरदीं असल्याचा उल्लेखहि आला आहे दुर्दैवाची गोष्ट एवढीच कीं, हें कवन त्रुटित असें उपलब्ध झालें आहे याच धर्तीचें हिंदी कवन स्वातंत्र्यवीरांगना राणी ताराबाई हिच्यासंबंधीं आहे. कवीन्द्र परमानन्दानें छत्रपति शिवाजी, संभाजी यांचें वर्णन अनुपुराणात केलें, त्याचप्रमाणें बापास शोभणारा असा पुत्र देवदत्त यानें राजाराम, ताराबाई, शिवाजी इत्यादींचा पराक्रम वर्णन केला आहे या देवदत्त कवीचें आणखी काव्य उपलब्ध होईल तर राजाराम, ताराबाई याचा विस्तृत पराक्रम समजून येऊन इतिहासास महत्त्वाचें साह्य होईल.

या कवीन्द्र परमानन्दतनय कविकुलतिलक देवदत्तास एक सुपुत्र होता हें

श्रीदेवदत्तसुत अद्भुत वैभवाचा।<br>
जो भक्तराज अभयंकर शंकराचा॥<br>
हा ग्रंथ दिव्य रसपूर्ण निजाक्षरानें।<br>
वेगें असेल लिहिला अति कौतुकानें॥

या श्लोकावरून सिद्ध होतें. हा श्लोक 'कुवलयानंद' ग्रंथाच्या शेवटच्या पानावर लिहिलेला आढळून आला. कुवलयानंदाचा ग्रंथकार दुसरा असून लिहिणारा देवदत्तसुत होता असें सिद्ध होतें

याच श्लोकाच्या शेवटीं " हें पुस्तक जो दुसऱ्यास देईल त्यास एकवीरेचा शपथ असे लिहिलें आहे आणि कवींद्र परमानन्दास एकवीरा देवीकडून " वाक्सिद्धिवैभव " प्राप्त झालें होतें, त्यावरून हा देवदत्तसुत म्हणजे अनुपुराणकर्ता ( शिवभारतकार ) परमानन्द कवीन्द्र यांच्या देवदत्तनामक मुलाचाच मुलगा होय यांत संशय राहात नाहीं. आणि यानेंच सातारचे शाहूमहाराज ( १७०८ ते १७४९ ) यांची राणी सखवारबाई हिला दिलेल्या आशीर्वादात्मक संस्कृत श्लोकातील " अखंडितवज्रकंकणपरिमंडितकरकमलासु कमलावरासु सखवारबायिपु गोविन्द्रकवीन्द्रकृता लसत्वाशिष ज्येष्ठशुक्लदशम्य विशामस्म दीय तत्रत्यभाशास्महे विशेषस्तु " या भागावरून देवदत्तसुतानें नांव गोविन्द कवीन्द्र असें होतें हें कळून येतें त्याचप्रमाणें याच पुढें मराठी श्लोकामध्यें

" ( तैं ) सी तू शाहूकांता गिरिव। येहूनि अधिक दाता नेणे।<br>
अहंता कवित्व तिलभरी नासी अनंता॥ कविन्द्रा ता अनुपम मतीमाजि॥

इत्यादि उल्लेखावरून 'शाहूकांता' सखवारबाई आणि कवीन्द्र (गोविन्द) यांच्याविषयीं निश्चिति उत्पन्न केली आहे आणखी असें कीं, " कवीन्द्र " ही पदवी किंवा उपनांव म्हणून त्याचा उपयोग परमानन्द, श्रीधर, देवदत्त आणि गोविन्द यांच्यासंबंधीं केलेला दिसून येतो

परमानन्दानें अनुपुराण लिहिल्यामुळें त्यास " कवीन्द्र " पदवी प्राप्त झाली आणि त्याचें पुत्र-पौत्रादि लागू झाली. पण परमानन्दाच्या बापास " भट्ट गोविन्दनन्दनम् " ( १-६ ) लाविलेली नाहीं हें कालदृष्ट्या सरळच आहे. तेव्हा शाहुकाला सवावारवाईस ज्येष्ठ शुद्ध दशमी दिवशीं आशीर्वाद देणारा अद्भुत वभवाचा, ' अभयंकर शंकराचा भक्तराज ' देवदत्तसुत गोविन्द कवीन्द्र होय. हा गोविंद कवी चांगला संस्कृत व मराठी काव्य करणारा विद्वान् पंडित होता हें स्पष्ट होतें. या एकंदर लेखावरून वंशावळ खालीलप्रमाणें तयार होईल—




सारांश, गोविन्दभट्टाचा पुत्र, अनुपुराणकर्ता ( शिवभारतकार ) परमानन्द कवीन्द्र निवासकर हा काश्यप गोत्री, आपस्तंभ सूत्री, तैतिरीय शाखीय ब्राह्मण होता. श्रीधर आणि देवदत्त या त्याच्या पुत्रांना कोल्हापूर संस्थानातील पंतप्रतिनिधींच्या विशाळगड जहागिरींत एकोली आणि पेदूर हे दोन गाव धारादत्त इनाम होते. देवदत्त यानें संस्कृत, मराठी आणि हिंदी भाषांमध्यें काव्य केलें आहे, देवदत्ताचा पुत्र गोविन्द हाहि आपल्या पूर्वजांप्रमाणे विद्वान् संस्कृतज्ञ कवि होता. मात्र हा गोविन्द कवि विशाळगड जहागिर सोडून सातारच्या शाहू महाराजांकडे आलेला दिसतो. कदाचित् वडिलार्जित धारादत्त गाव त्यास मिळालें नसण्याचा संभव आहे.

परमानन्द हा शिवाजी आणि संभाजी यांच्या काळीं होता. श्रीधर आणि देवदत्त हे राजाराम, ताराबाई व दुसरा शिवाजी यांच्या वेळीं १७२० च्या नंतर होते असें सनदापत्रावरून कळतें. शाहू महाराजांच्या उत्तर कारकीर्दींत गोविन्द कवि होता. यांची कुलदेवता एकवीरा असून प्रथारंभीं प्रत्येक कवि ' गोविन्दा'स नमन करतो. वंशपरंपरागत ' कवीन्द्र ' ही पदवी उपनावासारखी उपयोग केलेली आढळून येते. सर्वांना संस्कृत व मराठी भाषा अवगत असून सर्व विद्वान् पंडित होते. देवदत्त याच्या हिन्दी कवनावरून त्यास हिन्दी भाषाहि उत्तम येत होती. यांचें कारण असें एक संभाव्य वाटतें तें असें कीं, परमानन्दानें शिवभारत वा अनुपुराण हा महाभारतासारखा शताध्यायी ग्रंथ काशीस्थ पंडितास निवेदन केला, हा भाग खरा असल्यास परमानन्द काहीं काळ काशींत राहिला असेल. त्यामुळें त्यास व त्याचे पुत्रानाहि—देवदत्तासहि हिंदी भाषा अवगत झाली असावी. या सर्वांचा उदय शिवाजीच्या हिंदवी राज्यांत झाला असून ते सर्व मराठी राज्याचे आश्रित आणि अभिमानी तसेच आदरणीय संस्कृत पंडित् होते.

## मराठी काव्य

१ श्रीगोविंदो जयति ॥

तुलजा प्रसन्न झाली पातशाही हातीं आली, जयलक्ष्मी ××× चाली, शिवाजीस ओदरें ॥
रामराणी खुशहाल दत्तकवि ही निहा.........पला हे कलिकाल कीर्तिचंद्रिका भरें ॥
उभारितां भुजदंड रूमशा (म) दता दंडत पत्तीप्रताप चंड, धाके दिल्ली आगरें ॥
जगीं शिवराज्य नांदे, क्ष...सिंधु यशें कोंदे द्विजकुलही विनोदे, होती वाघें सुस्वरें ॥१॥

रामराणी...बखताची वेल आली तखताची, जयलक्ष्मी पहा साची, करी मंगलारती ॥
दत्तकवि वर्णी सज अंगणी, झुलती गज दरबारीं ज...धजत फटी उभारती ॥
कांहीं मांदतां निदान अंबा देते वरदान...ले सदा इमेदान संकटें निवारती ॥
शिवराज महीपती झाला जगीं...पती रणरंगीं दिल्लीपति पातशाह हारती ॥२॥

दुंदुभींच्या भभका (रे)...चकित होय लंकेश भीति सकल नरेश सर्व मही चोपली ॥
झल व...खड्गकाला चहूंकडे मुंडमाला, महादेव घाली गळां, धूलि रक्तें लोपली ॥
(दि)ल्ली झाली दीनवाणी, दिल्लीशाचें गेलें पाणी, ताराबाई रामराणी...
भद्रकाली कोपली ॥
जाणा तुम्हीं आजि साची आज्ञा (झा)ली शंकराची सर्व सेना दिल्लीशाची
अंतकास चोपली ॥३॥

(ता)राबाईच्या वखतें दिल्लीपतीचीं तखतें खचों लागलीं तें विमतें कुराणें खंडिलीं ॥
वजीरांस झोडिजेतें मुगलांस तोडिजे (ते) मशिदींस फोडिजे (ते) म्लेंछ कुळें दंडिलीं ॥
उमराव दस्त झाले, देवद्विजां वकसिलें, दिगं (तीं) कीर्ति चाले यशें जगें मंडिलीं ॥
फिटे हिंदुची सिराणी सु ..द्विजांची ..जयवंत रामराणी पहा मही मंडलीं ॥ ४ ॥

दुंदुभी होती मी ..भावला बिभीषण आरंभिली प्रतिक्षण पुष्पवृष्टि अमरी...॥
ही उमराव घुमतात घेतां घाय हर्षे नाचतां न धाय नारदतो अ . ॥
...गडांनां स वजीरांची विमानें तों पहा साचीं चिंतावली मुगलांची...॥
...नगरी सुरें नाचे हर दिल्लीशानरी कहर, होतां राम (राणी) ची नजर जहराची लहरी ॥५

रामराणी कोपतांच दिल्लीशा...डिका, भूतनाथ करी नाच संगरीं चहुंकडे ॥
मुगुलांचा क्षय ..उ रुधिराचे होति सडे धडावरि धड पडे भूतमंडलीं जुडे ॥
भैरवां . चा समुदाय सराज्याची कीर्ति...वेतालही सुखें धाव वाजवीत चौघडे ॥
...हांसवसे भद्रकाली योगिनी नो देती टाळी, निरंतर युद्धकालीं, दत्त क (वि)
कौतुकीं घुडे ॥ ७ ॥

कीर्तिवल्ली सरज्याची जगतींत दाटे साची, ज्याला भुज (ग) प्रतापाची दिगंतरीं भरली ।
धाकनी दिगंत करी गजंतात परोपर ..सागरानेंही लहरी आवरून धरली ॥
अमीधिग रामराणी नां...मे वैभवानी, मूर्तिमंत हे भवानी, जगीं अवतरली ॥
मानहा (नी) दिल्लींद्राची सभा हांमते इंद्राची आजिकाल कवीन्द्राची सर्व चिंता हा(र)ली ॥ ८ ॥

निरंतर चालि केली पातशाही तला नेली, दिल्लीची हाल...गेली म्लेच्छ गर्व गलाला ॥
आतां तन्ही तुम्ही जागा निजहित मनीं आणा...मनोभावें करा आणा, न लगतां पलाला ॥
सांडून दुरभिमान मनीं धरा सामदान, दाजा आपला इमान मोडून द्या कुचाला ॥
रामराणी भद्रकाली, रणरंगीं क्रुद्ध झाली प्रलयाची वेल आली ..मुगल हो सांभाला॥९॥
वसे रत्नसिंहासनीं भोसल्याचा शिरोमणि शिवराज चिंतामणि दिनमणि उदयें ॥
फांकावले भुजधाम, भांभाउले रूमशाम ..संत हा ..फणकर म...सरज्याच्या विजयें ॥
करीं चढे पातशाही फिरे भुवनी दु ..जेर झाल्या दिशा दाही दत्त वर्णिती स्वयें ॥
झाली बली गडप...काल्ला लंकापति बुडे भारी, दिल्लीपति चिंतासागरीं भयें ॥ १० ॥
गोकुंडी गोलकुंडे तें परंडे निरंतर रेवदडे दु खानलीं पचते ॥
...अविचल देवगिररि होत आहे खालिवरि, अमदानगर तरि संकटांत गचतें ॥
संनद्धन तें निज ओज धाक वाहतें शिरींज रोजांतरि रोज रोज महाभय रचतें ॥
भोंसल्याची होतां चालि, अभिनव आजिकालि दत्त म्हणे दिलीशाचें तगतहि खचलें ॥२१
युद्धसन्नद्ध हा भोंसला रुद्रसा क्रुद्ध होतां विरुद्ध मग अविद्धशरविद्ध पावे...ति घेरी ॥
अरल फौज पेली वजीरांस ठेली कुवल मात केली अतुल कीर्तिकल्प ..सर्वत्र फेरी ॥
रयजूल धीर युद्धीं महावीर तें कापतती सकल मीर मधुर धीर गंभीर वाजेति भेरी ॥
प्रबल वाढती बस्त शिवराजमृगराज मृगराजसमसत्तज...रदत्तनें दिलीचें तक्त घेरी ॥२२

२ श्रीगोविंद

कांता तानां विविधवचन वक्र बीचिभिष्यमाणाः। केचित्स्युर्वयमादर वयमादर गिरिजा पादाम्बुसेवनध्यांना ..इ. धियः सदा निज नमः रतपि प्रयाताः सखे ॥
गोविंद कवीन्द्र—

३ श्रीगोविंद

स्वस्ति श्रीमदगणित गुणमणि ग...
णश्रोणि विराज विराजमानासु समाना—
सु समस्त दिगंगनांगा वरणासु
सुकृत कीर्ति वसनासु स्वाश्रीत
...सरक्षण विचक्षणा सुक्षण
क्षण क्षपिताहित मंडलासु

सुलक्षण लक्षितासु स्वीय सौभाग्य—
...परंपराधरीकृत पुलो—
मजा खर्व गर्वासु कनकवितरणा
...नंदितार्थि पटलासु सकल—
जन जननीषु अखंडित वज्रकंकण—
परिमंडित करकमलासु कमलावरासु
सखवारवायिषु गोर्वीदकवीन्द्रकृताः
रूसंस्वाशिषः ज्येष्ठशुक्लदशम्य
विशमस्मदीय स्तस्य भाषासहे विशेषस्तु ।

४ श्रीगोविंद

इंद्राणीहूनि सत्ता गणित गणितां, वानिति विप्रदाता
गांवोगांवीं अनंता, करि रिपुवधू सर्वदा, घोर चिंता ॥
(तै)सी दं शाहूकांता गिरिव × × × येहूनि अधिक दाता
नेणे...अहंता, कविस तिलभरी . मासी निवंता ॥ १ ॥
कवींद्रा...ता अनुपम मतीमाजि ज . कवि
. *कवित्वाची वार्ता म्हणविन...च बुडली ॥*
अस्या सा...यकु अभिनव असे . ॥

# रियासतकार सरदेसाई

लेखक—श्री. रा. टिकेकर

" **इतिहास** हा तुम्ही आपला मुलगा मानलेला आहे व तो अमर आहे. " असें श्री. **न. चि. केळकर** यानीं रियासतकार **गोविंद सखाराम सरदेसाई** यास लिहिलें होतें, तें अगदीं खरें. इतिहासाचें पुत्रवत् लालनपोषण करणारे दुसरे विद्वान् गृहस्थ माझ्या तरी पाहण्यात नाहींत. म्हणून रियासतकाराच्या कार्याची थोडक्यात ओळख करून देण्याचें योजिलें आहे. त्याच्या कार्याविषयीं लिहिण्यापूर्वी त्याचें चरित्र, कुलवृत्त, वगैरे आवश्यक माहिती देणें इष्ट होईल असें वाटतें.

सरदेसाई उर्फ मावळनकर हें महाराष्ट्रीय ब्राह्मण घराणें रत्नागिरी जिल्ह्यातील मावळंगें गावच्या जवळपास रहाणारें. सरदेसाई हा हुद्दा आहे. नरसिंह हें त्याचें कुलदैवत. श्रीछत्रपति, पेशवे, बावडेकर पंत अमात्य अशा ऐतिहासिक राजघराण्याचे पदरीं सरदेसायानीं कामगिरी बजविली असल्याचे दाखले आहेत. छत्रपति संभाजीस मोगलानीं पकडलें त्या वेळीं त्याचें वास्तव्य सरदेसायाच्या एका वाड्यातच होतें. ऐतिहासिक काळीं विख्यात असलेल्या ह्या जुन्या घराण्याची कमाईही पूर्वी चागलीच होती. परंतु रियासतकाराच्या वडिलाना मात्र कठिण दिवस प्राप्त झाले. त्याना शेतीवर रावल्याखेरीज प्रपंच चालविण्याची पचाईत पडू लागली आणि कोंकण प्रान्तीं शेतींतून उत्पन्न उत्पन्न तें काय येणार? सखारामपतास कर्जबाजारी करावें लागलें, तरी देतातलें रावणें काहीं चुकलें नाहीं. उलट सावकाराचा तगादा व त्याची उणी बोलणीं खाण्याचा त्रास तेवढा वाढला. तरी त्या थोर पुरुषानें आपलें सत्त्व सोडलें नाहीं. त्याची नेकी, त्यांचा चाणेदारपणा व त्याची सचोटी यात या विपत्कालीं देखील अंतर पडलें नाहीं. किंबहुना असेंच म्हणता येईल कीं, सखारामपतानीं आपल्या मुलाना औरस हकानें

न चोराला लाभे प्रकट न दिसे लेशहि कदा

अशा प्रकारची जी इस्टेट ठविली ती शुद्ध सच्छीलाची, शुद्ध दानतीचीच होय. **गोविंदराव** ( रियासतकार ), **नारायणराव** ( बिल्मिोऱ्याचे कारखानदार ), **गणपतराव** ( मुंबईतील व्यापारी ), **दिनकरराव** ( नेत्रवैद्य ) व **भास्करराव** असे पाच पुत्र त्यास झाले. शिवाय त्यास दोन कन्याही झाल्या.

मूळचे मावळंग्याचे हे सरदेसाई पुढें वेरवली वगैरे ठिकाणीं राहू लागले, पण सखारामपतानीं आपलें घर गोविल येथें बाधलें. कोल्हापुर—रत्नागिरी रस्त्यावर माखरप्यापासून

गोवलास जाण्यास रस्ता आहे. शिपोशीच्या पुढें तीन मैलावर गोविल लागतें. येथें सखारामपंताची बहुतेक हयात गेली. स. १९०७ मध्यें नातवाच्या (श्यामकांतच्या मुंजीसाठीं बडोद्यास जाण्याकरिता ते मुंबईस आले असता दसऱ्याच्या आदले दिवशींच कालवश झाले! (ता. १५ १० १९०७).

रियासतकाराचा जन्म ता. १७ मे, १८६५ मध्यें गोविलनजीक हसोळ मुक्कामीं झाला दोन गावामध्यें लहानसा पऱ्या तेवढाच आहे. धार्मिक समजुतीप्रमाणें आसन्नप्रसवा मातुश्रीस गोवलाहून हसोळीं नेलें व तेथें सुखरूपपणें प्रसूति झाल्यावर बारशाचे दिवशीं बाळबाळंतिणीस परत नवीन घरीं आणिलें. तसें म्हटलें तर गोविंदरावाचें बालपण खेड्यातच गेलें. अलीकडच्या विद्यार्थ्यांच्या मानानें त्यांनीं मनस्वी काबाडकष्ट केले असें म्हटलें पाहिजे. गुरें वळणें, शेतीवरील कामकाज करणें हें सर त्याच्या बाळपणीं नित्यातलें व मुलाला आवश्यक असें काम समजलें जाई. प्राथमिक शिक्षण शिपोशीस आटोपल्यानंतर पुढील इंग्रजी अभ्यासासाठीं रत्नागिरीस जाणें प्राप्त झालें. त्या वेळीं हायस्कुलांतले शिक्षण कसें होतें याची कल्पना आजच्या विद्यार्थ्यांस यावयाची नाहीं. वर्गांतच मुलें रात्रीं झोपत. पहाटे लवकर उठून आपापल्या पथाऱ्या व्यवस्थित गुंडाळून एका कोपऱ्यात लावून जागा साफसूफ करून ठेवणें भाग पडे. कारण तेथें नंतर वर्ग भरत असत. बाहेरगावच्या विद्यार्थ्यांना खाणावळींत जेवणासाठीं जावें लागे. त्यावेळीं खाणावळींचा दर तरी काय असेल असें वाटतें? रियासतकार दरमहा चोवीस आणे (रुपये नव्हत) देऊन रत्नागिरीस खाणावळींत जेवीत आणि शाळेंतच राहून अभ्यास करीत. गोवल्याहून रत्नागिरीस जायचें म्हणजे देखील मोठ्या मुष्किलीची मुसाफरी होती. गाडी मिळाल्यास त्याच्यावरोबर बोजा देऊन देवरुख्यापर्यंत मोठ्या सडकेवर जावयाचें. मग तेथून वैलगाड्यांच्या सोबतीनें पुढील घाट सपवावयाची. त्या वेळचें व हल्लींचें विद्यार्थी-जीवन यातील तफावत केवढी मोठी वाटते. अशा जुन्यापुराण्या काळात दीड रुपया दरमहा खाणावळीला देऊन रियासतकाराचें हायस्कूलचें शिक्षण चालू होतें.

आज आपणास रियासतकाराच्या श्वशुराची दृष्टि लाभणें शक्य नाहीं. आणि लाभली तरी मॅट्रिकचे वर्गांत असताना कोणते विशिष्ट गुण त्यांच्या ठिकाणीं दिसून आले हें काहीं सांगता येणार नाहीं. इतक्या वर्षांच्या अभ्यासानें त्यांनीं संपादिलेले गुण बाल्पणीं बीजरूपानें त्यांचे ठायीं वसत असले पाहिजेत, हें तात्त्विक विवेचनाच्या दृष्टीनें खरें ठरेल. परंतु आजच्या इतक्याच प्रमाणानें ते गुण त्या वेळीं कीर्तन्यांस दिसून आले असें म्हणणें म्हणजे श्रद्धाळूपणाची कमाल होय. म्हणून जावई शोधण्याची सामान्याची दृष्टि कशी होती किंवा त्यांच्या पसतीस हे हे जावईबुवा का आले, याबद्दल निश्चितपणें सांगण्याच्या भरीस पडू नये हें बरें. परंतु कीर्तन्यांनीं केलेली ती निवड चुकली नाहीं असें म्हणता येतें.

मॅट्रिक परीक्षा पास होण्यापूर्वींच रियासतकार चतुर्भुज झाले—कीर्तन्यांचे जावई झाले (ता. २९-२-१८८४). कु. गंगूताई कीर्तने, सौ. लक्ष्मीबाई सरदेसाई झाल्यास आज पुरीं ५४ वर्षें होऊन गेलीं आहेत [ तरी रियासतकाराच्या विवाहाचे वाढदिवस फक्त १४ च झाले ! ].

शिकत असताना विवाह झाला म्हणून त्यांच्या अभ्यासात काहीं खंड पडला नाहीं मॅट्रिक होताच श्वशुराच्या मदतीनें रियासतकार पुण्यास गेले व फर्ग्यूसन कॉलेजात दाखल झाले. तेथील पहिलें वर्ष यशस्वी रीतीनें पार पाडून पुढील अभ्यासासाठीं त्यांना मुंबईस जावें लागलें. तेथें त्यांनीं एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें नाव घातलें व तेथून ते स. १८८८ मध्यें बी. ए. झाले. वडिलांना हायस्कूलचें शिक्षण पार पाडण्याचेंही सामर्थ्य नव्हतें, मग मुंबई पुण्यासारख्या ठिकाणचें त्या वेळचें का होईना, कॉलेजचें शिक्षण त्यांना कसें झेंपणार ? रियासतकाराचे मामा बळवंतराव आठल्ये यांनीं त्याम हा उच्च अभ्यास पुरा करण्यास बरीच मदत केली. शिकवण्या सारखे स्वावलंबनाचे मार्गही त्यांनीं अवलंबिले होते.

पदवीधर होताच त्यांना बडोदें येथें राजवाड्यात श्रीमंत सयाजीराव महाराजांना वर्तमानपत्रें वगैरे वाचून दाखविण्याचें रीडरचें काम मिळालें. स. १८८९ च्या सुरुवातीपासून ते तेथें रुजू झाले. त्या वेळीं त्यांचा पगार दरमहा ७० रु. होता. एक वर्षानेच युवराज राजपुत्र फत्तेसिंहराव यांना शिकविण्याची कामगिरी महाराजांनीं त्यांना सांगितली. तीन रियासतकार छान रंगले. दुसराही विषय शिकवावयाचा म्हणजे ते प्रथम स्वतः त्याचा अभ्यास करीत व कित्येकदा सर्व लिहूनही काढीत. हा लेखी टिपणांतून त्यांच्या रियासती जन्मास आल्या. "माझ्या टेबलावरची इतिहासाची टिपणं तुझ्या वडिलांनीं नेऊन छापखान्यात टाकलीं आणि मला रियासतकार केलें," असें ते अनेक वेळा मजजवळ बोलले आहेत. रियासतीच काय, पण एखादें इतिहासाचें पुस्तक आपण लिहावें असा आजच्या रियासतकारांचा बेत तेव्हा नव्हता. मुसलमानी रियासत अशी जन्मास आल्यानंतर लाभलेल्या आत्मविश्वासाच्या जोरावर त्यांनीं हळू हळू काम पुढें चालविलें आणि मग त्यातून रियासतींचे खंड प्रसिद्ध झाले. स. १००० पासून पेशवाईच्या अखेरपर्यंतचा व '५७ सालच्या समरापर्यंतचा इतिहास त्यांच्या हातून लिहून झाला आहे. मुसलमानी, मराठी व ब्रिटिश अशा तीन रियासती त्यांनीं पूर्ण केल्या.

पण हें तर त्याचें जीवित कार्य झालें. आपणास अजून त्याच्या आयुष्यातील बऱ्याच गोष्टींची माहिती मिळावयाची आहे.

गायकवाडाच्या नोकरींत असताना अनेक निमित्तानें त्याचा प्रवास पुष्कळ व्यापक झाला. हिंदुस्थानातली निरनिराळीं ठिकाणें, थंड हवेच्या जागा, ऐतिहासिक शहरें, हीं तर त्यानीं पाहिलींच, पण सयाजीरावाबरोबर पाच वेळा युरोपमध्यें सफरीसाठीं त्याना जावें लागलें युरोपिअन प्रवासामुळें त्यानीं कित्ती तरी नव्या अनुकरणीय बाबी अंगिकारल्या. आधींच्या त्याच्या पद्धतशीर स्वभावात अधिकच सूक्ष्मता आली. वक्तशीरपणाचें महत्त्व सयाजीरावाच्या सहवासात विशेष असे. तें विलायती अनुभवानें पुरेपुरे पटलें– व आगींही छान वाणलें. कामाचा उरक, जेव्हाचें तेव्हा काम आटोपण्याची रीत, अशाच प्रवासाने वाढत गेली. खुद्द सयाजीराव प्रत्येक प्रवासात " मधुमक्षिका " वृत्तीनें, थोडा का होईना पण मधु गोळा करण्याच्या दृष्टीनें वागत असल्यानें, रियासतकारासही त्याच्याशीं तादात्म्य पावण्याची कला आत्मसात् करावी लागली. रोजच्या कार्यक्रमाचें टिपण, दैनंदिनी रोजच्या रोज लिहिण्याची सक्त सवय, हिशेबातील कडकपणा, या सर्व गुणाचा विकास गायकवाड नरेशाच्या सान्निध्यात झाला असें म्हणता येतें. रियासतकारानी पहिली युरोपची सफर स. १८९२ त व शेवटची स. १९११ मध्यें झाली.

बडोद्याच्या राजघराण्यातील मुलामुलींचे हे " मास्तर " सुमारें २५ वर्षे मास्तरकी करीत होते. त्याच्या तालमींत तयार झालेल्याचीं प्रमुख नावे घ्यावयाचीं तर फत्तेसिंहरावाचे सर्व व व मुले, इंदिराराजे ( कुचबिहारच्या राजमाता ), देवास ( छोटीपाती ) च्या राणीसाहेब, साङ्गलीच्या विद्यमान अधिपतींची माता–शिवाय बडोद्यातील कित्येक सरदाराचीं मुलें–अशीं सागता येतील आजसुद्धा सर्व राजघराण्यात रियासतकार " मास्तर " म्हणूनच ओळखले जातात. पुत्रशोकाचा जबरदस्त धक्का रियासतकाराना बसला तेव्हा इंदिराराजे बडोद्यात होत्या ( १९२६ ). तेथून त्यानीं सांत्वनपर लिहिलेल्या पत्रात याच आवडत्या नावाचा उल्लेख केलेला आढळतो—

" Words fail me but, my dear Master, my heart is full of sympathy for you & your wife '

राजपुत्राचे व राजकन्याचे हे मास्तर. दोन तपाहून अधिक काळ राजघराण्यात वागलेले, त्यामुळें साहजिकच राणीसाहेबाचा त्याचेवर पूर्ण विश्वास असे. घरातल्या वडील माणसाप्रमाणे त्याना त्या मानीत. नाहीं तरी राजे लोकाचें आयुष्य म्हणजे एका प्रतिष्ठित बंधनासारखेंच असतें. जिव्हाळ्याचीं माणसें अशीं त्याना त्याच्या परिस्थितीमुळें जोडता येत नाहींत. उठता बसता नोकराशीं व्यवहार आणि जिवाळ्यात तर चागला चाकर मिळणें ही पूर्व पुण्याईची गोष्ट मानतात. तेव्हा रियासतकारावर राणीसाहेबाचा विशेष लोभ जडला किंवा राजकन्या व राजपुत्रही त्याच्याशीं विशेष ममतानें वागले याबद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

राजपुत्राच्या शिक्षणाचें काम सपलें तरी सयाजीरावाच्या मनातून रियासतकाराना सोडावयाचें नव्हतें. त्याची नेमणूक खाजगी हिशेबखात्याचे मुख्य म्हणून केली ( १९१२ ). तेंही काम ११–१२ वर्षे केल्यानंतर रियासतकारानीं सेवानिवृत्त होण्याची इच्छा दर्शविली

स. १९२० मध्यें त्यांनीं बडोदें सोडलें. त्यांचा शेवटचा पगार दरमहा रु. ४८० होता. ३७ वर्षांच्या नोकरीनंतरही त्यांना पगाराच्या मानानें पेन्शन मिळालें नाहीं, हा संस्थानी न्यायाचा एक मासला होय !

बडोद्यास असतांना रियासतकारांनीं वाङ्मयीन क्षेत्रांत अनेक प्रकारें पदार्पण केलें. नवीन नवीन विषयांवर आपल्या मराठींत पुस्तकें असावींत ही त्यांची इच्छा आतां सर्वांस ज्ञात आहे. रियासतकारांना इतिहासलेखनाची हौस कशी झाली हें कळण्यासाठीं त्यांच्या नांवानें प्रसिद्ध असलेलीं पुस्तकें कालानुक्रमें पहावीं. प्रथम मॅकियव्हेलीच्या "Prince" चा "राजपुत्र" हा अनुवाद स. १८९० त व मग दोन वर्षांनीं 'सीली'च्या इंग्रजी इतिहासाचा मराठी अनुवाद "इंग्लंडदेशाचा विस्तार" ( Expansion of England ) हा स. १८९२ मध्यें प्रसिद्ध झाला. रियासतकारांच्या लेखनाचा 'श्रीगणेशा' ऐतिहासिक ग्रंथापासून झाला असला तरी महाराजांच्या आज्ञेनें देशी व 'उताणा स्वाया' ग्रिन, सक्स, चक्कर वगैरे युरोपीय हीं बैठ्या खेळांविषयींचीं अनुवादात्मक पुस्तकें १८९६ सालीं त्यांनीं प्रसिद्ध केलीं. मराठी इतिहासदेवतेस एकदम मोठी भीति वाटली. आपला नि:सीम भक्त क्रीडादेवीच्या नादानें गुरफटतो कीं काय? पण नाहीं. शेवटीं इतिहासदेवीचीच सरशी झाली. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या वर्षीं "हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास" या नांवानें मुसलमानी रियासत प्रथम खंड छापून तयार झाला. लगेच एक वर्षानें "शालोपयोगी भारतवर्ष" म्हणजे शाळांतील विद्यार्थ्यांना उपयोगी पडेल असा छोटासा हिंदुस्थानचा समग्र इतिहास त्यांनीं लिहिला. अशा प्रकारें इतिहासदेवतेनेंच या भक्ताला शेवटपर्यंत आपल्या सेवेंत गुंतवून ठेवलें. रियासतींचे एकंदर ११ खंड, मुसलमानी रियासत-२ खंड, मराठी रियासत-८ खंड, ब्रिटिश रियासत- २ खंड ( दुसऱ्या खंडाची मुद्रणप्रत सध्या तयार आहे )-तिच्या गळ्यांत पडावयाचे होते ना! असो.

रियासतकारांच्या ऐतिहासिक वाङ्मय-प्रपंचाची एक सूचि स्वतंत्र करावी लागेल. त्यांच्या कौटुंबीय विस्ताराची माहिती मागें मध्येंच खंडित होऊन जेव्हां तेव्हां इतिहास पुढें येतो हें योग्यच नव्हे काय ?

बडोद्यास कामधंदा सुरू होतांच रियासतकारांकडे त्यांचे धाकटे बंधू, मामेबंधू, वगैरे मंडळी त्यांचेजवळ अभ्यासासाठीं गेली. दरबारांत राजपुत्रांना शिकविण्याचें काम होतें—त्यांचीच छोटी आवृत्ति घरीं. शिवाय वडीलकीच्या नात्यानें संसाररथाचा सर्व भार रियासतकारांवरच होता. तो त्यांनीं न कुरकुरतां सांभाळला.

रियासतकारांस स. १८९९ मध्यें (९ म.) एक पुत्र झाला. तो श्यामकान्त होय. त्याचे पाठीवर चार एक वर्षांनीं ( ता. २७-२-१९०३ ) यांनीं दुसरा मुलगा झाला. त्याचें नांव प्रो० निसीकांत यांच्या सल्ल्यावरून श्रीवत्सलांछन असें ठेविलें. श्यामकान्तचें प्राथमिक व शाळेंतील इंग्रजी शिक्षण मराठीच स्वतः डॉ० रवीन्द्रनाथ टागोर यांच्या शांतिनिकेतनमध्यें पाठविलें (१-१२-१९१२). तेथून तो कलकत्ता युनिव्हर्सिटीची मॅट्रिक परीक्षा बंगाली मातृभाषा

घेऊन यशस्वी झाला. शांतिनिकेतनमध्ये त्याच्यातर्फे गुण वर्गातील दुसऱ्या कोणासच मिळाले नाहीत. नंतर फर्ग्युसन कॉलेजात B A, B Sc होईपर्यंत श्यामकान्तानें अभ्यास केला लष्करी पलटणींतही तो दाखल झाला होता. पुढील अभ्यास जर्मनींत जाऊन त्यानें केला. जुलै १९२४त डॉक्टरेट पदवी मिळविली आणि दीड वर्षांच्या अवधींतच आतड्याच्या विकारानें त्यास परदेशीं मृत्यु आला ( २८-११-१९२५ ). रियासतकारास हा एक जबरदस्त तडाखा 'नशीब' म्हणून कुणी शक्ति आहे म्हणतात तिनें दिला. हातातोंडास आलेला सद्गुणी व सर्वांचा आवडता मुलगा आईबापाच्या उतारवयात परलोकवासी झाल्यामुळें त्याच्या मनाची कल्पनाच केली पाहिजे.

श्यामकान्तचा हा विरह प्रेमळ आईबापास विशेष जाणवला तो अत्यंत सुस्वभावी व गोड मुलगा होता, असें वयस्थांचेंही मत होई. मग आईबापाना त्याबद्दल काय वाटत असेल बरें? मृत्युशय्येवर असताना श्यामकान्तनें लिहिलेल्या पत्रातील भाग उध्दृत केला म्हणजे त्याच्या थोर मनाची, व्यापक विचाराची व उदात्त ध्येयाची कल्पना थोडी तरी येईल—

"शस्त्रक्रियेंतून जर सुखरूप पार पडलों नाहीं तर या जगात तुमची आमची पुन्हा
"गाठ नाहीं! आजपर्यंत ल्हानपणापासून तुम्ही उभयता माझें मोठ्या काळजीनें व
"प्रेमानें लालन पालन केलें, उत्तमपैकीं शिक्षण दिलें मला कोठेंही काहींही कमी पडू
"दिलें नाहीं. आईबापापासून मुलाना जितकें म्हणून मिळणें शक्य असतें त्यात तुम्ही
"कोठेंही न्यूनता दाखविली नाहीं. तुमच्यासारखे आईबाप लाभणें म्हणजे मोठें भाग्य
"होय आणि तें मला लाभलें हा केवढा तरी मोठा लाभ मी समजतों

"नाना, माई! माझी एवढीच विनंती आहे कीं, जर मला मृत्यूनें ग्रासलें तर
"शोक किंवा दुःख करीत बसू नका. तुमच्यासारख्याच किंवा त्याहूनही जास्त दुःखी
"लोकाकडे दृष्टि फेंका तुमच्या दुःखाची कल्पना माझ्या मनापुढें आली म्हणजे असह्य
"होतें. 'उदार चरितानां तु वसुधैव कुटुंबकम्' असेंच मानून चाला

"तुम्हा उभयतास अत्यंत प्रेमपूर्वक व श्रद्धापूर्ण प्रणाम वरचेवर सांगून हा तुमचा
"आज्ञाधारी व आवडता मुलगा रजा घेतो तुमचा शुभ आशीर्वाद सतत माझ्या
"पाठीं आहे"

मृत्यूपूर्वी काहीं तास हें पत्र श्यामकान्तनें स्वदस्तुरनें लिहिलें असल्यानें त्यानें पितराच्या मनात केवढा उमाळा आणला असावा याचा वास्तविक अंदाज येण्यासाठीं पुनर्विवाहामीनें तसें होरपळलेंच पाहिजे

श्रीवत्स हा तर बालपणींच म्हणजे साडेचार वर्षांचा असताना ( स १९१५ मध्यें ) वारला. एवच, रत्नासारखीं दोन मुलें असून सेवानिवृत्तीच्या वेळीं रियासतकार बडोद्याहून निघाले, ते तेथें प्रथम गेले तेव्हा होते तसेच, म्हणजे नुसते सपत्नीक त्यांचा विवाह झाला स १८८४ मध्यें बडोद्यास ते कामावर लागले स. १८८९ त. आणि तेथून निघाले

स. १९२५ त. तेव्हा बडोद्यातलें ३७ वर्षांचें वास्तव्य अथवा ४२ वर्षांचें वैवाहिक जीवन व्यतीत करून शेवटीं पुनः दोघेंही जर्मीच्या तशींच!! ही स्थिति मोठीच दुःसह म्हटली पाहिजे. पण इतक्या वर्षांच्या अनुभवानें रियासतकारानीं जीविताकडे पहाण्याची आपली दृष्टि बनविली होती. जीविताचें तत्त्वज्ञान म्हणतात तें त्यानीं पूर्ण विचारान्तीं ठरविलें होतें व तेंच त्याच्या उपयोगी पडलें. ससार असार आहे, जग क्षणभगुर आहे, सर्व मायेचा पसारा आहे, इत्यादि पोकळ वेदान्ताची कास त्यानीं अशा दुःसद परिस्थितींतही धरली नाहीं, हा त्याच्या मनाचा खबीरपणाच म्हटला पाहिजे. सर्व साधारणरीत्या आपण असें पहातों कीं कसाही विचारी इसम परिस्थितीपुढें गोगलगाय बनतो. दुःखानें लगेचिक बनतो. सारासार विचार असा त्याला उरत नाहीं. मग तो कुठल्या तरी अविचारी मार्गानें उर्वरित आयुष्य कठतो. तसें रियासतकारानीं कधीं होऊ दिलें नाहीं. त्याची मनोवृत्ति शुद्ध तर्काच्या मजबूत पायावर उभी असल्यानें कमल्याही तुफानी दर्याला तिला काहींच करता येत नाहीं. म्हणून ते म्हणतात—

"दोन होतकरू मुलगे आम्हास टाकून गेले ही गोष्ट अद्यापि आम्हास पटत नाहीं....सर्वच प्राणी निरजीवी आहेत. प्रत्येक इसम आपल्या राष्ट्राचा एक घटक असून लाभलेल्या आयुर्भागात ज्यानें त्यानें आपलें कर्तव्य यथायोग्य बजावलें कीं त्याचा कार्यभाग सपला."

एवढ्यावरच त्याचें जीवित तत्त्वज्ञान थांबत नाहीं. पुढील जन्मीं आपल्या आप्तेष्टांची भेट होईल, हें वेडें समाधान का होईना, पुष्कळांच्या मनास शांति देण्यास पुरेसें असतें. पण रियासतकार अशी आत्मवचना करून घेण्यास मुळींच तयार नाहींत. त्याचा पुनर्जन्मावर विश्वास बसत नाहीं असें ते सागतात. या जन्मींच आपल्या कृत्यानें आपणास अमर होता येतें असा त्याचा दृढविश्वास आहे. याच भावनेमुळें लौकिकी अर्थानें दिवगत असलेल्या मडळीचा समागम प्रसगानुसार अद्यापि त्यास घडतो. प्रचड दुःखानलातून शीरसलामत बाहेर पडण्यास मन व मनाची तयारीही तशीच चागली खबीर असली पाहिजे हें उघड आहे. ज्याना त्याच्या या स्वभावाची माहिती आहे त्यानाच प्रारंभीं उद्धृत केलेल्या वाक्याचें स्वारस्य यथार्थ समजेल.

"इतिहास हा तुम्ही आपला मुलगा मानलेला आहे व तो अमर आहे." असें श्री. न. चिं. केळकरानीं लिहिले, तें अत्यत समर्पक होय.

कौटुंबिक सौख्य म्हणतात तें रियासतकाराना कसें प्रकारें लाभलें हें आता कळलेंच असेल. स. १९२५ मध्यें पुनर्विरहाचा वज्राघात झाल्यामुळें पुष्कळ हितचिंतकाना व आप्तेष्टानाही त्याच्या प्रकृतीबद्दल साहजिकच काळजी वाटली. पण इतिहासाची सुधावृष्टि त्याचें चैतन्य कायम टिकवीत होती इतिहासदेवतेच्या परमप्रिय उपासकावर काळानें आणलेली सकटें पाहून तिला वाईट वाटलें आणि म्हणून तर तिनें आपल्या अधिकारात अमृतबिंदूचा वर्षाव चालू ठेवला नसेल ना, असें वाटतें. गेल्या १२-१३ वर्षांत रियासतकारानीं अक्षरशः कामाचे डोंगर एकट्यानें उठविले आहेत. त्या कामाचा व्याप पाहूनच छाती दडपून जाते. रियासती पैकीं मराठी रियासत उत्तरविभागातील तीनही खड याच काळातले. मुसलमानी रियासतीच्या

दोन्ही भागांची तृतीयावृत्तीसुद्धा याच अमदानींतली. "*Main Currents of Maratha History*" हीं पाटणा युनिव्हर्सिटींत दिलेलीं व्याख्यानें, त्याची पहिली व दुसरी आवृत्तीसुद्धा त्याच १२ वर्षांतली आहे. पेशवेदप्तर संशोधन होऊन त्यांतून ४५ खंड बाहेर पडले, रेसिडेन्सी रेकॉर्डसपैकीं इंग्रजी पत्रव्यवहार पांच खंड अभ्यासकास उपलब्ध झाला—हें सर्व रियासतकाराच्या सतत दीर्घोद्योगामुळें. नागपूर युनिव्हर्सिटींत मराठी इतिहासावरील व्याख्यानें–"अव्वल मराठशाहीचें अंत स्वरूप"—हीं तर १९३६ मधलीं होत. मराठी रियासतींची नवी आवृत्ति शहाजी, शिवाजी, संभाजी व राजाराम अशा चार छोट्यामोठ्या खंडांत काढण्याचें कार्यही १९३५–३६ या दोन वर्षांत पुरें झालें. शालेय पुस्तकांच्याही अनेक आवृत्त्या या कालखंडांत निघाल्या.

असा त्यांच्या इतिहासप्रपंचाचा विस्तार बडोदें सोडल्यावर, सेवानिवृत्त झाल्यावर, वयाची साठी उलटल्यानंतर, विशेष जोमानें वाढला. फार काय, ऐतिहासिक क्षेत्रांत खरीखुरी कामगिरी त्यांच्या हातून या उत्तरवयांतच घडली आहे. इतरांच्या कर्तबगारीस जेव्हां ओहोटी लागते, तेव्हां रियासतकाराच्या मेहनतीचा भर दृष्टीस पडतो हें जसें विलक्षणच, पण तें सत्य आहे. ज्या कामगिरीमुळें त्यांचें नांव सर्वत्र झालें, त्यांच्या मेहनतीची व अभ्यासाची ओळख अखिल हिंदुस्थानभर झाली, तें पुण्यांतील पेशवे दप्तरांतील कागदपत्रांचें संशोधन होय. रावबाजीकडून पुणें कब्जांत घेतल्यानंतर सर्व कागदपत्र तत्कालीन अधिकाऱ्यांनीं एका इमारतींत आणून रचून भरून ठेवले, सध्या एलिअनेशन ऑफिस म्हणून ओळखतात त्याच इमारतींत सर्व कागदपत्रें भरलेलीं आहेत. सुमारें २७,००० रुमाल त्यांत असून त्यांचें संपूर्ण संशोधन एकट्या अभ्यासकास जन्मभर राबूनही पुरें होणारें नाहीं. त्या कार्याचा अंदाज सरकारनें निरनिराळ्या वेळीं वेगवेगळ्या तज्ञांकडून करवून पाहिला. एका विद्वानानें सरकारला कळविलें कीं, "तीस वर्षें हें काम चालेल व त्यास निदान आठ लक्ष रुपये खर्च येईल." अशा अंदाजामुळें व भिन्न भिन्न मतांमुळें असेल किंवा तिसरेंच कांहीं कारण असेल, सरकारनें त्या बाबतींत लक्ष घातलें नाहीं. हिस्टॉरिकल रेकॉर्डस कमिशननें वारंवार ठराव पास करून त्या साहित्याचें संशोधन तांबडतोब व्हावें, अभ्यासकांना तें उपलब्ध व्हावें, अशी मागणी अनेक वेळा केली. पण स. १९२९ मध्यें रियासतकार सरदेसाई यांस त्या कामावर एकदांचें नेमलें. त्यांच्या मदतीस प्रो. कृ. पां. कुलकर्णी, नि. गो. दिघे, गुजर, य. न. केळकर, पुरंदरे, इत्यादि अभ्यासू होते. त्यांनीं कार्य भराभर आटोपून निवडक कागद हातीं लागतील तसे छापून काढले. त्याचे एकंदर ४५ खंड भरले आहेत. प्रत्येक कागदपत्रावर तारीख, कोणाकडून, कोणास व त्याचा थोडक्यांत सारांश इंग्रजींत दिला असल्यानें हिंदुस्थानांतील सर्व प्रांतीय अभ्यासकांची सोय झाली आहे.

या कामाकरितां सरकारनें सालीना १० हजार रु. मंजूर केले होते. रियासतकारांस मदतनीस निवडण्याचें स्वातंत्र्य त्यांनाच असलें तरी विशिष्ट तत्त्वाप्रमाणें ती निवड व्हावयास हवी होती. संपादक म्हणून रियासतकारानें नांव छापण्याचें असें पहिले कांहीं खंड प्रसिद्ध झाल्यानंतर सरकारनें ठरविलें तरी त्यांत व्यंग झालेलीं मनें सरकारशीं सख्य अशीं नेहमी

छापण्याची व्यवस्था केली. त्या दप्तरात बसूनच सर्व काम करावयाचें होतें. नेहमीं लागणारे संदर्भग्रंथ तेथें जवळपास नव्हते. त्यामुळे अडचण म्हटली तर पुष्कळच होती. तरी कार्याकडे लक्ष देऊन रियासतकारांनीं ती सर्व सामग्री पण या अडचणीपेक्षा अधिक त्रासदायक व असह्य असा अनुभव कायदे कौन्सिलातून त्यांना मिळाला—त्याचीही त्यांनीं पर्वा केली नाहीं. पेशवे दप्तरांतून कांहीं ऐतिहासिक सामग्री अभ्यासकांना उपलब्ध होणार होती, हें राष्ट्रकार्य असलें तरी त्यांत वैयक्तिक हेवेदावे निघावे हें आश्चर्य होय. इतर अडचणींस न जुमानता सरकारनें ही जबाबदारी अंगावर घेतली तेव्हा प्रथमतः एक दोन वर्षांपुरती बेगमी केली होती. तीप्रमाणें तीन वर्षे काम चाललें, आणि आर्थिक अडचणींमुळें काटकसरीची सक्ति झाली, तेव्हा ह्या दप्तरखान्यावर होणारा खर्च मंजूर होण्याची पंचाईत पडली. चौथ्या वर्षाच्या सुरुवातीस सर्व मंडळींना कमी करावें लागणार असें कळताच सर जदुनाथ सरकार यांच्यासह रियासतकार काहीं ठिकाणें हिंडून आले व श्रीमंत गृहस्थांच्या भेटी घेऊन या स्तुत्य कार्यासाठीं त्यांनीं स्वतःच्या हिंमतीवर रु. १२,००० वर्गणीनें जमविले. एक वर्षाची बेगमी झाली. तेवढ्या अवधींत ४५ खंड व एक यादी मार्गदर्शिका म्हणून, इतकें ऐतिहासिक साहित्य छापून प्रसिद्ध झालें.

पेशवे दप्तरांतील कागदपत्रें तपासण्याचें काम रियासतकारांनीं कसें केलें हें पाहिलें म्हणजे त्यांच्या सूक्ष्म अभ्यासाची, दीर्घ व्यासंगाची व व्यापक वाचनाची साक्ष पटते. त्यांच्या संग्रहीं असलेलीं सर्व ऐतिहासिक पुस्तकें त्यांनीं वाचलीं असून त्यावर वाचल्याची तारीख आढळते. पुनर्वाचन झालें असल्यास तीही नोंद त्यावर दिसते. त्यांतील मजकुराचा उल्लेख इतर कुठल्या पुस्तकांत असल्यास तसा निर्देश बाजूला केलेला असल्यानें कोणत्या पुस्तकांत काय आहे, हें त्यांना चटकन् सांगता येतें. कुठली मिती बरोबर, कुठला वृत्तान्त विश्वसनीय, ता तसा का इत्यादि चर्चा देखील बाजूस लिहून ठेवण्याची त्यांची रीत आहे. तीमुळे त्यांचें वाचन किती चिकित्सक दृष्टीचें आहे तें आपोआप समजतें. तें असें असल्यामुळें त्यांना पेशवे दप्तरांतील कागद तपासून ते लावताना सोईचें गेलें. मराठी इतिहासाचा व्यापक अभ्यास असलेला, फार काय, उपलब्ध सर्व मराठी साहित्याचें वाचन झालें आहे, असा एकही अभ्यासक महाराष्ट्रांत रियासतकारांसिवा दाखविता येणार नाहीं. म्हणूनच त्यांचें महत्त्व विशेष वाटतें, त्यांचेबद्दलचा आदर दुणावतो. त्यांच्या चिकाटीचें, सतत मेहनतीचें व कार्यैक्यतेचें कौतुक वाटतें. पेशवे दप्तरांतील रेसिडेन्सि कागदांचें इंग्रजी काम करण्यास भरपूर वेळ मिळावा म्हणून दहाबारा वर्षांच्या गरीब विद्यार्थी पूर्वी ज्या वैराग्यशीलतेनें रहात असे, त्या वृत्तीनें ते पुण्यास, हल्लीं कौन्सिल हॉल जवळ दिवाणाच्या खोल्या आहेत त्यांत, साठी उलटल्यानंतरही राहिले होते. तसेंच रहाणें, तसेंच दिवसभर काम व शेजारच्या वाडिया कॉलेज विद्यार्थ्यांच्या भोजनगृहांत जेवण, असा त्यांचा क्रम किती तरी दिवस चालू होता. या एका उदाहरणावरून त्यांची तन्मयता कळून येईल.

पेशवे दप्तरांतील कागदांचे खंड ज्या पद्धतीनें व ज्या घाईनें निघाले, त्यावरून पहाता, त्यांत बरेच दोष राहणें अपरिहार्य होतें. पण त्यांची जाणीव खुद्द रियासतकारांसही

जेवढी आहे, तेवढी काकदृष्टीच्या टीकाकारागही नसेल. आज त्यांनी पेशवे दप्तरांतील ४५ खंडाचें शुद्धिपत्र निरनिराळ्या विद्वान् अभ्यासकांकडून जमविलें आहे; महाराष्ट्रांतील कुणा तरी अभ्यासकानें तें केलें आहे काय याचा तपास केल्यास असें आढळेल कीं, ज्यांनी ते वाचावयास पाहिजे होते, अशा विद्वानांनीं अजून ते समग्र चाळलेही नाहींत. मग शुद्धिपत्र करणें तर दूरच !

पेशवे दप्तराचें काम संपल्याबरोबर सातारकरांनीं रियासतकारांचा सन्मान श्रीछत्रपतींचे हस्तें साताऱ्यातच केला (ता. ३-११-१९३४). रियासतकारांना साडेतीन वस्त्रें व एक चांदीचें तबक अर्पण करून त्यांचा गौरव केला. ऐतिहासिक सामग्रीबद्दल त्यास धन्यवाद दिले. असला मानसन्मानाचा प्रसंग रियासतकारांवर पहिल्याच असल्यानें त्यांना या वेळीं गहिंवर आला. शब्ददेखील तोंडांतून बाहेर पडेना. कारण त्यांना विरोध, उपरोध, अशीच संभावना त्या वेळपर्यंत मिळाली होती. त्या पार्श्वभूमीवर हा गौरव विशेष उठून दिसला. या समारंभास सर जदुनाथ सरकारही हजर होते.

रियासतकाराच्या कार्याची किंवा त्यांच्या जीवनाची ओळख सर जदुनाथ सरकार यांच्या निर्देशाविना पुरी होणार नाहीं. बंगप्रांतीय हे विद्वान् इतिहासकार व त्यांचे महाराष्ट्रीय व्यवसायबंधु यांचें सख्य व उभयतांचा स्नेहसंबंध आज जवळ जवळ ३५ वर्षांचा आहे.

## जीवा जीव एक कार्य भेटविते

हा खाडिलकरी सिद्धान्त रियासतकार व सरकार यांचे बाबतींत सुरेख लागू पडतो. त्यांचे मतभेद होतात, एकमेकावर ते रागावतातही. एक थंड डोक्याचा, धिमेपणानें बहुतांचीं अतरें राखणारा तर दुसरा नृपतियति सवादापैकीं

## मय्येप्यास्था न चेत्सा त्वयि मम सुतराम् एप राजन् गतोऽस्मि

असें खणखणीत बजावून स्वकार्यमग्न होणारा. तरीही आपलें कार्य परस्पराना पूरक आहे, आपल्या उभयतांच्या सहकार्यानें कामाचे डोंगर उठविता येतील, हें जाणून त्यांनीं पूर्वी जडलेला प्रेमभाव कायम ठेवला आहे. श्यामसुन्दरला बंगाल्यात पाठविल्यामुळें उभय विद्वानांत घरोबा जडला, तो दिवसानुदिवस वाढतच गेला. रियासतकारानीं आपल्या प्रत्येक अडी अडचणीचे वेळीं ऐतिहासिक प्रश्नांत सर जदुनाथांचा सल्ला घेतला आहे. कामाचा विलक्षण उरक, अत्यंत सूक्ष्म व्यासंग, कार्यतत्परता आणि कमालीची व्यवस्था व दूरदृष्टि यामुळें सर जदुनाथांशीं पत्रव्यवहारानें का होईना संबंध ठेवणें म्हणजे एक मोठी अभिमानाची व आनंदाची बाब वाटते. त्यांचें औचित्य प्रशंसनीय आहे. स्मारकग्रंथ रियासतकाराना अर्पण करावयाचे त्या दिवशींचा कार्यक्रम कसा असावा याबद्दल त्यास सल्ला विचारला असता त्यांनीं मिनिटा बरहुकूम तो लिहून तर पाठविलाच, पण प्रारंभीं वदनपर मराठी पद्य कोणतें म्हणावें–यथार्थपणा-साठीं उचित मराठी कविवचन कोणतें, हें सुद्धा कळविलें. आणि त्यांत सुधारणा करावी असें कुणालाही वाटलें नसतें. इतका तो कार्यक्रम सुंदर आहे. सांगण्याचे तात्पर्य हें कीं, औचित्य व विद्वत्ता आणि व्यापक दृष्टि यांचा सुरेख संगम सर जदुनाथांच्या ठिकाणीं असल्यानें त्यांजबद्दल आदर नटकन् वाटतो.

महाराष्ट्रीय व बंगीय इतिहासकार यांचा हा स्नेहसंबंध कसा जडला व तो कसा वाढत गेला हें पहाणें उभयतांच्या चरित्रापैकीं महत्त्वाचा भाग होऊं शकेल खरें, पण तूर्त आपणास तसें करावयाचें नाहीं व तितकी सवडही नाहीं. एवढें मात्र लक्षात ठेवलें पाहिजे कीं, पेशवे दप्तर, रेसिडेन्सी रेकॉर्डस, ग्वाल्हेरचा पत्रसंग्रह, इत्यादि कामें रियासतकारानीं अंगिकारलीं त्यांत जदुनाथांचा कार्यभाग मोठा आहे. ते दोघे एकमतानें वागले म्हणूनच पेशवे दप्तरातल ४५ खंड आज अभ्यासकास उपलब्ध झाले–म्हणूनच रेसिडेन्सी रेकॉर्ड संपादून प्रसिद्ध करण्याचें कार्य एतद्देशीय इतिहासकारास मिळालें. एरवीं तें सर्व बंद तरी राहिलें असतें किंवा कुणा गोऱ्या साहेबाची त्यावर वर्णी लागली असती. इतर कुणाचाही उपमर्द करण्याचा हेतु मनात नसताही असें म्हणता येतें कीं, पेशवे दप्तर व रेसिडेन्सी रेकॉर्डस या दोन्ही कामासाठीं सरकार–

सरदेसाई याचेविना दुसरी पान मडळी मिळाली नसती उभयताना आहे तें सबद्ध विषयाचें सागोपाग ज्ञान, ती मेहनत करण्याची तयारी व तो कामाचा उरक, इतर विद्यमान अभ्यासकात इतक्या उत्कटत्वानें आहे असें वाटत नाहीं सरकारी दप्तरातल व्यवहार सभाळणें ही एक कला नसली तरी व्यवहारदक्षतेची बाब आहे आणि रियासतकाराना ती साधली खरी असो

सर जदुनाथ व सरदेसाई याच स्नेहसबध घरोब्यापेक्षाही निकटचे झाल आहेत आणि उभयताच्या चरित्रकारास, एकाचें चरित्र सागताना दुसऱ्याचेंही पुष्कळसें त्यात गावावें लागल असेंही म्हणता यतें कीं, दाघाच्याही परम स्नेहाची प्रतवारी लावली तर पहिल्या दाघात परस्पराच नाव येईल. रियासतकाराच्या स्नेही मडळींचा व आप्तेष्टाचा विस्तार तसा माठा असून सर्वांशीं त्याच सबध अगदीं प्रेमळपणाच आहेत तसें जदुनाथाचे नाहीं. उभय मित्राच्या स्वभावात पुष्कळ फरक आहत. पण त्यामुळे परस्पराच्या लोभात, सहकार्यात किंवा प्रेमभावात उणेपणा कधींच आला नाहीं उलट, दिवसानुदिवस तो वाढीस लागलेला दिसता परस्पराचीं कार्ये एकमेकाच्या सहृयानें झालीं आहेत किंबहुना उभयतानीं घरगुती अथवा व्यावसायिक असें एकही गौप्य लपविण्याचा प्रयत्न केला नाहीं मात्र त्याच्या या तीन तपाच्या स्नेहभावात सर जदुनाथानी दान वेळा रियासतकाराना चकविलें एकदा सातारला छत्रपतींच्या हस्तें त्याना साडतीन वस्त्रे देऊन त्याचा गौरव झाला त्या वेळीं व दुसरा प्रसग प्रस्तुतच्या स्मारक ग्रथा सबधींचा याच दोन 'कटा'ची खबर सर जदुनाथाच्या एका कानास कळली असून दुसऱ्या कानास—म्हणजे रियासतकारास—त्यानीं कळू दिली नाहीं हे दोन प्रसग वगळल तर उभयतानीं परस्परापासून कांहींच छपविलें नाहीं—तशी त्याची इच्छाही नव्हती, हे कळून यतें

दान विद्वान् इतिहासकाराचा हा शुद्ध स्नेह वास्तविक कौतुकास्पद व्हावयास पाहिजे हाता पण सखेदाश्चर्य हे कीं या त्याच्या निकट स्नेहामुळेंच उभयतावर महाराष्ट्रातील भा इ स मडळाचा रोष झाला आहे मराठ्याचा इतिहास लिहिण्याची सामग्री सर जदुनाथानीं एकट्यानीं स्वकष्टानें स्वत च्या पदरास खार लावून जेवढी जमविली आहे, तेवढी हिंदुस्थानात इतर कुणालाच मिळविता आली नाहीं ही गाष्ट कबूल केल्यानें, आपल्या कार्यास कमीपणा येता असें वाटणारानीं पाहिजे तर ती अमान्य करावी पण वस्तुस्थिति तशी आहे यात तिळप्राय सशय नाहीं त्याचीं कांहीं मतें, त्याचे किंत्येक निर्णय, हे फक्त त्यानाच पटतात खुद्द रियासतकारानाही त मान्य नाहींत उभयता आपापली बाजू माडून एकमेकाची खात्री पटवीत असतात पण तेवढ्यामुळें स्नेहात अतर आलें नाहीं, त्यानीं येऊ दिलें नाहीं. हा सुज्ञपणा पुष्कळात नसता म्हणूनच कदाचित् भारत इतिहास सशाधक मडळातल्या मडळींचा या दाघावर रोष आहे कुणाच्याच रागालोभाची परवा न करणाऱ्या या दोघानीं मडळींच्या रोषाकडे लक्षही दिलें नाहीं मात्र तो राष का आहे, त्याची वाढ कसकशी झाली व तो अजूनही समूळ नाहींसा का झाला नाहीं, याचा विचार केल्यास या पुण्यातील विद्वान् मडळीबद्दल हसू यतें रियासतकाराच्या या चरित्रविषयक धावत्या लेखात ही विराधाची हकीकत आणावी की न आणावी या विचारात हातों परतु पुष्कळाना त्या वादाची नीट कल्पना नाहीं रियासतकारासारख्याच्या कार्यात

विरोध का व्हावा हेंच पुष्कळांना समजत नाहीं. त्याच्यासाठीं ह्या वादाची भूमिका थोडक्यात मांडणें जरूर आहे.

श्रीशिवछत्रपतींचें इंग्रजी चरित्र सर जदुनाथांनीं लिहिलें, त्यावरून पुष्कळांना त्यांचा राग आला. शिवाजीबद्दल आम्हा मराठ्यांना वाटतें तें विभूतिमत्त्व व वाटतो तो अभिमान जदुनाथांच्या तर्ककर्कश विचारी मनास वाटत नाहीं. आमच्या बखरी, पुराणें, कागदपत्रें, यात त्यांचे दृष्टीनें ऐतिहासिक विश्वसनीय सामग्री कमी, पेशवाईबद्दल त्यांचा एक दुराग्रह झालेला, अशा बंगाली इतिहासकाराचा सल्ला मुंबई सरकारनें वारंवार घ्यावा, त्याचें म्हणणें मानावें, त्याच्या सल्ल्यानें चालावें, हीच 'मंडळा'ला न पटणारी गोष्ट आहे. मराठी इतिहासाबद्दल आत्मीयता नसलेला व 'मोडी वाचता येत नसलेला' इतिहासलेखक आमच्या ऐतिहासिक साधन-सामग्रीची विल्हेवाट लावण्याचे कामीं सल्लागार असावा हें पुण्यातील सोवळ्या मंडळींना पटत नाहीं.

रियासतकाराचा अपराध म्हणजे त्यानीं सर जदुनाथ सरकारांशीं संगनमत केलें व 'स्वत ची पात्रता नसता, संशोधन कसें करावें हें ठाऊक नसता, त्यानीं पेशवे दप्तराचें संशोधन' करण्याचें काम पत्करलें. आपल्या रियासती आमच्या मंडळामार्फत प्रकाशित होऊ दिल्या नाहींत. कागदपत्र छापण्यात, त्यांचा इंग्रजी मतलब लिहिण्यात व एकंदर ४५ खंड प्रसिद्ध करण्यात कुठलीच शास्त्रीय पद्धत त्यांनीं अवलंबिली नाहीं सर जदुनाथांच्या कच्छपीं लागून त्यानीं हीं कामें 'मिळविलीं.' जदुनाथांचें मत बदलण्याचा रियासतकारांनीं प्रयत्न केला नाहीं. 'राष्ट्रीय वृत्ति' त्याचे अंगीं नाहीं. ते केवळ 'सकलनकार' आहेत इत्यादि.

विरोधकाची भूमिका अशी आहे. रियासतकार व सर जदुनाथ यानीं त्या विरोधकाशीं वागावयास पाहिजे होते तसेंच वर्तन ठेवलें. त्यानीं परवा म्हणून केली नाहीं. आणि तेंच ठीक झालें. थोडासा समजूतदारपणा दाखवून अंगीकृत कार्यात अनेकांचें सहकार्य मिळविणें, हा मध्यवर्ती कलाच्या अंगीं असावयास पाहिजे तो गुण, चाल्कांच्या अंगीं नसल्यानें रियासतकार व सर जदुनाथ या उभयतांच्या मेहनतीचा फायदा भारत इतिहास संशोधक मंडळास मिळाला नाहीं, याबद्दल वाईट वाटतें. असो

रियासतकारांचें प्रचलित जीवन जुन्या ऋषींप्रमाणें आहे. कामशेत येथें इंद्रायणीचें छोटेसें पात्र. त्या तीरावर आश्रमवजा घर, तेथेंच असलेला ल्हानसा ग्रथसग्रह. जुन्या ऐतिहासिक स्वर्नाच्या सान्निध्यात ते आपला काळ घालवीत असतात. ऋष्याश्रमाची तुलना पुरी होण्यास शिष्याची तेवढी कमतरता आहे. आणि रियासतकाराच्या कार्यात वैगुण्य आढळत असलें तरतें हेंच कीं, त्यांच्या एवढ्या अवाढव्य कार्यानंतरही त्यांची परंपरा चालविणारा शिष्यवर्ग त्यांनीं जमविला नाहीं. पुष्कळ कर्तबगारांची परंपरा त्यांचे पुत्रपौत्रच चालवितात. तेंही भाग्य रियासतकारांचें नाहीं. त्यांचे दोन पुत्र हुशार होते. पण आज एकही हयात नाहीं. त्यामुळें कदाचित् त्यांना आपल्या कार्यात अपूर्णत्व राहिलें असें वाटत असेल काय, अशी शंका निघेंकाना येते. कारण शिष्यपरंपरा राखण्याची इच्छा जवळ जवळ स्वाभाविकच होय. सर जदुनाथांचे

अनेक शिष्य आहेत. तसे रियासतकाराचे नाहीत याचें कारण उघड दिसतें. जदुनाथाचें जीवन विद्यालयात व विद्यापीठाशीं निगडित होतें, तसें रियासतकाराचें नव्हतें व नाहींही. बडोदें संस्थानात असताना त्याचेकडे अभ्यासासाठीं कुणीं जाणें शक्य नव्हतें—आणि नंतरच्या त्याच्या मध्याच्या स्वल्पाश्रमातही तें शक्य झालें नाहीं. एवढ्यानें त्याचें कार्य कमी ठरत नाहीं. उलट

## अवघें विश्वचि माझें घर

*याप्रमाणें सर्व विद्यार्थ्यांसाठीं आपलें कार्य त्यानीं उपलब्ध करून दिलें आहे. शिष्यसंप्रदाय* वाढवून काय फायदा ? कार्य महत्त्वाचें असेल तर तें चालविण्यास अभ्यासक आपण होऊन पुढें येतील आणि नसेल तर शिष्याची परंपरा चालवूनही काहीं उपयोग होणार नाहीं असें त्याचें मत आहे. तेंच युक्त दिसतें.

ग्रँट डफच्या इतिहासाशिवाय मराठ्याचा समग्र इतिहास लिहिलेला नव्हता, अशा काळात रियासतकारानीं मराठ्यांचा इतिहास रियासतींच्या रूपानें वाचकास उपलब्ध करून दिला त्यानीं गुजराती, हिंदी, कानडी भाषान्तरेंही झालीं आहेत त्याच्याशिवाय दुसरा मराठी इतिहासकार अद्याप पुढें आलेला नाहीं. त्याच्या ग्रंथावाचून ऐतिहासिक अभ्यासास दुसरें साधनच नाहीं, ही गोष्ट त्याच्या मूठभर विरोधकानाही नाकबूल करता येत नाहीं. शिवजन्म *तिथीच्या वादात त्यानीं नवा पक्ष स्वीकारला नसेल, शास्त्रशुद्ध संशोधन म्हणतात, त्यात ते* अनभिज्ञ असतील, त्याच्या इतिहासात मीठमसाला नसल्यानें तो समग्र लागत नसावा, लिहिण्याची पद्धत रूक्ष असल्यानें त्याचें वाचन कंटाळवाणें होत असेल, मराठी भावनाचें आकलन नसलेल्या सर जदुनाथासारख्या बंगाली, विद्वानाग्रणींशीं त्याची जानी दोस्ती असेल, भारत इतिहास-संशोधक मंडळातील मंडळींशीं ते फटकून वागले असतील, आणखी देखील त्यानीं सत्यासत्य अनेक 'गुन्हे' केले असें मानले, तरीसुद्धा त्याचें एकंदर कार्यच इतकें श्रेष्ठ आहे कीं, त्यानी योग्यता कशानेंही कमी होणार नाहीं भावी विद्वाना व अभ्यासकाना रियासतकाराचें हें ऐतिहासिक ऋण मान्य करावेंच लागेल.

# सूचि


अकबर ( बादशाह ) २१
अटक ४८-४९
अण्णा खटेराव १०८
अफझलखान १०३
अब्दाली अहमदशहा ( दुराणी ) १०५
अल्-उतबी ९४
अलबिरुनी ९४
अलेक्झान्डर ( शिकंदर ) ९१
अलाहाबाद ( प्रयाग ) १६५
असिरगड ५७
अमई १३५
अहमदनगर ८५-१०३,१७४-१८२
अहमदशहा वंगश ४८
आग्रा ७९,१५९
आडगाव १३५
आनंदीबाई ( पेशवे ) १०६
आपटे दत्तोपंत ८४
आल्बेरुनी ९४
आज्ञापत्र ( राजनीति ) ६७ ७६
इगळे अबाजी १०८
इंपिरीयल गॅझेटिअर ९४
ईलियट ९४
ईस्ट इंडिया कंपनी १०७
उग्रप्रकृति संभाजी ७४
उज्जयिनी ११२,१२८
एपिग्राफिया इंडिका ११५,११६
एल्फिन्स्टन ( मौंट स्टुअर्ट ) ८४,८५
ऐतिहासिक पत्रव्यवहार
संपादक सरदेसाई, कुळकर्णी, काळे ३०-३५
ओरिसाच्या इतिहासाचा दुसरा भाग १४४
औरंगाबाद ५४,७९
औरंगजेब ५४,७८,१०४,१५७,
१८१,१८२
कटक ४९
कनिष्क ९२
कवि कलश २१
कॅलेंडर ऑफ पर्शियन कॉरेस्पाँडन्स १४४
कान्हे संडोजी ९८
काव्येतिहास संग्रह ३३,१६५
काशी १६५,१८३
काळे यादवराव १४४
क्लाइव्ह रॉबर्ट ४९
कॉर्नवालिस लॉर्ड ८६
किबे विठ्ठल महादेव ५७-६१
कीव्हॉर्न ११७,११९-१२१
कोल्कुक १२९
कोल्हापूर ७८,१७९,१८३
कोल्हापूरकर संभाजी ३१
कोसंबी धर्मानंद ७०
कौटिलीय अर्थशास्त्र ४०
खरे ( वासुदेवशास्त्री ) ४५
खर्डा ४८,१३५
खेम सावंत ७२,२३
गंगाधरशास्त्री ८१,८६-८९
गायकवाड ८३,१३५
गिरिधर बहादुर १०९-११४
गुरु नानक ५२
गोखले बापू ५६,८५,८७
गोपिकाबाई १७५,१७६
गोमानक १७-३७,९३
ग्वाल्हेर १६५
घाटगे सर्जेराव ८६
घोरपडे दौलतराव ( मोंडूर ) ८५
— संताजी २३,७२,१०३
चतुरसिंग ( भोसले सातारकर ) ८६
चन्द्रगुप्त विक्रमादित्य ११५

चिपळूणकर विष्णु कृष्ण ४६
चिमाजी अपा २५,२९,५२,१०६,११०, ११२-११४
चुनारगड ८४
चोरघडे, देवाजीपंत १४३-१५५
छत्रसाल राजा ५०
जयसिंग ( सवाई ) १११,१५७-१६०
जाधव चंद्रसेन १११,१५७ १६०
— धनाजी ७२,१०३
— पिलाजी ११३
जिंजी ६६
जेधे शकावली २१
जोधपूर १५८,१६७
टॉड ४५,९४
टिपू ( सुलतान ) ९४
डाका ७९
डिवॉइन १०७,१४०
डुप्ले ४९
ड्यूक ऑफ वेलिंग्टन १०८
ढेंगळे त्रिंबकजी ८३-८७
डौसन ९४
तक्षशिला ९२
ताराबाई ( रामराणी ) ७२,७३,१८१-८४
तंजावर ९५
दयाबहादूर ११०-११४
दाभाडे खंडेराव १०३
दिघे वि गो ११४
दिल्ली ४६,५४,७१,९१,१११,१५७, १६० १६४,१७०,१८१-८४
दिवेकर स म १७८
द्वारका ४९,१२८
देवगिरी १२०
दुर्दैवी मोहरे ८७ ८८
धार ११०
नबाब फेगर अलि ६१
नागपूर ८२,११५,१४६-१४८,१५०-१५१
नागपूर प्रांताचा इतिहास १४४
नागपूरकर भोसल्याचा ऐतिहासिक पत्रव्यवहार १४४
नागपूरकर भोसल्याची बखर १४४
नामदेव ( संत ) ५२
नालछा १०९,१११
नाशिक १७५
निजाम ४८,१०९,११०,१४१
निंबाळकर ९४
नीळो सोनदेव ६५ ६६
नेपोलियन बोनापार्ट ९८,१०७
नोन्हीना मासिअ १३६
पटवर्धन परशुरामभाऊ ४६,८८,७२,१३६, १४१,१४२
पत्रसारसंग्रह ९५
पन्हाळगड ११०
परमानंद कवीन्द्र ८७,१७७-८३
पवार आनंदराव १०९
पवार उदाजीराव १०९,११०,११२
पवार कैफियत ११४
पंतअमात्य ( बावडा दप्तर-१ ) ६७,७१,७९
पानिपत ४६,४८,९५ १०६,१४१
पानिपतची बखर ( काशिराज ) १४१
पारसनीस ( द ब ) ४६
पालकर नेताजी ९५,१०३
पालखेड ११०
पिंगळे नीलकंठ मोरेश्वर ७४-७५
पुरुषार्थचरित १४५ १५५
पुरंदर ६२
पुरंदरे अंबाजीपंत ११०
पुरंदरे दप्तर ३०,१६०
पुणें ८०,८८,१४३,१५२,१७४
पृथ्वीराज ( चव्हाण ) ४६
पेशवाई ४०
पेशवे २४,२६,१३५,१३८,१३९
पेशवेकालीन महाराष्ट्र ६५

पेशवे दप्तर ( निवडक कागद ) २५, ८१,८२,८६,८९,११२-१३१,१४४, १५१,१५८-६२,१६६,१६८-७१, १७४
पेशवे नानासाहेब ( बाळाजी बाजीराव ) ३३, ४८,५३,१४४,१६०,१६२,१६४,१७०, १७३-७६
— बाजीराव पहिले २५,२७,५७,८१, ८२,१०९-११,१५७-१९
— बाजीराव दुसरे ४७,५७
— बाळाजी विश्वनाथ ४८,१००,१५७
— माधवराव ३५-३६,१५१,१६४-६६
— सवाई माधवराव ८९
पेंढारी १४०
पैठण १५,१२०,१७५
प्रभाकर शाहीर ८१,८७-८८
प्रभुणे रामशास्त्री ४०,४१
प्रभु बाजी ९८
प्रतापगड ४८
प्रतिनिधी श्रीपतराव १०९
प्रल्हाद निराजी ७५
फडके हरिपंत तात्या ४६-४८
फडणीस नाना ४६,१४३,१७५-७६
फाहियन ९२
बर्निअर ९१
बऱ्हाणपूर ७९,११०
बहादुरखान ४६
बंदी खानदौरान १५८
बखर ४६
बाळाजी बाजीराव-नानासाहेब-पेशवा पहा
बाळाजी विश्वनाथ-पेशवा पहा
बुंदेले गोविंदपंत १३५
बेंद्रीं सखाराम बापू १४३,१६५,१६६
महेन्द्रस्वामी ( धावडशीकर ) १०१
भरतपूर १०५
भाऊसाहेबांची बखर १४१
भारत इतिहास सं. सं. ११५
भोसले ( नागपूरकर ) १३५,१३६,१५०, १५२,१७३
— परसोजी १०३
— मुधोजी १४४
— रघूजी १०८,१४२,१४३,१४८
— संताजी ११०-११
मावजीकृत कैफियत ११४
मिराशी-कालिदास ११६
मिहिर-कुल ९२
मुजफ्फरजंग १०६
मुंगी शेवगाव ११०
म्हैसूर ४९,७८
मथुरा ९२,१२८
मध्यप्रांत संशोधक मंडळ ( नागपूर ) १७५
मराठी रियासत ( उत्तर विभाग )८१ ८४,८९, ११०,११२,१७३-१७५
महाड ८१
महीदपूर ५,७,५९,६०,६२,६३
मॅलेट सर चार्लस १३५
रघुवीरसिंह १११
रणजितसिंह ४५
राघोबा दादा ४८
राजनीति, आज्ञापत्र पहा
राजसबाई ७७,१७९
राजवाडे वै. वि. का. ४६
राजाराम छत्रपति २२,२३,७२,७३
राजाराम स्थिरबुद्धि ७२,७३,७६,७९
राणा प्रताप ५०
रामचंद्रपंत अमात्य २३,६५-७१,७७,७८
रामायण वाल्मिकी १२२
रायगड २२,८६
रास्ते खंडेराव ८९
रोशन बेग ५८
लक्ष्मीबाई राणी ( झांशीवाली ) ४८,८४

लासवारी १३५
लाहोर ४९,७९
लोदी इब्राहिमखान ४६
वणी दिंडोरी ८४
वतनपत्रें निवाडापत्रें ४४
वसई २४,१६५
वसईची मोहीम २४
विजापूर ७९
विठ्ठलपंत १६५
विठ्ठल शामराज १६१
विठ्ठल सुंदर १४३
विविधज्ञानविस्तार ६६-६७
विशाळगड १७९-८०
विश्वासराव १७५
वेल्स्ली ८६
व्यंकोजी ( तंजावरकर ) ८४
शहाजहान ४७
शहाजी ४७,४८
शामराजपंत ९८
शाहू २७,४७,१०९,११०,११३,१७९, १८१-८२
शिवभारत ४७,१७७-७८
शिवाजी श्रीछत्रपति महाराज २०,२३,३६, ४७,४८,५०,५२,६५,७७,८४,९४, ९५-९८,१०३,१०४,१७७,१८१-८३
शिवाजी ( कोल्हापुरकर ) ६८,६९,७२, ७७,७९,१८२,१८३
श्रीपतराव ( प्रतिनिधी पहा )
श्रीचक्रधर ११६
श्रीरंगपट्टण ४९
शिंदे जनकोजी १७०
— जयाप्पा १६३-१६७,१७१
— दत्ताजी १६६-१६८,१७०
— दौलतराव ८१,८६,१०८,१४७
— महादजी ४८,१००,१०६,१०७, १३५-३६,१४०
— राणोजी १६१-१६२
शि. मु. प. व्य. १६३,१६८,१७१
सकवारबाई १८३
सखाराम बापू ( बोकील पहा )
सचिव शंकराजी नारायण ७२
सफदरजंग १६५
सदाशिवराव भाऊ ३२,५१,१०६,१७४,१७५
सरकार सर जदुनाथ १३५
सरदेसाई ( रा. ब. गो. स. ) ४६,६७,७२, ७७,७८,८१,८९,१११,१७३,१८७-२००
सखुलदखान ११०
संभाजी ( छत्रपति कोल्हापूर ) २०,२२, २७,३६,६५,१०४,११०,१७९,१८२, १८३
सातारा ४६,८४,८६,८८
साने. का. ना. ४६,६६
सारंगपूर १११
सिद्दी याकूतखान २१
सिंहगड ४८,६१,९८
सुजा उद्दौला १६५
सुंदर तुकदेव ७२
सें. डोविअर २०
हेमाद्रीपंत १२०
हैदरअली ३५,३६,४५,१४१
हैदराबाद ७९
होळकर अहिल्याबाई ४८
— तुकोजी ४८
— मल्हारराव १०५,१११,१६२, १६४,१६६,१७१
— यशवंतराव ५७,८१,१०५
ज्ञानेश्वर १२१